ललितसाहित्य प्रकाशन ५१ वें

# भूल

( कादंबरी )

लेखिका

सौ. कमला फडके, एम्. ए.

१४ जानेवारी १९५६ किंमत अडीच रुपये

# प्रकरण पहिलं

नेहमींसारखा सूर्य उगवला. शहरावर पसरलेलं पहाटेचं धुकं विरळ होऊं लागलं. पाखरांची किलबिल सुरू झाली. आणि माणसंही जागीं होऊन आपापल्या उद्योगाला लागलीं. सूर्याचं उगवणं, पाखरांची किलबिल आणि माणसांचे उद्योग नेहमीचेच ! त्यांत कसली खळबळ नव्हती, ओढ नव्हती आणि नाविन्यही नव्हतं. बायकांचं सैंपाकघर, पुरुषांच्या कचेऱ्या, आणि मुलांच्या शाळा, या तीन बंधाऱ्यांनी जीवनाचं पाणी अडविलं होतं. या साचलेल्या पाण्याच्या डोहावर तेंचतेंचपणाचं जाड हिरवं शेवाळ जणु साचलं होतं. एखाद्या अवखळ बागडणाऱ्या पोरानं येऊन भाकरीचा खेळ खेळावा आणि शेवाळाचा गुदमरविणारा बुरखा फाडून चैतन्याच्या लाटा आपल्या अंगावर उधळून द्याव्या असं डोहाला वाटत असेल. आयुष्याच्या चाकोरींत फिरणाऱ्या प्रत्येक स्त्री पुरुषाचं जीवन म्हणजे असा एक डोहच ! कांहीं तरी नवीन घडावं, आणि त्या नाविन्याच्या लाटांनीं जीवनांत नवीन खळ-बळ उत्पन्न करावी, चैतन्याचे तरंग उठवावे, असं प्रत्येकालाच वाटत असतं. म्हणूनच सकाळीं उठल्याबरोबर ताज्या दुधाच्या गरम चहा आधीं ताजी बातमी देणाऱ्या वर्तमानपत्राची वाट प्रयेकजण पहात असतो. माणसाच्या मनाची ही भूक वर्तमानपत्रं विकणाऱ्या पोऱ्यांनीं ओळखलेली असते. म्हणूनच वर्तमानपत्रं विकणारीं पोरं भल्या पहांटे खळबळजनक बातम्यांचा पुकार करीत शहरांतल्या लहान मोठ्या रस्त्यांतून धांवत असतात.

आतांही खाकेंत वर्तमानपत्रांचा गठ्ठा घेऊन बबन धांवत होता. पहाटेच्या थंडीनं त्याचे हातपाय गारठले होते. पण आज त्याचे दैनिक "समाचार" चे अंक भराभर खपत होते. विक्रीच्या पैशाची ऊब त्याच्या लांड्या विजारीच्या खिशांत वाढत होती, म्हणून तो मोठ्या खुषीत होता.

ओरडतांना त्याचा आवाज सारखा चढत होता. गॅलरींत बाभळीच्या काड्या चघळीत उभ्या राहिलेल्या पुरुषांकडे, अंगणांत सडा शिंपण्यासाठीं येऊन रेंगाळणाऱ्या बायकांकडे आणि इस्पितळांत ऑपरेशन करणारा डॉक्टर नाक तोंड बांधतो त्याप्रमाणें नाकाकानाभोंवतीं मफलर शाली गुंडाळून पहाटेची ताजी हवा खाण्यासाठीं निघालेल्या एखाद दुसऱ्या व्यायामप्रेमी म्हाताऱ्याकडे पाहून तो पुकारीत होता;

"खळबळजनक बातमी ! दैनिक समाचार ! जानकी खून खटल्यावर अखेरचा पडदा ! आज सात वाजून पंचेचाळीस मिनिटांनीं जानकीचा खुनी रघुनाथ चित्रे फांसावर लटकणार ! दैनिक समाचार ! ...."

बबनची ती आरोळी ऐकून घराघरांनीं कान टवकारले आणि रस्त्यांनीं माना मुरडल्या.

तळहातावर चोळून तयार केलेला तंबाखूचा सकाळचा बार तोंडांत भरतां भरतां गोखले मास्तर थबकले. तळहातावर त्यांचा तंबाखू तसाच राहिला. ते पायरीवर उतरून ओरडले, "ए पोऱ्या, इकडे आण पाहू समाचार."

गोखले मास्तरांनीं मोठ्या उत्सुकतेनें समाचार उघडला. ठळक ठळक मथळे देऊन छापलेली रघुनाथ चित्रेच्या फांशीची बातमी ते अधाशी डोळ्यांनीं वाचूं लागले वाचता वाचता एकीकडे त्यांच्या मनांत येत होतं, काय अजब माणूस असला पाहिजे हा रघुनाथ ! एका परिस्थितींत, एका समाजांत वाढलेले आपण सारे. आपण मास्तराचे हेडमास्तर देखील होऊं शकलों नाहीं. अकाली प्रौढ झालेली बायको आणि केवळ तिच्याशीं लग्नसंबंध झाल्यामुळं झालेलीं मुलं यांना पोसणं हाच आपला पराक्रम ! तरुण मुलींच्या सहवासांत राहूनही मन चळूं न देणं हाच आपला अभिमान ! कुठं आपलं आयुष्य आणि कुठें या रघुनाथाचं ! कारकुनाचा लक्षाधीश होतो काय – परस्त्रीच्या नादीं लागतो काय – त्यापायीं लग्नाच्या बायकोचा खून करतो काय सारंच विलक्षण. स्वतःच्या मिळमिळीत संसाराची नेहमीं वाटणारी उबग आतां गोखल्यांच्या मनांत तीव्रतेनें उत्पन्न झाली. रघुनाथच्या प्रेम प्रकरणाचं वर्णन वाचतांना त्यांच्या मनांत एक विचित्र असूया निर्माण झाली. पण मग त्यांच्या मनांत आलं, फांशी जाणाऱ्या या

रघुनाथाचा हेवा आपण करावा हा केवढा आपला वेडेपणा. चला. आज रघुनाथ फांशी जाणार ! पैशाचा, प्रेमाचा सारा खेळ आटोपणार. त्यांनीं सुस्कारा सोडला. त्यांनीं घड्याळाकडे पाहिलं तों सहा वाजून गेले होते. चहा घेऊन झटकन् मंडई आटोपून त्यांना शाळा गांठायची होती. ते "समाचार" हातांत घेऊन सैपाकघरांत वळले आणि म्हणाले, "अग ऐकलंस कां ? ...."

पठारे चाळींतील वेणूआत्यांनीं दैनिक समाचारांतील ती बातमी वाचली मात्र, अंक तसाच हातांत घेऊन त्या तडक खोलीबाहेर पडल्या, आणि पहिल्यांदा समोर आलेल्या राधाकाकूंना म्हणाल्या, "ऐकलंत कां ? रघुनाथ चित्रे फासावर लटकणार आज ! ...."

राधाकाकूंनीं हातांतली केरसुणी, तिच्यावर रचलेल्या केरासह खालीं टाकली आणि दोन्ही हात तोंडावर धरून त्या ओरडल्या "अग्गोबाई !" आत्याबाईनीं त्यांना रघुनाथाच्या पापकर्माचा पाढा ऐकवल्यावर त्या म्हणाल्या, "करावें तसें भरावें" आणि मग खालीं साडलेला केर त्या भरूं लागल्या. हां हां म्हणतां आत्याबाईनी चाळीतलीं बायकापोरं भोवती गोळा केलीं ....

नुकतीच कायद्याची परीक्षा पास झालेली रजनी आपटे "समाचार" मधील रघुनाथ चित्रेच्या दुःखद शेवटाची ती बातमी काळजीपूर्वक वाचीत होती. समाचारनं ठळक मथळा दिला होता. 'जानकी खून खटल्यावर अखेरचा पडदा !' म्हणजे रघुनाथाच्या जीवनाचा अखेरचा अंक आज समाप्त होणार होता. रघुनाथाला त्याच्या बायकोच्या खुनाबद्दल अटक होऊन कोर्टांत त्याच्यावर खटला सुरू झाल्यापासून त्याच्या जीवनाचं सारं नाटक कोर्टापुढें उलगडलेलें तिनं पाहिलें होतें. साक्षी ऐकल्या होत्या. पुरावे पाहिले होते, अरोपाचीं आणि बचावाचीं भाषणं वकिलांनीं केली तीं ऐकलीं होतीं. पण आरोपीच्या पिंजऱ्यांत उभं राहिलेल्या रघुनाथाकडे पाहून तिला वाटलं होतं छे, या माणसाच्या हातून खून होणं शक्य नाहीं. चारी बाजूंनीं कुत्रीं अंगावर धावून आल्यावर असाहाय शौर्यानं मांजर त्या चौफेर हल्याला तोंड देऊन जसं उभं राहतं तसा रघुनाथ आरोपीच्या पिंजऱ्यांत उभा रहात असे. सरकारी वकिलानं प्रश्नांची सरबत्ती सुरूं केली कीं त्याच्या

चेहऱ्यावरचा मख्खपणा बदलत नसे, पण त्याचा डावा हात एकदम डाव्या कानाच्या पाळीशीं चाळा करू लागे.

त्या हाताचा तो नाजुक लालसर तळवा, लांबसडक बोटं पाहून रजनी आपटेच्या मनांत आलं होतं या बोटांनीं, या हातानं जानकीच्या औषधांत वीष मिसळलं असेल काय ? शक्य नाहीं वाटत. मग ती त्याच्या चेहऱ्याकड निरखून पाहूं लागे. त्याचं कपाळ अरुंद होतं. चेहरा निमुळता होता. डोळे घारे होते. बारीक होते. त्या मानानं जिवणी मोठी होती. कानशिलावरचे केस पांढरे झाले होते. शरीरानंही तो कांहीं धिप्पाड नव्हता. मध्यम उंचीचा, सडपातळ बांध्याचा. त्याचा वर्णदेखील बायकांप्रमाणें लालसर गोरा. पण रजनीला आकर्षण वाटलं होतं ते त्याच्या बारीक डोळयांचं. मोठ्या जिवणीचं. कां कुणास ठाऊक पण तिची खात्री झाली होती कीं रघुनाथाच्या हातून खून घडणं शक्य नाहीं. कोर्टाचं काम आटोपल्यावर किंवा लॉ कॉलेजांत ' जानकी खून ' खटल्याचा विषय निघाला कीं रजनी मोठ्या हिरीरीनें रघुनाथाचा निरपराधीपणा सिद्ध करूं लागे. तिचे प्रोफेसर एकच शेरा मारून तिला गप्प बसवीत. ते म्हणत, " कायद्याला भावना नाहींत. तुझ्यासारख्या भावनाप्रधान मुलीनं कायद्याच्या क्षेत्रांत लुडबुड करूं नये. "

हा शेरा ऐकला कीं रजनी आपटे चमकून अंतर्मुख होई. तिच्या मनांत येई, खरंच कायद्याच्या कठोर दृष्टीला रघुनाथाचं जें रूप दिसतं तें माझ्या स्नेहार्द्र डोळयांना दिसत नसेल काय ?

पण आतां या शंका संशयाचा अंतच झाला होता. तिच्या दृष्टीनं रघुनाथ निरपराध असला तरी कायद्यानं त्याला खुनी ठरविलं होतं. आज सकाळीं सात पंचेचाळीसला, डाव्या कानाच्या पाळीशीं हातानं चाळा करणारा, कोंडीत सांपडलेल्या मांजराप्रमाणें पिंजऱ्यांत उभा राहणारा रघुनाथ फांसावर लटकणार होता. बिचारा रघुनाथ ! रजनी आपटेला कालवून आलं. तिनं आवंढा घोटला. मनगटावरचं घड्याळ काढून गादीखालीं खोल खोल दडवलं. रोज पहांटे खणखणून घंटा वाजवून तिला जागं करणारं बटबटीत चेहऱ्याचं घड्याळ तिनं टेबलावर पालथं घातलं. तिला वाटलं, घड्याळाकडे पहाणं नको. सातापलिकडे झुकणारे काटे आपल्याला पाहवणार नाहींत ....

पण काळाला कोण रोखूं शकणार ? सेकंदा सेकंदांनीं मिनिटा मिनिटांनीं

साऱ्या घड्याळाचे काटे पुढें सरकत होते.

तुरुंगांतल्या घड्याळाचे सुद्धां ! ते काटे पुढें पुढें सरकूं लागले तशी एक विचित्र हालचाल तुरुंगाच्या अधिकाऱ्यांत सुरू झाली. रोगी प्राण सोडूं लागला म्हणजे इस्पितळांतले डॉक्टर आणि परिचारिका जशी मुकी धांवपळ करतात तशीच ही मुकी धावपळ होती. सूर्याची कोवळी उन्हं तुरुंगाच्या आवारांत शिरत होती. पण आज त्यांचं कौतुक पाहरेकऱ्यांना नव्हतं कीं कैद्यांना नव्हतं. आज त्यांच्यापैकीं एक फांशी जाणार होता. तुरुंगावर छाया पडली होती ती दुःखाची नव्हती, औदासिन्याची नव्हती. फांशीची तयारी करणारांनीं माना खालीं घातल्या होत्या त्या केवळ दुःखानं नव्हत्या. त्या दुःखांत एक विचित्र शरम दाटली होती ! माणुसकीला न शोभणारं कृत्य कायदेशीर असलं तरी शरमेनं मान खालीं घालूनच करावं लागतं. तसेच तुरुंगांतले अधिकारी वावरत होते. माना खालीं घालून. घड्याळाची टिकटिक आणि छातीची धडधड ह्यांतलं अंतरच त्यांना कळेनासं झालं होतं.

अखेर सात वाजले. फांशी देणाऱ्या तुरुंगांतल्या एकीकडच्या ठिकाणीं सारी मंडळी जमली. डॉक्टर, मॅजिस्ट्रेट, पोलिस पहारेकरी. एरवी शांत दिसणाऱ्या गुन्हेगाराचा या अखेरच्या क्षणीं ठाव सुटतो. रडणं भेकणं धडपड तो करू लागतो. ही शक्यता लक्षांत घेऊन तुरुंगाच्या अधिकाऱ्यांनीं रघुनाथाच्या दोन्ही बाजूला दोन तगडे पोलिस उभे केले होते. पण त्यांची भीति खोटी ठरली. रघुनाथ निमूटपणें फांशी जाण्याच्या ठिकाणीं धीम्या पावलांनीं चालत आला. फक्त त्याच्या गोऱ्या रंगांतली लाली पार नाहीशी झाली होती. मॅजिस्ट्रेटनं त्याला विचारलं,

" मॅजिस्ट्रेट या नात्यानं मी तुला एक प्रश्न करतों. फांशी जाण्यापूर्वी तुझी कांहीं इच्छा आहे ? "

रघुनाथानं प्रथमच मान वर केली. मॅजिस्ट्रेटकडे स्थिर दृष्टीनं पहात तो म्हणाला, " होय महाराज माझी एक इच्छा आहे. "

" सांग " मॅजिस्ट्रेट म्हणाले.

" फांशी जाण्यापूर्वी मला माझं अंतःकरण जगापुढं उघडं करायचं आहे. जें कोर्टांत मी सांगितलं नाहीं, तें आतां या अखेरच्या क्षणीं मला सांगितलं पाहिजे.... " रघुनाथ बोलूं लागला. " माझ्या बायकोचा, जानकीचा

खून केल्याबद्दल मी आज फांशी जात आहे. पण देवाशपथ मी जानकीचा खून केलेला नाहीं. मी निरपराध आहे. दर्शनी पुरावा कोर्टापुढें मांडला गेला, त्या आधारावर ज्यूरीनं मला खुनी ठरविलं, आणि न केलेल्या खुना-बद्दल मी आज फांशी जात आहे. पण एक निरपराध माणूस फांशी गेला म्हणून कोणी हळहळूं नका, असं माझं मला फांशी देणाऱ्या तुम्हांलाच नव्हे तर तुरुंगाच्या या चार भिंतीबाहेर पसरलेल्या जगाला सांगणं आहे. कारण मी मोठ्या आनंदानं फासावर चढणार आहे. या क्षणीं मला दुःख होत नाही. मृत्यूला मिठी मारण्यासाठीं मी अधीर झालों आहे. कारण एक मृत्यूच माझी माझ्या विचित्र दुःखांतून सुटका करणार आहे. माझं दुःख, माझा भोग फार वेगळा आहे. तें दुःख जानकीच्या मृत्यूचं नव्हे, उधळलेल्या संसाराचं नव्हे, एक खुनी म्हणून लागलेल्या कलंकाचंहि नव्हे. त्या दुःखाचे तडाखे कित्येक वर्षं मी गुप्तपणें सहन केले, करित आलों. आतां सुटकेचा क्षण जवळ येऊन ठेपला आहे. पण वर्षंन्‌वर्षं अंतःकरणांत दडवलेलं पाप लपवून मला जगाचा निरोप घेतां येणार नाहीं. माझं मरण जसं जाहीरपणें होणार आहे तसं माझं जगणं देखील जाहीर झालं पाहिजे. एखाद्या धोकेबाज नदीच्या पात्रांत ठिकठिकाणीं धोक्याच्या सूचना लावतात तसं पंचेचाळीस वर्षांच्या माझ्या आयुष्यांत जिथें जिथें मी ठेंचकाळलों, पडलों त्या सर्व जागा मला जगाला दाखवून ठेवायच्या आहेत, आणि म्हणायचं आहे, बाबानों सांभाळा, ही भूल पडूं देऊं नका. ''

रघुनाथ बोलतां बोलतां थांबला. आभाळ दाटून यावं तसा त्याचा चेहरा दाटून आला. तो मॅजिस्ट्रेटच्या परवानगीची वाट पहात होता. आता आपल्या पुढें कोणतें रहस्य उघड होणार याची सभय उत्सुकता भोंवतालच्या साऱ्या मंडळींना लागून राहिली. मरणापूर्वीची इच्छा पुरी करण्याचा अटोकाट प्रयत्न तुरुंगाचे अधिकारी करतात. रघुनाथाची इच्छा जितकी साधी तितकीच विलक्षण होती. एकमेकांत कांहीं खलबत करून अखेर मॅजिस्ट्रेट रघुनाथाला म्हणाले, " ठीक आहे. सांग तुझी कहाणी. तुझ्या अखेरच्या इच्छेप्रमाणं तिला आम्ही योग्य ती प्रसिद्धि देऊं. ''

एका शिपायानं पुढें सरकविलेल्या खुर्चीत रघुनाथ बसला. त्याच्या अवतीं भोंवतीं जेल प्रमुख, डॉक्टर, वॉर्डर, पोलिस अशी त्या निराळ्या

जगांतलीं माणसं उभीं होतीं. फांशीचा रेशमी फांस लोंबकळत होता. त्याच्या डोळयांवर चढविण्याची काळी टोपी घेऊन मांग उभा होता. प्राण कुडी सोडून गेला असं जाहीर करणारे डॉक्टरहि होते.

पण रघुनाथाच्या दृष्टीला ही माणसं दिसत नव्हतीं. या तुरुंगापेक्षां आणि फांसापेक्षांही भयंकर अशी त्याच्या आयुष्यांतली एक काळरात्र त्याला आठवली, दहा वर्षांपूर्वींची ती काळरात्र जशीच्या तशी त्याच्या डोळयांसमोर उभी राहिली. त्या रात्रीं घडलेला सारा प्रकार त्याला दिसूं लागला. तो भयंकर प्रकार विसरण्यासाठीं दृष्टीसमोर सदा नाचणारीं तीं भेसूर दृश्यें पुसून टाकण्यासाठीं त्यानं जन्मभर अविचार केले होते, व्यसनं जडवून घेतलीं होतीं. अंतःकरण होरपळून टाकणारी ही आठवण आतां अखेरची, या विचारानं त्याची नेहमीची भीति नाहींशी झाली होती. त्याला फांशी जाण्याला अजून अवकाश होता. तरीदेखील त्या काळरात्रीच्या तडाख्यांतून निसटल्याप्रमाणें त्याला निर्भय वाटूं लागलं होतं. जें भयंकर रहस्य त्यानं जगापासून दडवून ठेवलं होतं तें तो आज कित्येक वर्षांनीं उघड करणार होता. तो बोलूं लागला, न अडखळतां, हळूं आवाजांत तो बोलूं लागला.

" दहा वर्षांपूर्वीं एका रात्रीची गोष्ट. रात्रीचे साडेबारा वाजून गेले होते. तरी मी अंथरुणांत जागाच होतो. मी सारे दिवे मालविले होते. घरांत काळोख होता. बाहेर मुसळधार पाऊस पडत होता. पावसाची धडधट, घरांत दाटलेली काळी उदासीनता यांनीं माझा डोळा लागेना. शिवाय माझं मन त्या रात्रीं स्वस्थ नव्हतं. त्या दिवशीं दुपारीं जानकीचा आणि माझा खटका उडाला होता. मुलांना घेऊन मैत्रिणीच्या घरीं लग्नासाठीं ती निघाली होती आणि अहेरासाठीं दहा रुपये मागत होती. ज्यांना खर्च करायची ऐपत नाहीं त्यांनीं लग्नकार्याला जाऊं नये असं मी तडातडा बोललों. देण्यांचे आंकडे तिला ऐकवले. कुबेराला भीक लागणारी उधळी बायको असं कडू बोललों. अखेर ती रडली, आणि तशीच अहेर घेतल्याशिवाय मुलांना घेऊन निघून गेली. तिला रडवून मी दहा रुपये वांचविले होते. पण त्या दहा रुपयांनी माझ्या गरजा आणि कर्ज भागविणं म्हणजे फाटलेल्या आकाशाला ठिगळ लावण्यापैकींच होतं. जानकीचं रडणं आणि बिलांचे तगादे माझ्या डोक्यांत थैमान घालूं लागल्यामुळें मला झोंप कशी ती

येईना. त्यांतून घरांतला काळोख आणि बाहेर मुसळधार पावसाची झोड. मी अंथरुणांत तळमळत पडलों होतों.

इतक्यांत बाहेरच्या दारावर जोरांत थाप ऐकूं आली. मी दचकलों, अंथरुणांत उठून बसलों. थाप पुन्हां ऐकूं आली. आर्जवानं नव्हे तर धमकी देतांना मारतात तशी ती थाप होती. " कोण आहे ? " विचारण्याचा किंवा उठून दार उघडण्याचा धीर मला होईना.

त्या दिवसांत रात्रीं अपरात्रीं दार उघडणं धोक्याचं होतं. हिंदुमुसलनांचे दंगे एकदम वावटळीसारखे केव्हां आणि कुठें उठतील सांगतां येत नव्हतं. ज्वालामुखीच्या स्फोटापूर्वी जमीन हादरावी, गडगडावी तशीच पुढें होणाऱ्या फाळणीची दुश्चिन्हं दंग्याच्या स्वरूपांत दिसूं लागलीं होतीं. केव्हां घातपात होईल नेम नव्हता. मला दार उघडण्याचं धाडस होईना.

पण दारावर अधिकच थापा बसूं लागल्या तेव्हां मी उठलों आणि दिवा लावला. दाराशीं जाऊन मी विचारलं " कोण आहे ? "

" रघुनाथ चित्रे इथेंच राहतात काय ?" बाहेरच्या माणसानं विचारलं. त्याचा आवाज माझ्या ओळखीचा नव्हता, पण तो ऐकून माझी भीति पुष्कळ कमी झाली. कुणी आपल्यांतलाच असावा अशा विचारानं मी दार उघडलं. पाहतों तों फाटके मळके कपडे घातलेला एक म्हातारा पाठीवर पडशी घेऊन उभा होता. पावसाचे ओघळ त्याच्या चेहऱ्यावरून वहात होते आणि ती पडशी आणि कपडे भिजून काला झाले होते. मी ' या ' म्हणायची वाट न पाहतां तो ओलाचिंब म्हातारा घरांत शिरला. नव्हे, त्याच्या रूपानं पापाच्या दरींत मला लोटणारी भूलच माझ्या घरांत शिरली ! . . . .

# प्रकरण दुसरें

गृहस्थाश्रमी माणसांनीं अतीथि अभ्यागताचं स्वागत हंसतमुखानं करायचं असतं. ' या बसा ' म्हणायचं असतं. पण अपरात्रीं, अवेळीं घरांत घुसणाऱ्या त्या आगंतुक म्हाताऱ्याकडे पाहून रघुनाथाच्या कपाळावर नाराजीची आठी चढली. या म्हाताऱ्याला उंबऱ्याबाहेरच वाटेला लावला असता तर बरं झालं असतं असा विचार त्याच्या मनांत आला. पण बाहेरच्या पावसानं तो मार्ग बंद केला होता. वळचणीला उभ्या राहिलेल्या कुत्र्याला देखील अशा वादळांत कुणी ' हाड ' म्हटलं नसतं. मग या म्हाताऱ्याला घराबाहेर काढणं कसं शक्य होतं ? पावसाची झड आंत येऊं लागली म्हणून रघुनाथानं दार बंद केलं आणि त्यानं वळून पाहिलं तो म्हातारबुवांनीं ओल्या पडशींतलं सामान बाहेर काढलं होतं. अंगांतला सदरा जाकीट काढून एका सुक्या पंचानं ते तोंड हातपाय पुसण्यांत गुंतले होते.

रघुनाथ त्याच्याकडे पहातच राहिला. हा वृद्ध गृहस्थ कोण, कुठला आणि याचं आपल्याशीं काय काम असावं याचा कांहींच तर्क त्याला करता येईना. पावसाच्या पाण्यानं द्रोणासारखे झालेले त्याच्या पायांतले उत्तर-हिंदुस्थानी चढाव, सदऱ्या–जाकिटाची शिलाई आणि एखाद्या मुसलमानी म्हाताऱ्या गवयानं ठेवाव्या तशा झुपकेदार पांढऱ्या मिशा पाहून कुणीही म्हटलं असतं हा म्हातारा दक्षिणेकडचा नव्हे, मराठा नव्हे. पण आश्चर्य असं कीं पंचानं अंग पुसतापुसता तो ' हरे कृष्ण हरे राम ' असं पुटपुटत होता, अगदीं एखाद्या सोवळ्या भटजीप्रमाणें. कोण असावा हा गृहस्थ आणि अशा अपरात्रीं तो आपल्या घरीं का यावा याचा कांहीं तर्क रघुनाथाला करता येईना. आपल्या आप्तेष्टांचे, गणगोताचे चेहरे त्यानं आठवून पाहिले. पण त्या गोतावळयांत हा चेहरा पाहिल्याचं त्याला आठवेना. आठवणी

करण्याची साधी ताकद देखील त्याच्या मनांला आतां उरली नव्हती. त्याच्या स्वतःच्या काळज्या एवढ्या होत्या कीं हें विकृतचं श्राद्ध घेऊन सव्यापसव्य करण्याइतकी फुरसत आणि स्वास्थ त्याला होतं कुठें ? पाऊस कमी झाल्या-वर देऊं घालवून ही ब्याद असा विचार करून रघुनाथ घरांत वळणार तोंच म्हातारबुवांनी त्याला विचारलं,

" तूंच ना रघुनाथ ? कुसाताईचा एकुलताएक मुलगा ? "

" होय " रघुनाथ चमकून उभा राहिला आणि म्हणाला.

" मी तुला ओळखलं पण तूं मात्र मला ओळखलं नाहीस ना ? " म्हाताऱ्यानं विचारलं.

"नाहीं" रघुनाथ त्याच्याकड पहात म्हणाला, " तुम्ही कोण ? आणि कुसताई कशी तुम्हांला माहीत ? "

" छान !" असा उद्‌गार काढून तो म्हातारा खुर्चीच्या पाठीवर मागें टेकला आणि मग किंचित् कडवटपणें हंसत स्वतःशीच म्हणाला, " मला वाटलं होतं तुला माझी पक्कीच आठवण राहिली असेल.... "

" म्हणजे ? " रघुनाथानं आणखीच गोंधळून विचारलं.

" अरे मी तुझ्या आईचा, कुसाताईचा मावसभाऊ. तुझा मामा, किशा-मामा, आठवतो कां ? तूं लहान होतास .... "

रघुनाथ म्हाताऱ्याच्या चेहऱ्याकडे पहातच राहिला. मागचा संदर्भ लावण्यासाठीं एखाद्या ग्रंथाची पानं भराभर उलटावीं तशी गतायुष्याच्या स्मृतिग्रंथाची पानं उलटीत रघुनाथाचं मन दोन तपं मागें गेलं. खोल विहिरींत डोकावून पाहिल्यावर बऱ्याच वेळानं जसा पाण्याचा तळ आणि मोडक्या तोडक्या वस्तू दिसूं लागतात तशा बालपणींच्या कांहीं कांहीं बुजलेल्या आठवणी रघुनाथाला अस्पष्ट आठवूं लागल्या. आयुष्याचीं पस्तीस वर्षं रघुनाथानं गरीबींत रखडत ठेंचकाळत घालविलीं होतीं. जीवनाचा हा प्रवास असाच रखडत पुढें चालायचा होता. तेलाच्या घाण्याला जुंपलेला बैल मागें वळून पहात नाहीं, पुढें पहात नाहीं. त्याच्या डोळ्यांवर ढापण बसविलेलं असतं. फक्त घाण्याभोंवतीं फिरायचं आणि फिरण्यासाठीं जगायचं एवढंच त्याला माहीत असतं. एखाद्या कचेरींत, व्यापारी कंपनींत कारकुनी करून कसंबसं बायकापोरांचं आणि आपलं पोट भागविणाऱ्या रघुनाथा-

सारख्या माणसाचं जिणं आणि घाण्याभोंवतीं फिरणाऱ्या बैलाचं जिणं यांत फारसा फरक नसतो. अशीं माणसं फक्त वर्तमानकालांत रहात असतात. हीं माणसं कधीं मागें वळून पहात नाहींत. कधीं पुढें भविष्याकडे पहात नाहींत. ज्यांच्या आयुष्यांत जिवंत रहाणें हेंच पूर्व दिव्य, त्यांना रम्य भाविकालाचीं स्वप्नं कुठून दिसणार? रघुनाथानं आयुष्याच्या वाटचालींत कधीं मागें वळून पाहिलं नव्हतं. कधीं पहावं, बालपणीचे ते दिवस कधीं आठवावे अशी इच्छाच त्याला झाली नव्हती. उलट रघुनाथ लहान होता तेव्हां तें बालपण कधीं संपेल आणि आपण मोठे केव्हां होऊं अशी उतावळी त्याला लागलेली असे. दर शनिवारीं लहानशा घुमटींत हातावर द्रोणागिरी उचलून उड्डाणाच्या पावित्र्यांत उभा राहिलेल्या मारुतीपुढें खिशांत पाझरलेली चिकट खडीसाखर ठेवून तो प्रार्थना करीत असे, "देवा मला लवकर मोठा कर, म्हणजे मी या मामिटल्याच्या कचाटयांतून सुटेन..."

रघुनाथ त्या म्हाताऱ्याच्या चेहऱ्याकडे पहातच राहिला. "मी तुझा मामा, किशामामा. आठवतो का?" असा प्रश्न, एखाद्या मुसलमान गवयाप्रमाणें पांढऱ्या भरघोस मिशा ठेवलेला हा म्हातारा त्याला विचारीत होता. हा किशामामा? खरं वाटत नाहीं. माणसं इतकी बदलत असतील काय? आतां एखाद्या फकीराप्रमाणें दिसणारा हा वृद्ध एकेकाळीं मिशा साफ काढणारा, अलपाकचा कोट आणि बो लावलेल्या काळ्या पंपशूची ऐट करणारा, आणि लहानांना छडीची आणि मोठयांवर बेडीची हुकमत चालविणारा, आपल्या लहानपणींचा तो किशामामा असेल काय? रघुनाथ त्या म्हाताऱ्याकडे न्याहाळून पाहूं लागला. आणि मग धागा सांपडल्यावर सारी गुंतागुंत उलगडत जावी तशा त्याच्या गुरफटलेल्या स्मृती उलगडत गेल्या. त्या म्हाताऱ्याच्या डोळयांकडे पाहतां पाहतां रघुनाथाला ओळख पटली. हीच ती किशामामाची करडी नजर, जिच्या धाकांत आपलं सारं बालपण गेलं. पांढऱ्या शुभ्र मिशांच्या म्यानांत मिटलेली हीच ती ओठांचीं पातीं, ज्यांच्या कठोर धावांनी आपल्या बालपणाचे सारे सारे अंकुर छाटले गेले..रघुनाथाच्या डोळयांत विषादाची तीव्र छटा चमकली. पण क्षणभरच. गतं न शोचयेत्. त्यानं एक सुस्कारा सोडला. विरहानं प्रेम वाढतं म्हणतात, त्याचप्रमाणें द्वेषाची धारही बोथट होते. शिवाय आतां

तें बालपण संपलं होतं, किशामामाची जुलमी सत्ताही संपली होती. उरलीं होतीं फक्त आठवणींचीं थडगीं. तीं उकरून कशाला काढा अशा विचारानं रघुनाथ हसला आणि म्हणाला,

"आतां बरोबर ओळख पटली मामा. प्रथम मी तुम्हांला ओळखलंच नाहीं. कारण तुमच्या हातांत छडी नव्हती ना."

"अस्सं ! म्हणजे माझ्या उपदेशापेक्षां माझ्या छडीचा मारच तुझ्या लक्षांत राहिलेला दिसतोय." मामा हंसून म्हणले. पण रघुनाथाच्या शब्दांतली धार त्यांना बोचल्याशिवाय राहिली नाहीं. ते म्हणाले, "अरे बाबा, कुसाताईला मी नेहमी बजावायचा या पोराला सैल सोडू नको. लाडावून ठेवलास तर एके दिवशीं तुरुंगांत जाईल..."

हा वार मात्र रघुनाथाच्या जिव्हारीं लागला. त्याच्या बारीक डोळयांत राग विजेसारखा चमकून गेला. कोणतीही भावना असह्य झाली कीं त्याचा डावा हात डाव्या कानाच्या पाळीशीं चाळा करूं लागे. आतांही त्याचा हात एकदम कानाशीं गेला. पावसाची झड आंत येऊं नये म्हणून त्यानं मघा दार बंद केलं होतं, तसा हा विषय बंद करतां आला असता तर किती बरं झालं असतं. रघुनाथ चटकन् उठला आणि म्हणाला,

"मामा तुमचा उपदेशही लक्षांत ठेवला मी. म्हणूनच आज पोटापुरतं मिळवतो आहे. कारकुनी करून बायकोपोरांना पोसतो आहे—पुष्कळ झालं. आणखी काय पाहिजे ? चला जाऊं द्या तो विषय. तुम्हांला चहा कॉफी कांहीं ?"

"आधीं स्नान करतों— गरम पाण्यानं...."

"ठीक. मी पाणी देतों तापवून...."

"तुझ्यावर कां पाळी ? बायकामाणसं नाहींत कुणी घरांत ?" मामांनीं विचारलं.

"जानकी मुलांना घेऊन मैत्रिणीकडे लग्नाला गेलीय्. उद्या दुपारपर्यंत येईल."

"तुला दोन मुलं पण आहेत म्हणायची."

"होय, मोठा आनंद आहे बारा वर्षांचा, आणि कुसूमला नुकतीच दहा संपलीं."

"आणि कुसाताई ?"

"तुम्ही घर सोडल्यावर दोन वर्षांतच ती वारली."

"अरेरे नातवंडाचे लाड करण्याचं सुख तिच्या नशिबीं नव्हतं म्हणायचं." मामांनी सुस्कारा सोडला.

तो सुस्कारा ऐकताच विंचवानं फटकारा मारावा तशा वेदना रघुनाथाच्या अंत:करणाला झाल्या. त्याच्या मनांत आलं या ढोंगी माणसाला खणखणीत जाब विचारावा, "बाबा, कशाला सुस्कारा सोडतोस ? नातवंडाचे लाड करायला ती जिवंत नाहीं म्हणून कां हळहळतोस ? बालकांचे लाड करावे, हट्ट पुरवावे, कोडकौतुक करावं अशी भूक स्त्रीहृदयाला लागते हें ज्ञान तुला ती मेल्यावर सुचावं ना ? ती जिवंत होती, पतिनिधनाच्या दुःखानं भाजली पोळली होती, पोटचा एकुलता एक मुलगा हाच तिच्या जीवनांतला ओलावा होता, तेव्हां शिस्तीची कडक भिंत तूं आम्हां मायलेकरांमध्यें उभी केलीस. सैंपाकघरांत आईनं मला पोटाशीं घेतलं कीं तूं दरदरा ओढीत मला सोप्यावर ढकलावंस. तिनं माझा कैवार घेतला कीं उलट तिलाच अडाणी ठरवावीस. अशा झगडयांत मीही तिच्या प्रेमाला मुकलों आणि तीही माझ्या प्रेमाला मुकली. फार उशीरा शहाणपण आलं तुम्हाला मामा...." पण हे सारे विचार गिळून रघुनाथ घरांत जातां जातां एवढंच म्हणाला, "पोटच्या पोराचे लाड करण्याचं सुख तरी माझ्या आईच्या नशिबीं कुठें होतं ?"

रघुनाथ सैंपाकघरांत गेला. स्टोव्ह पेटवून त्यानं स्टोव्हवर पाण्याच मोठं पातेलं ठेवलं, आणि पंप केला तों स्टोव्ह एकदम भडकला. अगदीं त्याचं मन जसं भडकलं होतं तसाच. त्यानं स्टोव्हची किल्ली सोडली तेव्हां भडकलेल्या ज्वाला आटोक्यांत आल्या. परंतु मनांत उसळलेला कल्लोळ शांत करण्याची किल्ली कुठें त्याच्या हातांत होती ? मधाचं पोवळं दगड फेंकून कोणी डिवचलं म्हणजे मोहोळाच्या माशा पिसाळून उठतात त्याप्रमाणें त्याचं डिवचलं गेलेलें मन पिसाळून उठलं होतं. रघुनाथानं आवंढा गिळला. डोळे घट्ट मिटले, हातांनीं डोकं दाबून धरलं. तरी त्याच्या डोळ्यांसमोर आईची मूर्ति दिसूं लागली. कपाळाला कुंकू लावलेली, हातागळयांत अलंकार ल्यालेली नव्हे, तर पांढऱ्या कपाळाची आणि दीनवाणी दिसणारी ! ती

माजघरांत अंधारांत बसली होती आणि मामा तिला पुन:पुन्हां म्हणत होता, "आतां इथें शहरांत राहून भागणार नाहीं. इथलं बिऱ्हाड मोडून शिपूरला शेतावर जाऊन राहूं या." शिपूरला शेतावर जायचं हे शब्द कानांवर पडतांच अजाण पांच वर्षांचा रघुनाथ नाचूं बागडूं लागला होता. आपला विटीदांडू, गलोर, केपा उडवायचं पिस्तुल, गुळगुळीत वाटोळ्या गोट्यांचा संग्रह, वगैरे वस्तूंचं त्यानं बोचकं देखील तयार केलं होतं, आणि निघण्याच्या वेळेपर्यंत तो आईला विचारीत होता, "आई– पण बाबा येणार आहेत ना ग? कुठें आहेत ते?"

रघुनाथाला शिपूरचं पहिलं दर्शन झालं तें संध्याकाळीं. घाटातली ळ च्या आकाराची वळणं घेत धापा टाकीत उतारूंनीं खच्चून भरलेली मोटार शिपूरच्या वळणावर उभी राहिली. क्लीनरनं धांवत जाऊन एक भला मोठा दगड मोटारीच्या मागच्या चाकाखालीं आधारासाठीं ठेवला आणि टपावर चढून कुसाताईचं सामान रस्त्यावरच्या धुळीतच टाकलं. मामा, कुसाताई आणि रघुनाथ यांना सोडून फर्रफर्र आवाज करीत धुळीचे लोट उधळीत मोटार घाटाच्या वळणाआड दिसेनाशी झाली. रघुनाथाला पुढें ओढून हात उंच करून एक टेकडी दाखवीत मामा म्हणाले, "हे शिपूर. आपलं घर. चढशील ना डोंगर?"

रघुनाथानं मान उंच करून वर पाहिलं तों तो ज्या टेकडीच्या पायथ्याशीं उभा होता त्या टेकडीवर गांव वसलेलं त्याला दिसलं. एका देवळाचा पांढरा कळस आणि पत्र्याची छप्परं असलेली ठेंगणी उंच घरं पण दिसलीं. तो उभा होता तें एक लहानसं खोरं होतं आणि शिपूरच्या टेकडीनं त्या खोऱ्याच्या गळ्याभोंवतीं जणु हात टाकले होते. तिन्ही बाजूंनी ते चिमुकलं खोरं टेकड्यांनीं वेढलेलं होत. खेडुत सुवासिनीनं कपाळाला चिरी लावावी तशा टेकड्यावर आडव्या पाऊलवाटांच्या रेघा दिसत होत्या आणि त्यावर चिकटविलेल्या तांदळाच्या दाण्याप्रमाणें रानांतून घरीं परतणाऱ्या गुरांचे एकसर सरकत होते. शिपूरवर चढणारी वाट मध्येंच एका गर्द झाडींत लपली होती. आणि त्या झाडींतल्या पाणोठ्यावर शेतावरून परतलेले बैल थंड प्राणी पिऊन ताजेतवानें होऊन डुरकाळ्या फोडीत होते. त्यांचा दबलेला प्रतिध्वनी रघुनाथला ऐकूं येत होता. अंगाशीं खट्याळ झोंबाझोंबी

करणारा तो मोकाट डोंगरवारा, सोंगट्याचा पट पसरावा तशी दिसणारी लहान लहान चौकोनी शेतं, गायी म्हशींची खोल हंबरणीं, गुराख्यांच्या आरोळ्या – सारं वातावरण चिमुकल्या रघुनाथाला फार आवडलं. मामाचा हात धरून तो मोठ्या आवेशानं डोंगर चढूं लागला. इतक्यांत खोऱ्याच्या तळाशीं झाडींत दडलेल्या नीलकंठेश्वराच्या देवळांतून घंटानाद झाला. तो घंटानाद कांहीं क्षण दुमदुमत राहिला. रघुनाथाच्या आईनं हात जोडले आणि दाटलेल्या गळ्यानीं ती म्हणाली, "नीलकंठेश्वरा, तूंच आतां माझ्या बाळाला संभाळ –"

यावर तिच्याकडे रागानं वळून पहात मामा म्हणाला होता, "बस कर असली भाषा कुसाताई. रघुनाथाचे वडील वारले असले तरी त्याचा संभाळ करायला मी समर्थ आहे. माझ्या हाताखाली शिकवून मी त्याला तयार करीन."

मामाच्या हाताखालीं रघुनाथाचं शिक्षण सुरू झालं. गांवांत चावडी-शेजारच्या लहानशा घरांत कुसाताईनं बिऱ्हाड मांडलं. बाहेरच्या सोप्यांत झोपाळ्याच्या लहानशा पाटावर झोके घेतघेत मामा कुळांशी गप्पागोष्टी करीत. कधी गोडीगुलाबीनं तर कधीं दमदाटीनं. कुसाताईच्या शेतजमीनीची व्यवस्था आतां मामानं ताब्यांत घेतली होती. कुसाताई मागील दारीं सैंपाकघरांत कामांत गुंतलेली असे. चिमुकल्या रघुनाथाला वाटलं होतं आतां खेळायला रानच मोकळं. परसांतले चिंचा आवळे गलोरीनं वाटेल तितके पाडावे, चावडीवर जमलेल्या पोरासोरांना गोळा करून विटी-दांडूचा खेळ धुमधडाक्यान सुरू करावा, गोट्यांच्या बदली मोरपिसांचा सौदा करावा. या उत्साहाच्या भरांत रघुनाथानं सारं घर गोट्या, गलोरी, विट्या आणि दांडू यांनीं भरून टाकलं. त्याची हरवलेली विटी शोधून देतां देतां, घरांतल्या गोट्या गोळा करतां करतां, त्यानं जमविलेल्या पोरासोरांच्या हातावर गुळाचे खडे ठेवतां ठेवतां कुसाताई एकीकडें रडत आणि एकीकडे हसत.

पण एके दिवशीं मामांनीं रघुनाथाची सारी खेळणीं गोळा केलीं आणि माळ्यावर फेंकून दिलीं. "आतां तुझ्या अभ्यासाला सुरवात करायची" असे उद्गार काढून त्यांनीं रघुनाथाच्या बालपणाचा दरवाजा खाडकन् बंद केला.

तो नंतर कधींही उघडला नाहीं.

सूर्य नमस्कार, परवचे, आणि रामरक्षा इत्यादींचं पाठांतर रघुनाथ करूं लागला. त्याच्या मनाची बाळवृत्ति लोपत चालली. परंतु टांग्याचं घोडं कितीही वाकवलं तरी अधून मधून बंड करून उठतं त्याप्रमाणें शिस्तीची वेसण घातलेला रघुनाथ बंड करून उठे. अमूक हवं, तमूक हवं. असा हट्ट धरी. कुसाताईचा जीव कळवळे. पण मामानीं शिस्तीचा लगाम कधीं सैल सोडला नाहीं. घोड्याच्या बुजण्याच्या जागा आणि वेळा ठरलेल्या असतात तशा रघुनाथाच्या त्राग्याच्या गोष्टी ठरून गेल्या होत्या. शिपूरच्या इनामदारांचीं मुलं सुटींत वाड्यांत राहयला आलीं कीं रघुनाथाचं चित्त थाऱ्यावर नसे. आकाशांत भराऱ्या मारणाऱ्या पाखरांकडे पाहून पिंजऱ्यांतल्या पाखरानं करावा तसा फडफडाट तो करी. त्या श्रीमंत मुलांच्या अंगावरचे सुंदर कपडे, हातांत सतत दिसणारी गोड मिठाई, आणि नोकराचाकरांकडून त्यांचं सदा होणारं कोडकौतुक पाहून रघुनाथाच्या बालमनांत मत्सराची आग धुमसूं लागे. एखाद्या अडेल तट्टाप्रमाणें तो घरांत वागूं लागे. रुसण्याफुगण्यापाई आईला टेकीला आणी आणि मामाचा मार खाई.

रघुनाथाच्या बाळपणांतील अशीच एक संध्याकाळ. झाडांवर पाखरांचा आणि अंगणांत पोरासोरांचा किलबिलाट वाढला होता. दिवसभर चालविलेली पतंगाची धामधूम अजूनहि चालू होती. आंत देवघरांत मांडी घालून हात जोडून बसलेल्या रघुनाथाला हा कलकलाट ऐकूं येत होता. दूर आकाशांत भिरभिरणारा पतंग त्याच्या डोळ्यांना देवघरांतल्या अंधारांतहि दिसत होता. पतंगाला खेचण्याचं अपूर्व सुख त्याच्या मिटलेल्या पंजांनाहीं कळत होतं. त्याची चिमुकली कुडी फक्त देवघरांत होती. त्याचं सारं चित्त बाहेर पतंग उडविणाऱ्या पोरांत बागडत होतं. त्याच्या तोंडचे रामरक्षेचे श्लोक बंद पडले. जो पतंगाचा खेळ खेळण्याची बंदी मामानीं त्याला केली होती तो असा कल्पनेनं खेळण्यांत रघुनाथ गुंतला होता.

"रघ्या!" अशी मामाची हाक कानीं पडतांच रघुनाथ दचकला. "लेका, रामरक्षा म्हणतोस कीं झोपा काढतोस? चालू दे" असं त्यांच्या तोंडचं दरडावणं ऐकतांच रघुनाथाचं तोंड गिरणीच्या पट्ट्यासारखं हाल लागलं. त्याच्या चेहऱ्यावरची ती क्षण दोन क्षण उमटलेली उत्सुकता

मावळली. उतरलेल्या पोक्त आवाजांत तो म्हणूं लागला,

दक्षिणे लक्ष्मणोयस्य वामेतु जनकात्मजा ।
पुरतो मारुतिर्यस्य तं वंदे रघुनंदनम् ।

बाहेर चाललेली पतंगाची धामधूम त्याला ऐकाविशी वाटत होती, पण जिचा कांहींच अर्थबोध त्याला होत नव्हता ती रामरक्षेची चर्पटपंजरी चालू ठेवणं भाग होतं. रघुनाथ रडकुंडी आला. पुढेंपुढें तर त्याला शब्द उच्चारवेना.

सांजवात लावण्यासाठीं कुसाताई देवघरांत आल्या. त्यांनीं मोठी समई लावली. ज्योतीच्या उजेडांत त्या पाहतात तों रघुनाथाच्या डोळयांतून आसवं गळत होतीं. त्या त्याच्या जवळ गेल्या तेव्हां त्यांच्या पायाभोंवतीं विळखा घालून रघुनाथानं त्यांच्या ओच्यांत तोंड लपवलं. त्यांनीं त्याला पोटाशीं घेतलं तेव्हां "पतंग!" एवढे शब्द कसेबसे उच्चारून रघुनाथ गदगदा रडूं लागला. पण आईच्या कुशीत तोंड दाबून. आपलं रडणं मामाच्या कानीं पडूं नये अशी खबरदारी घेऊन....

एकदां इनामदारांच्या धाकटया मुलाला नवे लाल बूट त्याच्या वडिलांनीं शहरांतून आणवले. नवे बूट घालून इनामदारांचा बाळ सारखा लेफ्टराईट करीत हिंडत होता. दिसेल त्यापुढें उभा राहून विचारीत होता, "कसे आहेत माझे नवे बूट लाल लाल! तुला कुठें आहेत असले? हुर्यो!" पण रघुनाथापुढें बाळची बढाई चालली नाहीं. बाळानं एकदम भोकाड वासलं. "मामा अहो मामा!" असं पुकारत तो झोपाळयाच्या पाटावर बसलेल्या मामापुढें उभा राहिला अन् म्हणाला, "बघा हो तुमचा रघ्याफग्या माझ्या बुटाला घाण घाण म्हणतो आणि थुकतो."

"काय?" असं ओरडून मामा ताडकन् झोपाळयावरून उठले होते. सैंपाकघरांत पानावर फुरंगटून बसलेल्या रघुनाथाला दरदरा ओढून बाळा-समोर उभं करून विचारीत होते, "काय रे, काय म्हणालास? घाण आहेत काय बाळचे बूट? मग पूस तर. चल वाक. पूस त्याचे बूट!"

रघुनाथ ताठच उभा राहिलेला पाहून त्यांनीं त्याचा दंड धरला आणि पुढें ढकललं, तों रघुनाथाचा तोल जाऊन तो नाकावर पडला. नाकांतून भळभळा रक्त वाहूं लागलं. पण बहाद्दर वाकला नाहीं. अखेर कुसाताई

मधें पडल्या. रघुनाथाला घरांत घेऊन गेल्या. त्याला त्यांनीं कांदा हुंगायला दिला. पदरानं त्याचं नाक टिपीत त्यांनीं त्याला विचारलं, "राघवा, तूं असं कां वागतोस बाळ ?" त्यांच्या या प्रेमळ प्रश्नानं देखील रघुनाथाच्या चेहेऱ्यावरच्या आंठ्या कमी झाल्या नाहींत. त्यानं फक्त आईकडे पाहिलं. तुला माहीत असून तूं मला विचारतेस असाच त्या दृष्टीचा अर्थ होता. कुसाताई कांहीं बोलल्या नाहींत. शून्य दृष्टीनं त्या रघुनाथाच्या पावलांकडे पहात राहिल्या. डोंगरांत अनवाणी चालण्यामुळें रघुनाथाचे पाय किती फुटले होते, काळवंडले होते. टांचांना केवढे मोठे कात्रे पडले होते. कुसा-ताईचा हात पुढें झाला आणि त्या खडबडींत तळव्यावरून फिरूं लागला.

दुसरे दिवशीं बाळच्या नव्या बुटाची चौकशी करीत इनामदारांचा नोकर कुसाताईंच्या घरीं आला. बाळाचे बूट हरवले होते आणि त्याच्या तलासांत तो नोकर होता. "आमच्या घरांत नाहींत" असं सांगून कुसाताईनीं नोकराला वाटेला लावला. त्या स्नानाच्या तयारीला लागल्या. मागच्या पडवींत सहा घागरीच्या हंड्याखालच्या चुलाणांत तुरकाट्याचे जळण धगधगलें होतें. तोंच मामा नाकपुड्या भाल्यासारख्या हलवीत इकडे तिकडें हिंडू लागले आणि म्हणाले, "चामडं जळल्याचा वास येतोय् कुठून तरी."

कुसाताईचं लक्ष चुलाणाकडे गेलं, तों त्या आगीत एक तांबडा बूट धुमसत होता. त्या चटकन् म्हणाल्या, "पुढच्या दारी कांहीं जाळलं असेल कुणी" पण त्यांचा बेत फसला. मामाचं लक्ष त्या धुमसणाऱ्या बुटांकडे गेलं. क्षणभर स्तिमित होऊन त्या जळणाऱ्या बुटाकडे ते पहातच राहिले. मग त्यांचा चेहरा एकदम उग्र दिसूं लागला. "या कार्ट्याचंच हें काम" असें बोलून ते घरात शिरले.

रघुनाथाला पुढें ओढून तो जळणारा बूट दाखवून मामा म्हणत होते, "ज्या हातानं तूं तो नवा कोरा बूट विस्तवांत टाकलास त्या हाताला मला डाग द्यायचा आहे. दुसऱ्याच्या वस्तूचा हेवा करूं नये असा धडा तुला शिकवायचा आहे. जन्मभर आठवण राहिली पाहिजे तुला !"

मामांनीं निखारा उचलला आणि तो ते रघुनाथच्या पालथ्या पंजावर टेकणार तोंच वाघिणीसारखी कुसाताई पुढें धावली. रघुनाथाला एका हिसक्यात ओढून पोटाशी धरीत ती मामाला म्हणाली,

"खबरदार माझ्या बाळाला हात लावशील तर. खबरदार. खूप पाहिलं. खूप सहन केलं. पण आतां डोक्यावरून पाणी गेलं."

कुसाताईकडे तिरस्कारानें पहात मामा म्हणाले होते, "ठीक आहे. घे कैवार लेकाचा. पण तुला सांगून ठेवतो हा कार्टा अघोरी आहे. मत्सरापायीं यानं आज बूट जाळला. उद्यां कुणाचा प्राण घ्यायला कमी करायचा नाहीं हा. अशा गुणानें एके दिवशीं तुरुंगांत जाईल."

मामाचं फडाफडा चाललेलं बोलणं सपेपर्यंत कुसाताई तशीच उभी होती, रघुनाथाला पोटाशी घेऊन. तिच्या साऱ्या अंगाचा थरकांप उडाला होता. नंतर कितीतरी वेळानं तिचा तो कंप थांबला. रघुनाथाचं मस्तक कुरवाळीत ती एवढंच म्हणाली,

"राघवा, असं माथं भडकूं देऊं नको. अविचार करूं नको. यापुढें तुला जें पाहिजे तें मी तुला देईन."

तंग वातावरणांत दिवस चालले होते. आई मुलाला बिघडविते असं मामा ज्याला त्याला सांगत सुटले होते. तर मामा घर बळकावून बसला अशी तक्रार कुसाताई बाया-बापड्यांशीं करीत होती.

एकदां कुसाताई विहीरीचं पाणी घेऊन घरीं आली तो घरांत सामसूम होतं. ती मनाशीं थोडी चरकली. मामा भाचे दोघेही धोकेबाज. यांची माथी कशीं भडकतील आणि त्या भरांत त्यांच्या हातून काय घातपात घडेल नेम नव्हता.

दाराजवळच्या कोपऱ्यांत मामाचे बूट नव्हते. तो कुठेंतरी बाहेर गेला असावा. पण राघवाची चाहूल कशी लागत नाही घरांत या विचारानं कुसाताई एकदम अस्वस्थ झाली. तिनं कडेवरची घागर डबऱ्यांतच ठेवली आणि ती हांका मारत सुटली, "राघव! ए राघव! कुठें आहेस तू?"

अखेर राघव तिला आढळला तो कोठीच्या अंधाऱ्या खोलींत रुसून बसलेला. त्याला सुखरूप पाहून तिचा जीव भांड्यांत पडला. त्याला ओढून जवळ घेत ती म्हणाली, "किती भ्यालें मी. मला वाटलं . ." पण काय वाटलं ते ती बोलून दाखवूं शकली नाहीं.

"पाहिजे ते माग असं म्हणाली होतीस ना?" रघुनाथानं तिला विचारलं

"हो. काय पाहिजे तुला? कशासाठीं रुसलास तूं?"

" मला टोपी पाहिजे. जरीची. अशी पुढें उंच असलेली. मागें निमुळती होत गेलेली. होडीसारखी. जरीकाम केलेली आणि मानेकडच्या टोकाला मखमलीच्या दोन फिता असलेली. आणशील ? आत्तां ? "

" जरीची टोपी तर तुझ्या मुंजींत घ्यावयाची आहे ना ? "

" मला आत्ता पाहिजे."

" असा हट्ट करूं नये राघव."

रघुनाथ तिच्या मिठींतून दूर झाला. आईच्या शब्दावर त्याच्या आशेची सारी मदार होती. पण तीही कोसळल्यामुळें त्याचा चेहरा एकदम उतरला. " पाहिजे तें माग मी देईन असं खोटं का सांगितलंस ? " असा एकच प्रश्न विचारून त्यानं बाहेरचा रस्ता धरला.

कुसाताई एकदम धांवली, त्याला छातीशीं धरून म्हणाली, " आणूया तुला हवी तसली टोपी. "

" आत्तां ?"

" हो आत्तां. बाबू चव्हाणाला बोलावून आण. त्याला शहरांत धाडतें."

" पैसे कुठले ?" रघुनाथानें तिला भाबडेपणानें विचारलं.

खरंच ! पैसे कुठले ? आठ दहा रुपये तरी तसल्या टोपीला पडत असतील. मामाकडे पैशासाठीं हात पसरण्यापेक्षां मरण बरं असं अलिकडे तिला वाटूं लागलं होतं. जरीच्या टोपीची रघुनाथाची हौस पुरी करण्यासाठीं तो एवढे पैसे खर्चील हेंही शक्य नव्हतं. आज त्याचे वडील जिवंत असते तर एका क्षुल्लक टोपीसाठीं एवढ्या खटपटी लटपटी कशाला कराव्या लागल्या असत्या ? पण पैशाची अडचण पोराला काय सांगायची ! मनाशीं कांहीं योजून ती रघुनाथला म्हणाली, " तूं आण चव्हाणाला बोलवून. "

चव्हाण आला तेव्हां ठेवणींतली पायांतली चार चांदीची जोडवी त्याच्या हातावर ठेवून ती म्हणाली, " हे डाग सराफाकडे मोड आणि रघुनाथासाठीं मखमलीची जरी शेमल्याची टोपी घेऊन ये. "

चव्हाणाची वाट पहात चावडी शेजारच्या लिंबाऱ्याच्या उंच फांदीवर रघुनाथ केव्हांचा चढून बसला होता. वेशींत चव्हाण दिसतांच त्यानं फांदी-वरून उडीच टाकली आणि तो धुम पळाला. चव्हाणाला वाटेंत गाठून त्याच्याजवळचा कार्डबोर्डाचा डबा हिसकावून घेऊन रघुनाथ घराकडे

धांवला, अंगणांत आईला बघून ओरडला.

" आई ! टोपी आली ! टोपी आऽली ! टोपी आऽली ! "

त्याचा तो आनंद पाहून कुसाताईला गहिंवरून आलं. रघुनाथाच्या डोक्यावर आपल्या हातानं टोपी घालावी असं वाटून त्यांनीं हात पुढें केला. पण रघुनाथ कुणालाच हात लावूं देईना. " माझी टोपी, मी घालणार " अशी त्याची बडबड चालूं होती. शेवटीं त्यानं डबा उघडला. जरीचं भरत काम केलेली जांभळ्या मखमलीची ती सुंदर टोपी त्यानं भीतभीतच बाहेर काढली तेव्हां त्यावरच्या झिगाच्या लखलखाटानं त्याचे डोळेच दिपले. त्यानं ती डोक्यावर घट्ट दाबून बसवली, आणि आईला विचारलं, " कशी दिसते ग आई टोपी ? मी दिसतो इनामदारांच्या बाळसारखा ? "

" छान. फार छान दिसतो माझा राघव.. तुला दृष्ट लागेल माझी. " असं ती म्हणाली आणि तिला एकदम रडूच कोसळलं. तिच्या मनांत आलं अशा सुंदर टोपीखालीं शर्ट रेशमी पाहिजे. उंची कापडाची लांडी विजार पाहिजे. खाली पायांत लाल बूट पाहिजेत. असा पोषाख केलेला राघव मला कधीं दिसेल काय ? आतां त्याचे मळके फाटके कपडे त्या टोपीशीं किती विसंगत दिसत होते. पण त्याची त्याला कल्पना नव्हती. तो टोपीच्या आनंदांत होता. नाचत बागडत होता. अंगणांत पोरंसोरं गोळा करून टोपी मिरवीत होता. बायाबापड्याहि कुतुहलानें जमल्या होत्या. त्यांचा तो दंगा पाहून अखेर कुसाताई म्हणाली, "अरे पुरे आतां. आण इकडे टोपी. ठेवूं या पेटींत. " मामा येण्याच्या आंत तिला ती दडवायची होती. इतक्यांत मामाचे बूट वाजलेच. अंगणांतलीं मुलं पांगलीं. बाया पटापट नाहींशा झाल्या. आणि टोपी डोक्यावर दाबून धरीत रघुनाथ आईच्या पाठीशीं जाऊन उभा राहिला.

" काय रे ? कसली गडबड आहे. पुढें ये. " मामा ओरडले.

रघुनाथ पुढें आला.

त्याच्या डोकीवरच्या टोपीकडे बराच वेळ पाहून मामांनीं विचारलं, " कुणी आणली टोपी ? "

" म्या आनली जी. " कोपऱ्यांत उकिडवा बसलेला चव्हाण म्हणाला.

" तुला कोणी सांगितले होते कारभार ? " मामा गुरगुरले.

" मी आणवली. " कुसाताई दाराआडून बोलल्या.

" अस्सं ! आण ती टोपी इकडे. " मामांनीं हुकूम सोडला. रघुनाथ आढेवेढे घेऊं लागला तशी चव्हाण त्याला म्हणाला.

" दाखवा कीं मामासाहेबांना टोपी. "

पण रघुनाथानं टोपी डोक्यावर घट्ट दाबून धरली.

मामा उठले. एका हिसक्यांत त्यांनीं रघुनाथाची टोपी काढली. कार्ड-बोर्डाच्या डब्यांत पहिल्यासारखी गुंडाळली आणि ते चव्हाणाला म्हणाले, " आणलीस तशी टोपी परत करून ये. "

" पण मामासाहेब, लेकराची हौस – "

" चूप. टोपी परत करून ये. "

" चव्हाण, आण ती टोपी इकडे. मी ती माझ्या पैशातनं माझ्या लेकरा-साठीं आणलीय्. " कुसाताई म्हणाली.

" मूर्ख आहेस तूं कुसाताई. पैसा कुणाचा, लेकरूं कुणाचं हा प्रश्न महत्त्वाचा नाहीं. ज्या संवयी आपल्या ऐपती बाहेरच्या आहेत त्या मुलांना जडविणं हा गुन्हा आहे. आज मुलाला जरीच्या टोपीची चट लागली, उद्यां आणखी कसली लागेल. आणि अशा चटी भागविण्यासाठीं तो वाटेल तें पाप करील. कुसाताई, मुलाच्या रडण्या भेकण्याला भिऊन त्याचे आज फाजिल लाड करूं लागलीस तर तो उद्यां बहकेल. एक दिवस तुरुंगांत जाईल. चव्हाण जा देऊन ये ती टोपी परत.... "

चव्हाण खालच्या मानेनं टोपी घेऊन निघून गेला. कुसाताईला वाटलं रघुनाथ रडेल ओरडेल. पण रघुनाथ शांत होता. तो रडत नव्हता. आईला बिलगला नव्हता. मात्र त्याचा चेहरा पांढरा फटफटीत पडला होता. जांभळ्या मखमलीची झगमगणारी ती जरीची टोपी त्याच्या जीवनांतून कायमची निघून गेली होती. जातां जातां तिनं एक भयंकर गोष्ट केली होती. रघुनाथाच्या उत्कट आनंदाचं तिनं द्वेषाच्या जहरांत रूपांतर केलं होतं. क्षणांत रुसणारं क्षणांत हसणारं त्याचं चंचल कोवळं बालमन या अमानुष आघातानं बर्फासारखं एकदम गोठून गेलं होतं. कोणताही दुःखाचा प्रहार निर्विकार मुद्रेनें सोसायची संवय त्याला या प्रसंगापासूनच जडली. मांजराच्या जातीचा दुराग्रही मख्खपणा त्याच्या तोंडावर दिसूं लागला तो

या प्रसंगापासूनच. या प्रसंगानं त्याला आईवेगळं केलं. तिच्या दुबळेपणाचा त्याला तिटकारा आला. मामाविषयीं तर त्याच्या अंतःकरणांत उसळणारं जहर अती तीव्र होतं. आतांपर्यंत त्याची वृत्ति आज्ञाधारक लेंकराची होती. परंतु यापुढें रिंगमास्तरच्या पिस्तुलाला भिऊन वाकणाऱ्या पण त्याला बेसावध पाहून पंजा मारणाऱ्या हिंस्त्र सिंहासारखा तो वागूं लागला.

रघुनाथाच्या बाळपणांतील आणखी असा एक प्रसंग लवकरच घडला कीं ज्यामुळें त्याच्यावरची मामाची जुलमी सत्ता अचानक संपली, पण त्याच्या आईचा उरला सुरला धीरही खचला !

थंडीपडशामुळें डोक्याभोंवतीं मफलर गुंडाळून मामा पुढच्या छोटया माडींत पडले होते. ती संधि साधून रघुनाथ घराबाहेर सटकला, आणि सरळ बाळच्या वाडयाकडे धावला. इनामदारांचा बाळ दुसरे दिवशीं सुटी संपवून जायचा होता. म्हणून त्याच्या आजोबांनीं खास मुंबईहून त्याच्यासाठीं सुंदर खेळणीं मागवलीं होतीं. त्या खेळण्यांत खरोखरच्या रूळावर फिरणारी एक आगगाडी होती. आगगाडी सुरू झाली कीं शिटी वाजे आणि रुळापाशीं आपापल्या डब्यापाशीं उभे राहिलेला चिमुकला ड्रायव्हर आणि गार्ड पटकन् डब्यांत चढत. गाडी थांबली कीं पुन्हां खालीं उतरत. बाळच्या या जादूच्या खेळण्याची हकीगत त्यानं लहानथोरांच्या तोंडून ऐकली होती. बुटाच्या त्या भानगडीनंतर मामांनीं त्याला इनामदारांच्या वाडयांत जाण्याची बंदी केली होती. परंतु आतां मामांची नजर चुकवून तो तें अपूर्व खेळणं पाहून घेणार होता.

वाडयाच्या अंगणांतच बाळ होता आणि विशेष म्हणजे आगगाडी खेळत होता. त्याचा नोकर रामजी आगगाडीला चावी देत होता. रघुनाथाला पाहतांच बाळ ओरडला, " ही बघ माझी जादूची गाडी. "

" बघूं बघूं –" म्हणून रघुनाथ पुढें सरकला,

गाडी गर्र गर्र गर्र वर्तुळाकार रुळांवर फिरूं लागली. आठदहा वर्तुळं घेतल्यानंतर ती एकदम थांबली. आणि काय आश्चर्य, इंजनड्रायव्हर आणि गार्ड दोघंही पटकन् आपापल्या डब्याबाहेर पडले.

" ओ हो ! हो. किती मजा ! " रघुनाथ टाळया वाजवून ओरडला.

रामजी पुन्हां आगगाडीला चावी देऊं लागला तेव्हां रघुनाथ आणखीनच

पुढें सरकला आणि बाळला म्हणाला,

" मी देऊं चावी ? एकदांच ? "

" जा माझी गाडी आहे. "

" एकदांच. एकदांच मी चावी देतों. " रघुनाथ गयावया करूं लागला.

" तुझी खार देशील मला त्या बदली ? " बाळनं विचारलं.

रघुनाथाच्या बालमनाला मोठा पेंच पडला. ती खार त्याची फार लाडकी होती. बाळच्या मोठ्या भावाजवळ छऱ्यांची बंदुक असे. पाखरं आणि खारी मारायचा त्याला फार नाद होता. त्याच्या हातांत सदा बंदुक असे आणि सारी सुटी झाडावर सरसर पळणाऱ्या खारी किंवा झुडपांतल्या चिमण्या टिपण्यांत तो बहुतेक वेळ घालवी. त्याच्या बंदुकीचा छरा लागून जायबंदी झालेली एक चिमुकली खार रघुनाथानं पाळली होती. हळद लावून तिच्या पोटाची जखम त्यानें बरी केली होती. त्याच्या विजारीच्या खिशांत ती नेहमी गुरगुटून बसे आणि धीटपणें त्याच्या हातांतले भुईमुगाचे दाणे, बोरं उकीडवी बसून खाई. ही त्याची लाडकी खार आगगाडीला चावी देण्याच्या मोबदल्यांत बाळ मागत होता.

" देईन " रघुनाथ बोलून गेला. त्यानं विजारीच्या खिशांतनं ती खार बाहेर काढली. बाळच्या हातीं देऊन तो म्हणाला, " ही घे खार. देऊं मी किल्ली आगगाडीला ? "

" दे. " असें म्हणून हातांत खार नाचवीत बाळ घरांत पळाला.

रघुनाथ पटकन् बाळच्या जागीं जाऊन बसला. त्यानें दोन्ही हातांनीं गाडी पुढें ओढली. रामजीच्या हातून किल्ली घेऊन ती भरभर फिरवली. इंजननं शिटी दिली. गाडी हलली आणि केवढें आश्चर्य, इंजनड्रायव्हर आणि गार्ड पटकन् डब्यांत चढले !

रघुनाथानं हर्षभरानं टाळ्या वाजविल्या. रामजी आगगाडी आवरूं लागला तेव्हां रघुनाथ पुन्हां म्हणाला, " एकदां. आणखी एकदांच. "

असं किती 'एकदां' झाले. गाडी पुन्हां पुन्हां फिरली. रघुनाथ तर आपलं देहभान विसरला.

इतक्यांत एकदम ओरडा झाला. कुणीसें ओरडूं लागलं, " अरे, बैल उधळला, मुलांना संभाळा. "

रामजी ताडकन् उठला आणि थाडथाड उड्या मारणाऱ्या बैलाच्या दिशेनें धांवला. आगगाडी उचलून पोटाशीं धरीत रघुनाथहि उठला आणि धांवला.

थोड्या वेळानं उधळलेला बैल परत दावणीला बांधून रामजी परतला आणि पहातो तो रघुनाथ तेथें नव्हता ! आणि आगगाडीही नव्हती ! बैल उधळला त्याच्या धामधुमींत गाडी घेऊन तो आंत वाड्यांत पळाला असावा अशा समजुतीनं रामजी आपल्या कामाला निघून गेला.

सकाळीं 'बाळासाहेबांची आगगाडी' हरवल्याचा बोभाटा झाला. वाड्यांतली नोकर माणसं हवालदिल झालीं. वाड्याच्या आवारांतले कानेकोपरे शोधून झाले, बाळच्या साऱ्या मित्रांची झडती झाली, तरी गाडीचा पत्ता लागेना. 'आगगाडी पाहिजे' असा बाळानं आकांत मांडला. इनामदारांची सारी मंडळी संतापली, चिडली. "काहीं झालं तरी गाडीचा तलास लागलाच पाहिजे" अशी धमकी नोकरमाणसांना देऊं लागली. मालक मालकिणीच्या शिव्या खाऊन बेजार झालेला रामजी पुन्हां पुन्हां म्हणत होता, "बैल उधळे पवतर गाडी व्हती. मामाचा रघुनाथ खेळत व्हता. मग परत येऊन पाहतो तो गाडी आणि रघुनाथ दोगंबी न्हाईशी झाली. रघुनाथाला विचारा."

गाडीची चौकशी करण्यासाठीं इनामदार आले तेव्हां मामा झोपाळ्यावर बसले होते आणि रघुनाथ सैंपाकघरांत कुसाताईच्या मागें मागें करीत होता. बाहेर इनामदार गाडीची चौकशी करण्यासाठीं आलेले त्याला समजलं. मोठमोठ्या आवाजांतलीं त्यांचीं बोलणीं ऐकलीं तेव्हां रघुनाथ एकदम आईला बिलगला.

"तुमचा रघुनाथ गाडीशी खेळत होता. त्यानं गाडी घतली आहे असं वाटतं. म्हणावं देऊन टाक. मागून घ्यावं. चोरून घेऊं नये." इनामदार बोलत होते.

कुसाताईच्या कपाळाला आठ्या पडल्या. तिनं रघुनाथाकडे क्षणभर टक लावून पाहिलं आणि मग त्याची हनुवटी उचलून त्याला म्हटलं, "बाळ राघव माझी शपथ आहे राजा. खरं सांग, तूं घेतलीस बाळाची गाडी ?"

आईच्या कुशींत तोंड लपवून रघुनाथनं नकारार्थी मान हलविली. कुसाताईचा चेहरा निश्चित झाला. आतां बाहेर केवढंहि भांडण झालं तरी त्यांना भय नव्हतं.

" रघ्या . . " बाहेरून मामांनीं हांक मारली.

घोटाशीं बिलगलेल्या रघुनाथाला दूर करीत कुसाताई म्हणाली, " जा राघव. कर नाहीं त्याला डर कशाची ? "

रघुनाथ हलेना तेव्हां त्या त्याला घेऊन स्वतःच बाहेर आल्या आणि म्हणाल्या, " काय भानगड आहे ? हा आला रघुनाथ. विचारा याला. "

इनामदार म्हणाले, " रघुनाथ, बोल कुठें आहे बाळाची गाडी ? "

" तुमी खेळत व्हता गाडीशीं. बैल उधळला तवा दुसरं कोण बी नव्हत जवळपास. बोला रघुबाबा. माझ्यावरचं किटाळ काढा. " रामजी म्हणाला.

" रघ्या निमूटपणें गाडी काढ नाहीं तर तुझ्या खारीची काडतुसानं चाळण करून टाकतों. " बाळचा भाऊ बंदुक सरसावून म्हणाला.

" रघ्या—मुखस्तंभासारखा उभा काय राहिलास ? गाडी घेतली असलीस तर घेतली म्हण. बोल. " मामा गरजले.

चारी बाजूंनीं अंगावर कुत्रीं धावून आल्यावर मांजर जसं उभं रहातं तसा निडर मख्खपणानं रघुनाथ उभा होता, आणि डाव्या हातानं कानाची पाळी चाचपीत होता. कुसाताईनं त्याच्या खांद्यावर हात ठेवला आणि चारचौघांत कधीं तोंड न उघडणारी ती गतधवा सोप्यांत जमलेल्या मंडळींना म्हणाली,

" तुम्ही सगळीजणं अशी काव काव करून काय उठलांत ? गाडी काढ, गाडी काढ म्हणतां तीं गाडी काय माझ्या मुलानं चोरली आहे कीं काय ? उगीच कुभांड रचू नका. "

" कुसाताई, तूं गप्प बैस. त्याला बोलूं दे. " मामा म्हणाले.

" मी कां गप्प बसूं ? वाटेल त्यांनीं येऊन माझ्या पोरावर चोरीचा आरोप केला तर मी तो ऐकून घेईन ? "

" पण त्याच्या ऐवजीं तूं कां बोलतेस ? त्याला सांगूं दे ना या मंडळींना ' मी गाडी घेतली नाहीं ' असं. ए रघ्या, हो पुढें आणि बोल. का मी काढूं चौदावं रत्न ? " मामा कोपऱ्यांतली छडी उचलून म्हणाले.

कुसाताई पुढें आली आणि ओरडली, " खबरदार माझ्या पोराला हात लावशील तर, मामा. पोराच्या अब्रूचे धिंडवडे काढायला हीं माणसं आलींत यांना तूं जाब विचारायला हवास, चोर कुणाला ठरवतां ? तर उलट तूं माझ्याच पोरावर छडी उगारतोस ? कैवारी नव्हे वैरी आहेस तूं मामा. माझ्या पोराचा वैरी आहेस. "

" दुर्गुणाचा कैवार मला घेतां येत नाहीं कुसा. " मामा म्हणाले, " रघ्याला मी चांगला ओळखतो. "

" अस्सं, म्हणजे माझा पोर दुर्गुणी आहे काय ? मी पाहते आहे तूं त्याला नेहमीं बदनाम करीत असतोस. त्याला वाईट ठरवीत असतोस. एक दिवस तुझा मुलगा तुरुंगांत जाईल हें तर तुझं पालुपद होऊन बसलं आहे. कायरे ? माझ्या पोराला तुरुंगांत धाडून त्याचं उत्पन्न बळकावून बसणार आहेस काय ? " कुसाताई हातवारे करीत बोलूं लागली.

" बंद कर बडबड. " मामा मोठ्यांदा ओरडले. त्यांचा आवाज संतापानं चिरला, फाटला होता. चार प्रतिष्ठित मंडळीसमोर कुसाताईनं आपली अशी मानहानी करावी या गोष्टीनं त्यांच्या अंगाचा नुसता भडका उडाला होता. त्या भरांत रघुनाथाला पुढें ओढून ते म्हणाले,

" रघुनाथ, वर बघ. या इनामदार मंडळींचा तुझ्यावर संशय आहे, तूं बाळची आगगाडी चोरलीस असा. बोल तूं चोरलीस गाडी ? "

" नाहीं. " रघुनाथ म्हणाला.

" आईच्या पायाशपथ ?" मामांनीं विचारलं.

" शपथ. " रघुनाथ पुटपुटला,

इनामदारांची मंडळी चुळबुळ करूं लागली. त्यांना झालं होतं कुठून आपण रघुनाथवर संशय घेतला. चापचूप होऊन सारेजण मागें फिरले.

" थांबा " मामा म्हणाले, त्यांनीं रघुनाथाला पुढें ओढलं, कुसाताईकडे न पहातां तिला उद्देशून ते म्हणाले,

" कुसाताई, आज चार सभ्य लोकांसमोर तूं माझा अपमान केलास. आतां मी जी गोष्ट करणार आहे तीमुळें तुझी मानहानी झाली तर माझा इलाज नाहीं. " रघुनाथाला पुढें ढकलीत ते म्हणाले, " रघुनाथ, चल. तोंडलीच्या वेलाखालीं तूं काय पुरून ठेवलं आहेस तें या साऱ्या मंडळींना दाखव. "

रघुनाथाचा दंड मामांनीं पकडून ठेवला होता. अंगणांतल्या वेलाभोंवतीं सारी मंडळी – इनामदार, कुसाताई, रामजी, शेजारीपाजारी जमली. कुणीसं एक फावडं आणलं आणि वेलाचं भुसभुशीत मातीचं अळं उकरण्यास सुरवात केली. थोड्यावेळानं डब्याचं पांढरं कागदी पुठ्ठ्याचं झांकण दिसूं लागलं. मामा पुढें झाले आणि कार्डबोर्डाच्या डब्यांतली आगगाडी उचलून सर्वांना दाखवीत म्हणाले, " ही पहा बाळची गाडी ! रघुनाथानं चोरून आणली आणि आपल्या घरांत तोंडलीच्या वेलाखालीं पुरून ठेवली, ती मी पाहिली होती. कुसाताई डोळे उघडून बघ. तुझा मुलगा चोर आहे चोर !"

" नाहीं. " कुसाताई वेड्यासारखं ओरडली. तिनं धांवत जाऊन रघुनाथाचा बखोटा धरला आणि त्याला गदागदा हालवीत ती म्हणाली, " म्हण, नाहीं म्हण. " तिचं अंग थरथर कांपू लागलं, तिनं एकदम हात उगारला. रघुनाथाच्या गालावर, कपाळावर आंधळेपणानं प्रहार करीत ती ओरडली, " चोरी केलीस ? कशाला माझ्या पोटीं आलास ? माझ्या तोंडाला काळं फासलंस ? "

मामा मोठ्यांदा हंसले. इनामदारांच्या हातांत गाडी देऊन ते रघुनाथाला म्हणाले, " रघुनाथ, पाप कितीही खोल पुरलं तरी कधीं ना कधीं उघडकीला येतंच. "

मामाच्या त्या कुत्सित हेटाळणीच्या शब्दांनीं असो, जिनं जन्मांत कधीं हात उचलला नाहीं तिच्या प्रहारांनीं असो, किंवा पांच मिनिटांच्या मोहाला बळी पडून लपवलेली चोरी उघडकीला आली म्हणून असो, रघुनाथाच्या डोक्याला तिरीमिरी चढली. त्यानं घट्ट मुठी आवळल्या, दांत घट्ट एकमेकांवर घासले, तरी विंचू चढावा तसे वेग त्याच्या मस्तकांत येऊं लागले. त्याच्या डोळ्यांना मामाचा तो कुत्सित चेहरा दिसत होता. हेटाळणीचं हास्य ऐकूं येत होतं. त्यानं झटकन् बाळच्या थोरल्या भावाच्या हातांतली बंदुक हिसकून घेतली आणि त्या कुत्सित चेहऱ्यावर नेम रोखून चाप ओढला. " फट !" असा आवाज झाला तो त्याला ऐकूं आला नाहीं. मग त्यानं आंधळेपणानं बंदूकही फेंकून मारली...

नंतर कितीतरी वेळानं त्याचं मस्तक उतरलं आणि तो भानावर आला.

त्याची आई माजघरांत जमिनीवर पडून कण्हत होती. बाहेर सोप्यावर मामा बसले होते. वैद्यबुवांनीं त्यांच्या कानाला मलमपट्टी बांधली होती. वैद्यबुवा म्हणत होते,

" तुमची वेळ बरी मामा. प्राणावरचं कानाच्या पाळीवर भागलं. छरा कानाला चाटून गेला. जखम बरी होईल. पण थोडं व्यंग राहील. कान तुटका दिसेल. "

त्याच रात्रीं मामांनी रघुनाथाचं घर कायमचं सोडलं होतं....



स्टोव्हवर पाण्याचं आधण सळसळत होतं. पाणी उसळत होतं तिकडे रघुनाथाचं लक्ष नव्हतं. पंचवीस वर्षापूर्वीच्या त्याच्या बाळपणीच्या आठवणी आज जणू जाग्या झाल्या होत्या. ते ते प्रसंग आज घडल्यासारखें त्याच्या मनांत उभे होत होते आणि त्याला दुःख देत होते. वर्ष गेलीं होतीं. पण विस्कटलेल्या, फसलेल्या, बाळपणाच्या दुःखाचा पीळ रघुनाथाच्या अंःतकरणांत अजून तसाच होता.

"रघुनाथ पाणी तापलं काय रे " बाहेरच्या खोलींतून मामांनीं विचारलं

रघुनाथानं गरम पाण्याची बादली न्हाणीघरांत नेऊन ठेवली. परत बाहेरच्या खोलींत येऊन तो मामांना म्हणाला, " पाणी तयार आहे. " पण त्याचं सारं लक्ष मामांच्या उजव्या कानाकडे होते. मामाच्या उजव्या कानाची पाळी तुटलेली होती. त्या तुटक्या कानाकडे पाहून रघुनाथाची खात्रीच पटली. ज्यानं त्याच्या दुधासारख्या बाळपणांत मीठ कालवलं होतं तोच हा मामा होता खचित !

मामांनीं पडशींतून एक छोटीशी ट्रंक काढली. कुलूप पक्कं लागलेलं आहे अशी खात्री करून घेतली. पिशवींतला सदरा धोतर काढून ते स्नानाला निघाले. त्यांच्या तुटक्या कानाकडे पहात रघुनाथ म्हणाला,

" मामा, पंचवीस वर्षं झालीं नाहीं ? "

" होय " मामा म्हणाले, " पंचवीस वर्षांत आपण एकमेकांची विचारपूस केली नाहीं. "

" घर तुम्ही सोडलंत मामा. "

" घर सोडलं म्हणून नशीब काढलं. " मामा मिशा कुरवाळीत म्हणाले.

" कराचीला गेलों. व्यापार केला. खूप पैसा मिळवला. "

" मग आम्हांला विसरलांत हें योग्यच." रघुनाथ हंसला. " पण इतक्या वर्षानंतर एकाएकीं माझी आठवण तुम्हांला कशी झाली ? "

" तो फार मोठा इतिहास आहे. पण मी तातडीनं कां आलों सांगतों. कराचींत तंग वातावरण आहे. हिंदूंच्या पैशा अडक्याला, इस्टेटीला, जिवाला कधीं धोका उत्पन्न होईल सांगता येत नाहीं. म्हणून मीं माझं सारं सोनं नाणं गोळा करून कराची सोडली. माझ्या संपत्तीची लूट गुंडांनीं करण्यापेक्षां तिचा उपयोग दंग्यांत सापडलेल्या, घरादारांना मुकलेल्या लोकांसाठी करावा या हेतूनं मी गुप्तपणें कुणाला न कळवितां तयारी केली, आणि आगगाडीच्या बांकाखालीं लपत छपत प्रवास करून तुझं घर गाठलं. हॉटेलापेक्षां सुरक्षित– "

ट्रंकेचं कुलूप पुन्हां एकदां तपासून मामा स्नानासाठीं न्हाणीघरांत निघून गेले.

रघुनाथानं ट्रंक उचलून पाहिली. बरीच जड होती. कुलूप ओढून पाहिलं. तेही चांगलं भक्कम होतं. त्या ट्रंकेकडे तो पाहात राहिला. त्याच्या मनांत आलं, अगदी ऐनवेळीं लक्ष्मी घरांत आली ! देवानं माझी हांक ऐकली म्हणायची !

गेले कांहीं दिवस रघुनाथ एका विलक्षण संकटांत सांपडला होता. जानकीला, मुलांना त्याच्या मित्रांना कुणालाच त्याच्या संकटाची कल्पना नव्हती. घरांत त्याचा चिडखोरपणा वाढला होता. त्याच्या वागण्याचं सगळ्यांना आश्चर्य वाटे. पण त्याच्या अस्वस्थतेचं खरं कारण म्हणजे त्याच्या गळ्याला लागलेली तांत ! अफरातफरीची तांत ! ' अफरातफर ' हा शब्द किती भयंकर ! पण ती करतांना आपण कांही मोठं पाप करीत आहों असं त्याला वाटलं नव्हतं. ज्या विमाकंपनींत तो नोकरीला होता तिचा तो पुष्कळ जुना नोकर होता. कित्येक विमेदार विश्वासानं आपली हप्त्याची रक्कम त्याच्या स्वाधीन करीत. मुदतीपूर्वी आलेल्या अगाऊ रकमा मुदतीच्या तारखेपर्यंत रघुनाथ वापरीत असे. असे पैसे वापरण्यांत कुणाचं नुकसान नव्हतं. त्याच्या घरखर्चाची मात्र सोय होती. जोंपर्यंत हप्त्यांच्या रक्कमा मुदतींत भरल्या जात होत्या तोंपर्यंत रघुनाथाच्या कृत्याला

'अफरातफर' हें भयंकर नांव प्राप्त झालं नव्हतं. पण हा खेळ शेवटीं त्याच्या अंगाशीं आला होता. चार दिवसांत पांचशें रुपये कंपनीत न भरले तर त्याचा गुन्हा उघडकीला येणार होता. नोकरी जाणार होती. बदनाम होणार होतं. त्याच्या गळ्याला अगदीं तांत लागली होती.

मामांच्या ट्रंकेकडे नुसतं पाहून रघुनाथाच्या मस्तकावरचं मोठं ओझं उतरलं. व्यापारांत पैसे मिळवून गबर होऊन आलेले मामा पांचशें रुपये मागितल्यावर देतीलच यांत त्याला शंका नव्हती. पांचशेंच का हजारही देतील. मग आपण कर्जमुक्त होऊं. मामांशीं चांगलं वागायचं, त्यांना खूष करायचं आणि आजच त्यांना पैशाबद्दल विचारायचं रघुनाथानं ठरवलं.

मामा स्नान आटोपून परतले तेव्हां रघुनाथानं विचारलं, " मामा, भात टाकू का ? गरम गरम चार घांस खा. "

" नको. " मामा म्हणाले. " रात्रीची मी फक्त कॉफी घेतों चांगली दोन कप. "

" जानकी असती तर तिनं तुम्हांला आग्रहानं जेवूं घातलं असतं. आतां उद्यां आली म्हणजे पहा कशी बडदास्त ठेवील तुमची. आणि मुलं तर आजोबा आजोबा करीत नाचतील. "

" खाऊ आणला नसला तरी ? " मामांनीं खवचटपणें विचारलं.

रघुनाथ चपापला. या धूर्त म्हाताऱ्यानं आपला डाव ओळखला तर नाहीं अशी शंका त्याला आली. त्यापेक्षां अशा माणसांना सरळच प्रश्न विचारलेला बरा अशा हिशोबानं रघुनाथ सैंपाकघरांत गेला. कॉफीचं आधण टाकून तो बाहेर आला. मामा आरामखुर्चींत बसले होते. त्यांच्या डोक्यामागें खुर्चीवरची उशी देत रघुनाथ म्हणाला,

" मामा, माझं एक मागणं आहे. "

" बोल. " मामा म्हणाले.

" मला थोडे पैसे हवेत. "

" किती ? "

" हजार एक. कर्जाऊ म्हणून द्या. उसने म्हणून द्या. "

" काय मुलाची मुंजबिज काढली आहेस ? " मामांनीं विचारलं, " तसं असेल तर मी म्हणेन ऋण काढून सण करूं नये. "

" कुठली मुंज आणि कुठलं काय मामा. संसाराची नुसती तारांबळ चाललीय. पगार आणि खर्च यांचं व्यस्त प्रमाण. महागाई तर दिवसेंदिवस वाढत चाललीय. या पायींच कर्ज करून बसलों. "

" कशाच्या तारणावर कर्ज दिलं सावकारानं ? शिपूरच्या शेतावर ?"

" आईच्या दुखण्यांत शेत विकून टाकावं लागलं. असेच घेतलेत मित्राकडून. "

" मित्र बुडविण्यासाठींच असतात." असं म्हणून मामा हंसले.

तें त्यांचं हसणं ऐकून रघुनाथाच्या मनांत आलं, मामा कांहीं बदलले नाहींत. त्यांच्यापाशीं लपवालपवी करण्यांत अर्थ नव्हता. अफरातफरीची सारी कबुली देऊन रघुनाथ शेवटीं त्यांना म्हणाला,

" माझ्या गळ्याला तांत लागली आहे. तुम्ही निदान पांचशें दिलेत तरी माझी अब्रू वांचेल. नोकरी टिकेल."

कांहीं वेळ स्तब्ध राहून मामा म्हणाले. " रघुनाथ, तुझं संकट मला समजतं. तुझ्याबद्दल मला फार वाईट वाटतं. पण तुला माहीत आहे कीं मी कांहीं तत्त्वांना धरून वागणारा माणूस आहे. माणसाच्या हातून चुका घडतात. त्यांचा परिणाम त्यानं भोगलाच पाहिजे. तुझ्यासारख्या गैरहिशोबी माणसांना वांचविण्यासाठीं मी पैही खर्चणार नाहीं. माझं सारं धन निर्वासितांसाठीं वेंचण्याची माझी प्रतिज्ञा आहे. तेव्हां माझ्या मदतीची आशा सोड. आणखी एक गोष्ट. तूं माझं धोक्याचं वचन लक्षांत ठेवलेलं दिसत नाहींस. पंचवीस वर्षांपूर्वी ज्या दिवशीं मी तुझं घर सोडलं त्या दिवशीं मी तुला बजावलं होतं, " बाबारे, पाप कितींही खोल पुरलंस तरी तें उघडकीला कधीं ना कधीं येणारच ! .."

मामा मोठ्यांदा हंसूं लागले. त्यांच्या त्या हंसण्यांत हेटाळणी होती, कुत्सितपणा होता.

रघुनाथाच्या डोक्याला तिरीमिरी चढली. या खदखदा हंसणाऱ्या माणसासमोर एखादं मिनिट उभं राहिलों तर आपल्या हातून कांहींतरी अविचार घडेलसं त्याला वाटलं. तो ताडकन् उठला आणि सैपाकघरांत गेला. त्याच्या मनांत आलं, पंचवीस वर्षांपूर्वी झाडलेल्या बंदुकीचा नेम चुकला. पण आज बंदुक हातांत असती तर नेम चुकला नसता. रघुनाथाच्या मनांत आलं,

"किती भयंकर विचार आपण करतों आहों."

पण त्यांत असं दचकण्यासारखं काय होतं. या मामानं हंसत खिदळत, सत्ता गाजवीत, माझ्या बालपणाच्या ठिकऱ्या ठिकऱ्या उडवल्या. माझं बालपण हिरावून घेतलं. मीं याचं वृद्धपण संपविलं तर काय बिघडलं? यानं माझ्या पैशावर सत्ता गाजविली. आम्हां मायलेकरांना पैला महाग केलं. आतां मी याचा पैसा लुबाडला तर तो गुन्हा कसा ठरेल? आज हातीं बंदुक असती तर नेम खचित चुकला नसता.

मनांत असलं हलाहल उसळत असलं तरी दूध उकळलं होतं आणि त्यांत कॉफी टाकणं रघुनाथाला भाग होतं. रघुनाथानं कपाट उघडलं. कपाटाच्या वरच्या खणांत लहान मोठ्या बाटल्यांची एकच गर्दी झाली होती. त्यांत पॉलसन कॉफीचा पिवळा चिमुकला डबा तो शोधूं लागला. त्याच्या हाताचा धक्का लागून एक बाटली खालीं पडली पण फुटली नाहीं. ती उचलतांना तिच्यावर लाल शाईत लिहिलेलं "जालिम वीष – उंदरांकरितां" असं वाक्य त्यानं पाहिलं आणि तो थबकला.

"बंदुक नाहीं पण हें वीष तरी आहे." त्याच्या मनांत विजेसारखा विचार येऊन गेला. त्या बाटलींतली चमचाभर पावडर रघुनाथानं डाव्या हाताच्या तळहातावर ओतली. किती शुभ्र चकचकीत दिसत होती ती! लहान मुलाच्या हातावर ठेवली असती तर साखर समजून त्यानं ती चटकन तोंडांत कोंबली असती. पण साखरेसारखी दिसणारी ती पूड माणसाच्या पोटांत गेली तर आंतडीं पिळवटून सारे प्राण शोषून घेतल्याशिवाय राहणार नव्हती!

आतां पाऊल मागें घेण्यांत अर्थ नव्हता! तळहातावर ओतलेली पावडर परत बाटलींत टाकणं म्हणजे नशीबानं उघडलेला भाग्याचा दरवाजा बंद करण्यासारखं होतं. मध्यरात्रीच्या मुहूर्तावर लक्ष्मी आपण होऊन त्याच्या घरीं चालत आली होती. ही चमचाभर पावडर समोर उकळणाऱ्या कॉफींत टाकली तर त्या अमृततुल्य कॉफीचं जहरी वीष बनणार होतं. पण रघुनाथाचं विषारी जीवन अमृतमय होणार होतं. त्याच्या गळ्याला लागलेली अफरातफरीची तांत तुटणार होती. उसनवारीपायीं, कर्जापायीं जगावं लागणारं नामुष्कीचं जीवन संपणार होतं. पैशाच्या

टंचाईतून तो मुक्त होणार होता. किंबहुना जें विलासी जीवन उपभोगण्याची स्वप्नांत देखील त्यानं कधीं आशा केली नव्हती तें विलासी जीवन त्याच्या वांट्याला येणार होतं. त्याचं बालपण हालअपेष्टांत, मानहानींत गेलं होतं. पण आनंद, कुसूम यांचं बालपण म्हणजे सोन्यारुप्याचं कोंदण बनणार होतं ! ..

तळहातावर ती शुभ्र चकाकणारी पावडर घेऊन रघुनाथ किती वेळ उभा होता कुणास ठाऊक. परंतु एखादा अमली पदार्थ चढावा तशी या रुपेरी स्वप्नाची भूल त्याच्या मनावर चढत गेली, आणि अखेर तिनं त्याच्या मनाचा पूर्ण ताबा घेतला. तिच्या तावडींत तो एक कळसूत्री बाहुलं बनला. त्याला स्वत:चा विचार उरला नाहीं. 'घाबरतोस काय ?' त्याच्या बुद्धीवर अंमल चढविणारी भूल त्याला अंकुशानें टोचावं तशी टोचूं लागली, 'हा क्षण वांया दवडू नको. पुढें हो, आणि हातांतलं तें जहरी वीष उकळत्या कॉफींत टाक. आटप. डगमगण्याची वेळ नव्हे.'

रघुनाथानं हातावरची ती पावडर कॉफींत टाकली ! साखर दूध मिसळून ती गरम गरम कॉफी कपांत भरून तो बाहेरच्या खोलींत आला.

वाफा उडणारा कॉफीचा पेला हातांत घेऊन मामा म्हणाले, "आतां आराम झोंप येईल मला.." चार घोटांत अधाशीपणानं मामांनीं कॉफी पिऊन टाकली.

"आणखी घालूं ?" रघुनाथानं विचारलं.

ओठांवरून जीभ फिरवीत मामा म्हणाले, "घाल पण थोडी साखर टाक. कडू झालीय तुझी कॉफी. कसला तरी कळकट राप बसतोय तोंडाला...."

कॉफींत दोन चमचे साखर टाकून रघुनाथानं पुन्हां मामांचा कप भरला.

तो अर्धाच पिऊन मामा एकदम खुर्चीवर लेटले आणि छातीवरचा शर्ट उचलून हलवीत म्हणाले, "गरम कॉफीनं एकदम घाम सुटला. गलबलल्यासारखं झालं बघ."

रघुनाथ त्यांच्याकडे पहातच राहिला.

"अरे बापरे. पोटांत एकदम वेठ आला रे" मामा ओरडले. चाकूचं पातं मिटावं तसं त्यांनीं आपलं अंग दुमडलं आणि दोन्ही हातांनीं पोट दाबून

धरलं. " अनशापोटीं कॉफी प्यायला नको होती रे....."

पण त्यांचं तें वाक्य अर्धवटच राहिलं. एखाद्या चिरडलेल्या किड्या-प्रमाणें तें वळवळू लागले. "पोटांत आग ! आग !" ते बडबडूं लागले, "अरे, कांहींतरी कर. मला सहन होत नाहीं. डॉक्टरला–आण जा. मी मरतो."

रघुनाथ जागचा हालला नाहीं. मामांची तडफड जणु त्याला दिसत नव्हती. ऐकूं येत नव्हती.

आतां मामांचा ठाव सुटला. यंत्राच्या चाकांत सांपडलेला माणूस उलटा पालटा होतो तसे विषाच्या तावडींत सांपडलेले मामा उलटेपालटे झाले. त्यांचे डोळे खोल गेले, तारवटले, नाकाची दांडी पांढरी पडली. वासलेल्या तोंडांतून फेस येऊं लागला, आणि ते गुरासारखे ओरडूं लागले. आपल्या तारवटलेल्या डोळ्यांनीं रघुनाथाकडे पहात बडबडूं लागले.

" चांडाळा ! तूं माझा घात केलास....कॉफींतून मला वीष घातलंस ....आई, आई – मरतो...."

रघुनाथाच्या कानांना हे शब्द केवढ्या मोठ्यांदा ऐकूं आले. तो एक-दम चमकला. त्यानं चाहूल घेऊन पाहिलं तो जिकडे तिकडे चापचूप झालं होतं. धो धो पडणारा पाऊस थांबला होता. वारा वहात नव्हता. रघुनाथाच्या भयंकर कृत्यानं जणुं सृष्टीनं देखील आपला श्वास रोखून धरला होता. दूरवर सडकेवर काठी आपटल्याचे आवाज ऐकूं येऊं लागले. रघुनाथ एकदम मामांना म्हणाला, " खबरदार तोंड बंद...." पण मामा विव्हळत होते. कण्हत होते. रघुनाथानं आजूबाजूला पाहिलं. आरामखुर्चीखालीं पडलेली उशी मामांच्या भेसूर चेहऱ्यावर त्यानं दाबून धरली. मामांना अखेरची तडफड लागली. उशीच्या दाबानं त्यांचा श्वास कोंडला गेला. जिवाचा कोट करून उशीला ओरबाडीत ढकलीत ते म्हणाले,

" पाप किती खोल पुरलंस तरी उघडकीला येणारच...."

गस्तवाल्या शिपायांच्या काठ्यांचे आवाज जवळ जवळ येऊं लागले तशी रघुनाथानं मामांच्या तोंडावर उशी भीमबळानं दाबली.

गस्तवाले शिपाई रघुनाथाच्या घराजवळ आले होते. आणि रात्रीच्या त्या भयाण शांततेची भेसूरता आपल्या आरोळीनं वाढवीत होते....
" घरवाले ! होशियार !"

# प्रकरण तिसरें

शेगडीवरच्या पातेलींत भात शिजत होता. जानकीनं पातेलीवरची वेळणी सरकवली. ती भाताची वाफ दणदणून उसळली, आणि जानकीचं तें चिमुकलं सैपाकघर आंबेमोहोर तांदळांच्या गरम सुवासानं दरवळून गेलं. तिनं चटकन पातेलीवर वेळणी झांकली. भितीला कान असतात, जपून बोलावं हें शहाणपण तिला उपजतच होतं. पण दुसऱ्या महायुद्धानंतरच्या त्या महागाईच्या दिवसांत भितीला नाकही असतं, चोरून खावं, हा धूर्तपणाही तिला अंगीं आणावा लागला होता. आंबेमोहोराचा वास शेजारणी पाजारणींच्या नाकांत गेला तर "अग्गोबाई आम्हांला उकडा पोटभर मिळायची पंचेत. तुम्ही अंबेमोहोर कुठून मिळवला ?" असा कुत्सित प्रश्न बायका विचारल्याशिवाय राहायच्या नाहींत हें ती ओळखून होती.

दुसऱ्या महायुद्धानंतर जगाच्या नकाशाचे रंग बदलले, सरहद्दी बदलल्या, आणि देशादेशांतलं सामाजिक जीवनही बदललं. युद्धांत बळी पडलेल्या लाखो तरुणांना वीरमरण आलं. पण युद्ध संपल्यावर पाठीमागें राहिलेल्या माणसाच्या नशिबीं जगणं आलं तें मरणप्रायच होतं. आणि त्यांत कसला शूरपणा नव्हता. कसलंही भूषण नव्हतं. युद्धानं पांढरपेशा समाजाच्या प्रतिष्ठेचा बुरखा फाडून टाकला होता. त्या जीवनाची चाकोरी बदलली होती. फक्त देवदर्शनासाठीं अगर हळदीकुंकवासाठीं घराबाहेर पडणाऱ्या स्त्रिया रेशन पत्रकं एका हातांत आणि पिशव्या दुसऱ्या हातांत घेऊन दुपारीं तिपारीं घराबाहेर पडूं लागल्या. रेशनच्या दुकानापुढें तासनतास रांगेंत उभ्या राहूं लागल्या. एक बाटलीभर रॉकेलसाठीं रॉकेल दुकानापुढें पहाटेपासून नंबर लावूं लागल्या. वारभर कापडासाठीं कापडदुकानाशीं धरणं धरून बसूं लागल्या. औंस दोन औंस साखर जादा मिळविण्यासाठीं

धडपडूं लागल्या. तांदूळ, गहूं, डाळ, गूळ, साखर, लोणी तूप– जीवनांत स्निग्धतेची गोडी आणणाऱ्या या साऱ्या वस्तू युद्धाच्या खाईंत गडप झाल्या होत्या. आणि तोळ्याच्या माशानं मोजलेलं नासकं कुजकं धान्य आणि ओबड-धोबड वस्त्र मध्यम वर्गीयांच्या वांट्याला आलं होतं. उकड्या तांदुळांचा कुजकी घाण मारणारा भात आणि 'मीलो' ची तांबडी चरबरीत भाकरी निमूटपणें खायला लोक शिकले होते. एखादेवेळीं एखादा पुढारी सभेंतून भाषणं करी. "देशासाठीं देहदंड सोसलाच पाहिजे." अशा त्यागाची शिकवण देई. पण जनतेमधें असंतोष निर्माण होई तो या देहदंडामुळें नव्हे तर या त्यागानं. देशाच्या कल्याणाऐवजीं कांहीं विवक्षित गटांचा स्वार्थ साधला जावा याची चीड जनतेला वाटत होती. साठेबाज व्यापारी, काळ्याबाजारावर श्रीमंत झालेले संधिसाधु यांच्यासाठीं आपलं पोट मारण्याची जनतेची तयारी नव्हती. टंचाईच्या त्या काळांत कुणी तलम वस्त्र परिधान केलं, कुणी मेजवानी दाखल बारीक तांदळाचा साखर भात केला, किंवा पाहुण्यांना साखरेचा नुसता चहा दिला तरी त्या गोष्टीचा जिकडे तिकडे गवगवा होई. मग रघुनाथ चित्रे सारख्या विमा कंपनींत खर्डेघाशी करणाऱ्यां कारकुनाच्या घरीं आंबेमोहोर शिजल्याचा वास लागला तर शंकाकुशंका निघायला काय तोटा ?

गेल्या सहा महिन्यांत जानकी अधून मधून रेशनचा वार चुकवी. आपल्या कार्डावरचं धान्य ती जिजा मोलकरणीला देते असंही बायका कुजबुजत. पांच रुपये शेरानं देखील काळ्या बाजारांत साखर मिळायची नाहीं. पण मुलाच्या काढ्यांत घालायला मागितली तर वाटीभर साखर जानकीकडे मिळेल अशी बातमी पसरत चालली होती. आणि मग "या दिवसांत अशी चंगळ कशी आहे हो जानकीच्या घरीं ?" असा प्रश्न विचारून बायका तर्ककुतर्क लढवीत. "अहो या लढाईत कोण कसा पैसा मिळवील सांगतां येत नाहीं." असं पालुपद लावून अमका कसा गब्बर झाला, तमक्यानं कसा पापाचा पैसा जमवला अशा कहाण्यांचा पाढा वाचून शेवटीं निष्कर्ष काढीत "जानकीचा नवरा दिसतो तसा नाहीं बरं का. पाणी मुरतंय. त्याशिवाय का चैन चाललीय ?"

बायकाबायकांत चाललेली ही कुजबुज जानकीच्या कानापर्यंत जिजा

मोलकरणीनं पोंचविली होती. तेव्हांपासूनच जानकी धूर्त बनली होती. अंधेऱ्या माजघरांतल्या कपाटांतलं तांदुळानं अर्धं अधिक भरलेलं पोतं, साखरेनं भरलेल्या बरण्या, आणि रॉकेलनं भरलेला डबा म्हणजे तिचं गुप्त धन होतं. रेशनकार्ड तपासण्यासाठीं येणाऱ्या इन्स्पेक्टरच्या आणि शेजाऱ्या-पाजाऱ्यांच्या नजरेला तें पडूं नये अशी खबरदारी ती घेत होती. " कुठून पैसा आणतात कुणाला ठाऊक " असा शेजाऱ्यापाजाऱ्यांचा उद्‌गार ऐकला कीं तिला विलक्षण खेद होई. ती मनाशीं म्हणे, " तरी बरं यांना एका विमाकंपनींत नोकरी आहे. विम्याचे पैसे मेल्यावर मिळतात म्हणे. तसल्या कंपनींत जिवंतपणीं पैसे खाणं कसं शक्य आहे ? एखाद्या रेशन ऑफिसांत नोकरीला असते तर या लोकांनीं कांहीं नोकरी टिकूं दिली नसती त्यांची. " नवऱ्याच्या प्रामाणिकपणाबद्दल कुणी शंका काढली कीं तिला राग येई. " माझं सुख बघवत नाहीं मेल्यांना " असा चिडून स्वतःशींच उद्‌गार काढी.

स्त्रियांचं मन म्हणजे एक वेधशाळाच ! प्रेमाचं हवामान तिथें अचुक टिपलं जातं. सहा महिन्यांपूर्वी लग्नाच्या अहेराच्या निमित्तानं तिच्या संसारांत उठलेलं वादळ तिला अजूनही आठवत असे. कधीं नव्हे तो अहेर देण्याचा हट्ट तिनं धरला तो काय, आणि रघुनाथानं आकांडतांडव केलं तें काय ! हट्ट करूं नये हें तिला समजत होतं. गरीबीच्या संसारांत हट्टाला जागा नसते. त्यांतून ती सावत्र आईच्या हाताखालीं वाढलेली होती. मन कसं मारावं याचे धडे सावत्र आईनं तिला दिले होते. त्यामुळें रघुनाथाच्या हाताखालीं येऊन ती संसार करूं लागली तेव्हां तिला अडचण भासली नाहीं. अमूक पाहिजे, तमूक पाहिजे असं तिनं कधीं म्हटलं नाहीं, किंवा नेहमीं गुलामगिरींत वाढलेल्या त्या मुलीनं स्वतःच्या संसारांत देखील स्वतंत्रपणें कांहीं हौस कधीं केली नाहीं. स्वतःच्या मुलांच्या बारशासाठीं सुद्धां कसला हट्ट धरला नाहीं. परंतु ओलावा कमी झाला म्हणजे धरणीला भेगा पडतात तशा संसारांत प्रेमाचा ओलावा कमी झाला कीं स्त्रीमनाला असंतोषाच्या भेगा पडूं लागतात. पतीच्या प्रेमांत स्वतःचें अस्तित्व विसरणारी स्त्री त्या प्रेमापासून दुरावल्यावर येन केन प्रकारेण घरांत आपली प्रतिष्ठा राखण्याचा प्रयत्न करूं लागते. मैत्रिणीच्या लग्नांत अहेर देण्याचा जानकीचा हट्ट अशा प्रयत्नापैकींच होता. रघुनाथाचं मन आपल्याजवळ नाहीं, असा संशय

तिला येऊं लागला.

पैशाच्या चिंतेनं पुरुषांचं लक्ष संसारांतून उडतं हा विचार तिला पटत नसे. संसाराचा भार नवराबायकोनीं वहायचा असतो. काळज्या दोघांनीं करायच्या असतात. मग रघुनाथ त्यांतून आपल्याला वगळतो, रात्रीं अपरात्रीं उठून कागदावर हिशेब करीत जागरणं करतो, आपल्यावर अवलंबून राहण्याऐवजीं आपल्याला टाळतो, तुसडेपणानं वागतो या गोष्टीबद्दल तिच्या मनांतला असंतोष वाढत होता. संसारांतलं आपलं स्थान कमी होत चालल्याची जाणीव तिला भेडसावीत होती. म्हणून घरांत तिची धुसफुस वाढली होती. कुठें मोलकरणीला आगाऊ चार रुपये दे, दारावरच्या फेरीवाल्याकडून कुसूमच्या परकरासाठीं खण विकत घे, कुठें भटजीला रुपया देऊन मारुतीला एकादष्णी करव, दारांत बडबड करून ज्योतिष ऐकविणाऱ्या कुडबुड्या ज्योतिषाच्या हातावर आठ आणे टाक, असे लहानमोठे खर्च ती करूं लागली होती. केवळ आपण कोणीतरी आहों या समाधानासाठीं. आणि केवळ याच समाधानासाठीं तिनं मैत्रिणीच्या लग्नाला जायचं ठरविलं होतं आणि अहेरासाठीं दहा रुपयांचा हट्ट धरला होता. आणि रघुनाथानं कठोर शब्दांनीं तिच्या या उरल्या सुरल्या अहंकाराची चिरफाड केली होती. तिला रडविली होती. आणि एक पैही न घेतां ती रित्या हातानं आणि त्याहून रित्या मनानं लग्नाला गेली होती.

परंतु या प्रसंगाचं दुःख तिला भासूं नये असा बदल त्यानंतर घडून आला होता. तिच्या मनांत येत होतं, त्या कुडबुड्या ज्योतिषाचं भविष्य थोडं फार खरं ठरलं होतं म्हणायचं.

अहेराच्या भांडणापूर्वीं चारपांच दिवसांची गोष्ट. ती उंबऱ्याशीं तांदूळ निवडीत बसली होती. वेळ ऐन दुपारची होती. अशा वेळीं अंगणांत तो कुडबुड्या ज्योतिषी शिरला आणि तिच्या कपाळावरच्या आठ्यांना न जुमानतां पायरीशीं धरणं धरून बसला. तिच्या चेहेऱ्याकडे बराच वेळ टक लावून पाहिल्यावर त्यानं सुरवात केली, "आई, तूं फार मोठ्या भाग्याची आहेस...."

जानकी उपरोधानं हंसली व मनाशीं म्हणाली, माहीत आहे भाग्य. ताटांतले मूठभर तांदूळ पुढें करून ती त्या कुडबुड्याला म्हणाली, " हें धर

आणि जा मुकाट्यानं."

कुडबुड्या मागें सरकला. त्याच्या हातांतल्या तबकांत तुळजाभवानीचा पितळेचा मुखवटा होता त्याची शपथ घेऊन तो म्हणाला,

"मी भीक मागण्यासाठीं आलों नाहीं आई. तुळजाभवानीची आज्ञा झाली म्हणून तुझ्या दाराशीं आलों. मला तुझा धर्म नको, पैसा अडका कांहीं नको. भवानी बोलते कीं आई तूं मोठ्या भाग्याची आहेस. तुला अचानक धनलाभ आहे. पावसाची रात्र येईल. दारीं काळ्या रंगाचा, गुल-मिशाचा म्हातारा उभा राहील. तुला सोन्याच्या मोहोरा देऊन जाईल.."

जानकी हंसली. असल्या भविष्यावर विश्वास ठेवण्याइतकी ती भोळी थोडीच होती ?

"हंसू नकोस आई, भवानीच्या बोलाची चेष्टा करूं नकोस. तुझी साडेसाती संपली. दूधतूप, डाळतांदुळानं तुझं घर भरेल. तुझ्या मनांतल्या सगळ्या इच्छा पूर्ण होतील. तुझ्या घरांत कार्य होईल...."

"कार्य होईल ?" जानकीनं ते शब्द ऐकले आणि मोठा निश्वास टाकला. तिच्या मनांत आलं या जन्मीं तरी ती शक्यता दिसत नाहीं.

तिचा पहिला वहिला 'आनंद' सात वर्षाचा झाला तेव्हां त्याची मुंज करायचा बेत तिनं केला होता परंतु पैशाच्या अभावी तसाच राहिला होता. पुढें दरवर्षी मुंजीचे मुहूर्त येत आणि निघून जात. आनंदाच्या मुंजीचा विषय तिनं काढला कीं "बघूं पुढल्या वर्षी" हें रघुनाथाचं उत्तर ठरून गेलं होतं. नतर नंतर हें समजुतीचं बोलणंहि त्यानं टाकलं होतं. "आनंदाची मुंज करायला हवी. त्याला संस्काराशिवाय वाढूं द्यायचा का ?" असं तो म्हणाली कीं रघुनाथ उत्तर देई, "वीष खायला पैसा नाहीं आणि तुला मुंज सुचतेय." तिनंच मग तो मुंजीचा ध्यास सोडून दिला होता. मुहूर्ताच्या दिवसांत गुलाबी पत्रिकेवर सोनेरी अक्षरांत छापलेल्या पत्रिका आल्या आणि त्यावरचा मुंजामुलाचा तो फोटो पाहिला की कांहीं काळ तिच्या अंतः-करणाला फार वेदना होत. दारावरून मुंजामुलाची मिरवणूक वाजतगाजत चालली कीं ती चटकन् मागं फिरे. आपला एकुलताएक मुलगा मुंजीशिवाय वाढावा या गोष्टीचं तिला फार दुःख होई. म्हणून "तुझ्या घरांत कार्य होईल" अशी त्या कुडबुड्याच्या तोंडची भविष्यवाणी ऐकून ती मनाशीं

म्हणाली होती, "या जन्मीं ती गोष्ट शक्य दिसत नाहीं."

तिचा उतरलेला चेहरा पाहून कुडबुड्या म्हणाला होता, "तुळजाभवानीचा तुला आशिर्वाद आहे. तुझ्या घरीं कार्य होईल. तेव्हां मी येईन. मला पुरणावरणाचं जेवण घाल आणि धोतर उपरण्याचा आहेर देऊन देवीच्या भगताला संतुष्ट कर.... "

इतकं बोलून तुळजाभवानीचं गाणं गुणगुणत तो म्हातारा आला तसा उठून गेला.

त्यानंतर चारपांच दिवसांनींच रघुनाथाचं आणि तिचं भांडण झालं होतं. अहेरासाठीं तिनं दहा रुपड्या मागितल्या हा तिचा अपराध ठरला होता. रडतां रडतां तिला कुडबुड्या ज्योतिषाच्या त्या भविष्याची आठवण झाली होती. हताशपणें मान उडवून ती स्वतःशीं म्हणाली होती, "कसलं भविष्य अन् कसलं काय !"

लग्न आटोपून दुसरें दिवशी दिवे लागणीच्या सुमाराला ती घरीं परतली ती धडधडत्या अंतःकरणानच. रघुनाथाचा राग कायम होता कीं उतरला होता याची कांहींच कल्पना तिला करता येईना. नाराज पतीच्या पुढें जायला कोणत्या स्त्रीला उत्सुकता वाटेल ? ती भीत भीत घरांत शिरली तों दिवे लागणी झाली होती तरी घरांत अंधारच होता. तिन दिव्याचं बटन ओढलं. मागें न्हाणीघरांत जाऊन ती हातपाय तोंड स्वच्छ धुवून आली तरी घरांत रघुनाथाची चाहूल लागेना. जानकी दचकली. रघुनाथाची तब्बेत तर बिघडली नसेल, तिच्या मनांत शंका आली. ती झपझप पुढच्या खोलीतला जिना चढून माडीवर गेली. माडीवर भिंतीशीं गादी पसरलेली होती आणि रघुनाथ तीवर अस्ताव्यस्त पडला होता. तिनं दिव्याचं बटन ओढलं आणि अंथरूणांत पडलेल्या रघुनाथाला पाहून ती चरकली. डोळे बोट बोट खोल गेलेले, ओठ सुकलेले, दृष्टि तारवटलेली आणि देह जणु कोणी पिळून टाकल्याप्रमाणें शुष्क आणि निर्जीव. ती एकदम पुढे धांवली. रघुनाथाचं मस्तक कुरवाळींत तिनं म्हटलं,

"मी आलेय. पाह्यचं ना माझ्याकडे. काय दशा झाली ही ? काय झालं ?" तिचा गळा एकदम दाटून आला.

रघुनाथ आपल्या त्या तारवटलेल्या दृष्टीनं कितीतरी वेळ तिच्याकडे

पहातच राहिला. ओळख पटल्यावर भरून यावे तसे त्याचे डोळे भरून आले. ओठ थरथरूं लागले. पण ओठांतून शब्द फुटेना. कारण जें तिला सांगावसं त्याला वाटलं तें फार फार भयंकर होतं. त्यानं एकदम तिच्या मांडीवर मस्तक पालथं ठेवलं आणि तिच्या कमरेभोंवतीं दोन्ही हात टाकून चुकलेलं वासरूं आईला बिलगतं तसा तो जानकीला बिलगला. कोरड्या हुंदक्यांनीं त्याचं शरीर गदगदूं लागलं. तो रडूं लागला.

जानकीला कांहीं सुचेना. ती त्याच्या केसांवरून, गालांवरून, पाठीवरून हात फिरवीत सारखी म्हणत राहिली, " उगी उगी, हें काय भलतंच. उगी.. "

कितीतरी वेळानं रघुनाथाचे ते हुंदके थांबले. तिच्या कुशींत तोंड लपवून रघुनाथ म्हणाला, " जानकी, पुन्हां मला सोडून तूं कधीं जाऊं नकोस. "

जानकी सुशिक्षित असती, कथा कादंबऱ्या वाचणारी असती तर कितीतरी शब्दांनीं अंतःकरणांत दाटलेलं प्रेम तिनं रघुनाथाला सांगितलं असतं. रघुनाथाच्या त्या उद्गाराबरोबर गेले कित्येक दिवस तिच्या मनांत त्याच्या विषयीं वाढत गेलेली अढी एकदम विरघळून गेली होती. आपला पति आपल्यावर प्रेम करीत नाहीं, आपल्याकडे दुर्लक्ष करतो अशा शंका घेतल्याबद्दल ती स्वतःला दूषण देत होती. खरं पहातां किती विलक्षण प्रेम तो तिच्यावर करीत होता. साधं भाडण तें काय आणि त्याचं रागाच्या भरांतलं बोलणं मनाला लावून घेऊन ती रडली तें काय. न बोलतां लग्नाला नेघून गेली आणि एक दिवस उशीरा परतली. कदाचित् ती घरीं परतणारच नाहीं अशा भीतीनं रघुनाथानं केवढा त्रागा करून घेतला होता, आणि आतां तिला पाहतांच तो लहान बालकाप्रमाणें तिला बिलगला होता, रडला होता, आणि आतां म्हणत होता, " जानकी, मला सोडून तूं कधीं जाऊं नकोस. " या साऱ्या विचारांनीं जानकीलाही रडूं आलं. तिनं पदरानं डोळे पुसले, आवंढा घोटला, आणि रघुनाथाच्या कानशिलावर आपला गाल टेकून ती पुटपुटली, " मी आपले पाय सोडून कुठें जाऊं ? "

कांहीं वेळानं आनंद हलक्या पावलांनीं जिन्याच्या तोंडाशीं येऊन उभा राहिला. जानकीनं त्याला खुणेनं सांगितलं, " एक कप कॉफी करून आण. "

आनंदानं करून आणलेला कॉफीचा कप रघुनाथाच्या तोंडाशीं नेत जानकी म्हणाली, " थोडी गरम कॉफी घ्या. म्हणजे बरं वाटेल. "

कॉफी ! तो शब्द ऐकतांच रघुनाथ केवढ्यांदा दचकला. जानकीच्या हातांतल्या त्या कपांतून वाफा येत होत्या. त्या कपाकडे भेदरलेल्या दृष्टीनं रघुनाथ क्षण दोन क्षण पहात राहिला. त्याचा चेहरा पुन्हां भकास दिसूं लागला, ओठ थरथर कापूं लागले. त्यानं झटकन् हात उचलला आणि ताडकन् त्या कॉफीच्या पेल्यावर मारला.

कप खळकन फुटला. कॉफी जमिनीवर सांडली. आणि जिन्याच्या तोंडाशीं गोरंमोरं तोंड करून आनंद हा प्रकार पहात राहिला.

रघुनाथानं पुन्हां जानकीच्या कुशींत तोंड लपवलं आणि तो हुंदके देऊं लागला.

जानकी आनंदाला म्हणाली, " जा बाळ, देवापुढें 'शुभं करोति' म्हण जा. "

आनंद खालीं गेल्यावर ती रघुनाथाला पोटाशीं धरून कितीतरी वेळ बसून राहिली. पायाला मुंग्या आल्या म्हणून तिनं चाळवाचाळव केली तों रघुनाथ पुटपुटला, " मला दूर लोटूं नको. मला भय वाटतं ग.. "

पहाटेपहाटे रघुनाथाचा डोळा लागला. त्याचं मस्तक तिनं हळूंच उशीवर ठेवलं. आपल्या अंगाभोंवतींचे त्याचे हात उचलून गादीवर ठेवले. पायगतीचं पांघरूण त्याच्या अंगावर घातलं आणि जानकी हलक्या पावलांनीं जिना उतरून खालीं आली. माजघरांत पसरलेल्या गादीवर आनंद आणि कुसूम अंगाची मोटकुळी करून झोंपलीं होतीं. जानकी वांकली आणि त्यांची पांघरूणं सारखी करूं लागली. तिला पुन्हां सरळ उभे रहावेना. तिचा कणा सणसणूं लागला. जागरणानं तिचं शरीर आंबल्यासारखं झालं. पण या शारीरिक वेदना तिला जाणवल्या नाहींत. कारण तिचं मन प्रसन्न झालं होतं. जो दुरावला या शंकेनं ती अस्वस्थ झाली होती तो तिचा रघुनाथ तिला मिळाला होता. ती अंगणांत आली. तिनं हर्षभरित चित्तानं वर पाहिलं तों सूर्य नुकताच उगवत होता. आणि अंगणांतल्या वेलीच्या जाळींत पाखरं किलबिलत होतीं.

आतां जानकीचं चित्त पुन्हां संसारांत रमूं लागलं. रघुनाथाची तब्येत

सांभाळण्याकरितां ती परोपरीनं झटूं लागली. पुरुषांना खूष करण्याचा एकच मार्ग जानकीसारख्या सुग्रण स्त्रियांना ठाऊक असतो. तो म्हणजे परोपरीचे खमंगटमंग पदार्थ करून त्यांना खाऊं घालणं. परंतु ते रेशनचं धान्य तर जानकीच्या सुग्रणपणाची कसोटीच पहात होतं.

एके दिवशीं तिच्या पुढ्यांत पायलीभर आंबेमोहर तांदूळ ओतून रघुनाथ तिला म्हणाला, " आतां तर होईल तुझ्या मनासारखा भात ? "

जानकीनं तो नाजुक बारीक तांदूळ हातांत घेऊन म्हटलं, " अगबाई इतका सुंदर तांदूळ कुठून मिळाला ? "

" आपला खिसा पाढरा असला कीं काळ्या बाजारांत वाटेल तें मिळतं. "

" पण—— "

" पण नाहीं नि बिण नाही. तुला तांदूळ पसंत आहेत ना ? बस्, बाकीच्या चौकशा करून तुझं डोकं का शिणवतेस ? "

जानकीनं ते तांदूळ माजघरांतल्या अंधेऱ्या कोपऱ्यांतल्या कपाटांत ठेवून दिले. हळूहळू तिच्या कपाटांतला हा नाजुक साजुक धान्याचा, जिनसांचा सांठा वाढतच गेला. बाहेर लोक उकड्या तांदळाचा भात, मीलोची तांबडी भाकरी आणि विसविशीत आटयाच्या पोळ्या खात होते, तर जानकी रघुनाथाच्या पानांत आंबेमोहोराच्या सुवासिक भातावर वरण तूप वाढीत होती, आणि रेशमासारख्या मऊ पोळीशीं साखरेचा सुधारस घालीत होती.

शेगडीवर वाफेला आलेला भात खालीं उतरून ठेवतांना जानकीच्या मनांत गेल्या सहा महिन्यांत घडलेला हा सारा इतिहास उभा राहिला. तिला त्या कुडबुड्या ज्योतिषाची आठवण झाली. तिच्या मनांत आलं त्या ज्योतिषाचं सारं भविष्य कसं खरं ठरलं पहा. तिच्या पतीची तिच्यावरची मर्जी वाढली होती. घरांत धान्यधुन्य तुडुंब भरलं होतं. आणि प्रत्यक्ष तुळजाभवानीनंच त्या ज्योतिषाच्या तोंडून आशीर्वाद दिल्यासारखं घरांत कार्यही निघालं होतं. एकदां रघुनाथ विशेष खुषींत पाहून तिनं आनंदाच्या मुंजीचा विषय काढला होता, " होऊं दे तुझ्या मनासारखं. आनंदाची मुंज करून टाकूं "

" पण.. " जानकी म्हणाली.

"ती सारी व्यवस्था माझ्याकडे. तूं नुसतं मिरवायचं." रघुनाथ म्हणाला.

"तुम्हांला कर्जांत टाकून मला कांहीं गोड लागायचं नाहीं." जानकी म्हणाली.

"पण कर्ज कशाला काढायचं ?"

"मग पैसे ?"

"बाबूशेटचं मीं एक काम केलं त्याबद्दल मला तो कमिशन देणार आहे."

"एवढं ?"

"तुला हवे तेवढे पैसे दिले मी म्हणजे झालं ना ? आतां अधिक ओढून चंद्रबळ आणू नको. लाग तयारीला मुंजीच्या." रघुनाथ म्हणाला होता.

जानकीनं आनंदाला पाठवून धोंडू भटजींना बोलावून घेतलं होतं. कागदपेन्सिल घेऊन आनंदाला यादी करायला बसवलं होतं. त्या संध्याकाळीं धोंडू भटजी उठून गेले ते मुंजीचा मुहूर्त आणि सारा तपशील ठरवूनच. आचारी, वाजंत्री, बॅंड, सारं कांहीं त्यांनीं ठरवलं होतं. जातांजातां ते जानकीला म्हणाले होते, "मुहूर्त चार दिवसांवर आला आहे. बरं, उद्यां सकाळीं जाऊन मुंजामुलाला कपडे आणि कापडचोपड खरेदी करा."

रघुनाथाला भटजीचा निरोप जानकीनं सांगितला तेव्हां तो म्हणाला, "ठीक आहे. मुलांना सकाळीं थोडा भात जेवूं घाल. आपण सारी मिळून बाजारांत जाऊं. तुझं आटोपेपर्यंत मी थोडी चक्कर मारून येतों."

जानकीनं भात खालीं उतरला आणि ती मुलांना हांका मारूं लागली. "चला रे जेवून घ्या चार घांस. आत्ता येतील आणि घाई करूं लागतील."

आणि झालं तसंच. मुलं पानावर बसलीं तोंच दाराशीं मोटार उभी राहिल्याचा आवाज ऐकूं आला. "म्हणजे ? हे मोटार घेऊन आले कीं काय" असं आश्चर्यानं उद्‌गारत जानकी चुलीपासनं उठली.

मुलंही अर्ध जेवण टाकून पुढच्या दारीं धांवलीं. जानकी दाराशीं जाऊन पहाते तों तपकिरी रंगाची जुन्या फोर्ड मॉडेलची गाडी फाटकाच्या दाराशीं उभी होती. कोल्हापुरी पद्धतीनं फेटा बांधलेल्या ड्रायव्हरपाशीं कांहीं बोलून रघुनाथ खालीं उतरला आणि फाटक उघडून आंत शिरला.

"मोटार आली मोटार आली" असं बडबडत मुलं उष्टया हातांनींच

नाचत होती. आणि जानकी ओचा पदर खोचलेल्या वेषांत उभी होती.

"हात्त्याच्या ! अजून तुमची तयारी व्हायचीच आहे ? चला आटपा लवकर." रघुनाथानं तगादा लावला. माडीवर जाऊन कोटाचा खिसा चांचपीत रघुनाथ खालीं आला तो मंडळी तयार होती.

"हें काय तूं याच लुगड्यानं येणार ?"

"असूं दे. ठीक आहे."

"नको. बदलून ये."

"कशाला ? आपल्याला कापड खरेदीला गणपतीच्या दुकानांतच जायचं ना ?" जानकीनं सबब पुढें केली. जणुं बाजारपेठेंत मोठ्या दुकानांत जायचं असतं तर ती नवें पातळ नेसली असती. ठेवणींतलं असं पातळच तिला नव्हतं !

"शाब्बास !" रघुनाथ म्हणाला. "त्या गणपतीच्या दरिद्री दुकानांत कां तूं मुंजीचं कापडचोपड खरेदी करणार ? आपल्याला जायचंय चंपकलाल माणेकलालच्या स्टोअर्स मध्यें."

पण ती तशीच उभी राहिलेली पाहून रघुनाथ म्हणाला, "चला मग, उशीर नको."

मोटारींत चढतांना जानकीचे अनवाणी पाय रघुनाथाच्या लक्षांत आले. "हें काय ? तूं चपला नाहीं घातल्यास ?"

"कशाला ? मोटारींतून तर जायचं." जानकी म्हणाली.

"आईला आहेत कुठें चपला ?" कुसूम ओरडली.

"आणि तुला तरी कुठेत ?" आनंद म्हणाला.

ड्रायव्हर समोर आणखी अब्रू जायला नको म्हणून रघुनाथ घाईनं म्हणाला, "आपण सगळ्यांना चपला घेऊं या." ड्रायव्हरच्या कानाशीं तो म्हणाला, "प्रथम चंपकलाल माणेकलालकडे घ्या."

"लक्ष्मीरोडवर ?" ड्रायव्हरनं तोंडांतला तंबाखू संभाळत विचारलं.

"हां" रघुनाथानं उत्तर दिलं. ड्रायव्हरनं गाडी सुरूं केली. खिसा चांचपीत रघुनाथ ऐटीनं सीटवर रेलला. घरट्यांतून पांखराच्या पिल्लांनीं बाबरलेल्या चेहऱ्यांनीं बाहेर डोकवावं तशी आनंद कुसूम मोटारीच्या खिडकींतून बाहेर डोकावूं लागलीं. जानकी मोकळ्या अंगानं मोटारींत

अजून बसली नसली तरी तिच्या एरवीच्या चेहेऱ्यावर मोटारींत बसल्याची ऐट दिसूं लागली. तिच्या मनांत आलं, नाटेकरांच्या सखूताईनं पाह्यला हवी आपली मोटारीची ऐट. अशी चरफडेल! जानकीनं वाकून सखूताईच्या घराकडे पाहिलं तों हातांत वेणीचा पेड घेऊन सखूताई दारांतच उभी होती आणि आ वासून त्या तपकिरी फोर्डकडे पहात होती! चित्र्यांची मंडळी मोटारीतून चालली आहेत यावर तिचा जणुं विश्वासच बसत नव्हता. "बघवत नाहीं मेल्यांना" जानकी पुटपुटली आणि एक समाधानाचा सुस्कारा सोडून मोटारींत ऐसपैस बसली.

चंपकलाल माणेकलाल स्टोअर्स पुढें ही तपकिरी फोर्ड उभी राहिली तेव्हां नेहमीं दुकानांत बसणारा चंपकलालचा मुलगा चांदमल लगबगीनं पुढें आला आणि म्हणाला, "या साहेब, या बाईसाहेब."

राजेरजवाड्याकडे जसे पाहुण्याचे अ, ब, क असे वर्ग पाडले जातात आणि त्या फरकानें त्यांचा इतमामही ठेवला जातो तसे व्यापारी लोक गिऱ्हाईकांचेही तीन वर्ग पाडतात. मोटारींतून येणाऱ्या पहिल्या वर्गाच्या गिऱ्हाईकासाठीं प्रत्यक्ष मालकानं सामोरं यायचं असतं. दुसऱ्या वर्गाच्या पांढरपेशा गिऱ्हाईकासाठीं नोकराला ओरडून सांगायचं असतं. 'अरे बाईंना काय पाहिजे बघ." आणि तिसऱ्या वर्गाच्या किरकोळ गिऱ्हाइकासाठीं असलीं दुकानं नसतातच मुळीं.

परंतु तपकिरी फोर्डमधून उतरलेल्या बाईसाहेबांचं जुनं लुगडं, आणि साहेबांच्या अंगांतला सुती शर्ट कोट पाहून चांदमलच्या चेहऱ्यावरचं तें आर्जवी हास्य 'स्वीच ऑफ' केल्याप्रमाणें नाहींसं झालं. तो चटकन मागें वळला आणि जरीची पुणेरी पगडी घातलेल्या एका धनिकाशीं पूर्ववत् बोलूं लागला.

नोकरानं जानकीच्या पुढ्यांत इंदुरी, नागपुरी, मदुरा पातळांची रासच रचली. ठराविक रंग, ठराविक किनारी आणि जाडाभरडा पोत. एकेका पातळाची घडी पुढें ओढून, बोटांनीं चाचपून जानकी रंग, पोताची परीक्षा करूं लागली.

"याची काय किंमत?" तिनं नोकराला विचारलं.

"सव्वीस बारा आणे."

"सव्वीस ?" जानकीनं आश्चर्यानं थक्क होऊन विचारलं. पातळाचा एकंदर नूर पाहतां तें तिच्या बजेटांत बसेल इतकं म्हणजे फार तर बारा पंधरा रुपयापर्यंत असेल अशी तिची कल्पना होती.

जानकीचा चेहरा एकदम उतरला. "छे, इतकं महागाचं नको."

"तुला पसंत आहे ना ? मग घे." रघुनाथ म्हणाला.

"पण पैशाच्या मानानं त्याचा रंग, पोत कुठंय भारी ?" जानकी म्हणाली. "पातळं राहूं देत. धोतर जोडी दाखवा बघू."

"धोतर जोडी विचारूंच नका." नोकर म्हणाला.

"म्हणजे शिल्लकच नाहीं ?"

"बाजारांत कुठेंच मिळणार नाहीं तुम्हांला."

"पण परवा नाटेकरांच्या सखूताईनं जावयाला फिनले धोतरजोडी घेतली काळ्या बाजारांत."

"तुमच्या गोडाऊनमध्यें असेल बघा एखादा नग." रघुनाथ डोळे मिचकावून म्हणाला.

"तें तुमच्या बजेटांत बसायचं नाहीं." चांदमल त्यांना म्हणाला.

"हे बघा शेटजी, तुमच्या दुकानांत यायचं म्हणजे किती बजेट लागतं याची कल्पना आहे मला. त्या तयारीनंच मी आलोंय. तेव्हां आतां अगदीं शिलकींतला माल दाखवा बघू.." रघुनाथ खिसा चांचपीत म्हणाला.

"वा. हे आधींच सांगायचं नाहीं ? चला माडीवर. कांहीं चांगले नग दाखवितों तुम्हांला. मात्र अगदीं खास गिऱ्हाइकासाठींच असा माल ठेवतों हां आम्ही. आम्हांला जपूनच व्यवहार करावा लागतो."

"त्याची नको काळजी" रघुनाथानं उत्तर दिलं.

चांदमलनं रघुनाथ जानकी वगैरे मंडळींना मागच्या बाजूच्या जिन्यानं ज्या माडीवर नेलं ती माडी दुकानाच्या दुसऱ्या मजल्यावर पाठीमागच्या बाजूला होती. त्यामुळें तेथें दिवसाढवळ्या देखील फारसा उजेड नव्हता. पांढऱ्या स्वच्छ चादरींनीं झांकलेल्या गाद्या तक्के अशी बैठक अंथरलेली होती आणि एका भिंतीला एक पुरुष उंचीची लोखंडी तिजोरी उभी होती.

प्रथम जानकीला वाटलं माडी रिकामीच आहे. पण चांदमलनं दिव्याचं

बटन दाबल्यावर माडीत लखलखीत उजेड पडला. त्या उजेडांत तक्याला टेकून बसलेली एक स्त्री जानकीला दिसली. रंगानं काळीसावळी, तलम मलमल नेसलेली. तिचा वेष असा साधा असला तरी चेहरा नखरेल होता. कोरलेल्या भुंवया, सुरमा घातलेले निर्भिड डोळे, रगलेले ओठ यावरून ती स्त्री कांहीं घरंदाज वाटत नव्हती. तबक पुढें ओढून ती ज्या तऱ्हेनं पानाला चुना लावत होती तीवरून जानकीची खात्री झाली.

"आम्हांला विसरलात वाटतं चांदमल ?" ती स्त्री पानाची बारीक घडी तोंडांत कोंबींत म्हणाली.

"खालीं पण गिऱ्हाइकं होतीं. आम्हांला सगळ्यांनाच खूष ठेवलं पाहिजे केसरबाई." चांदमल हंसत म्हणाला.

"त्या सगळ्यांत आम्ही आहों ना ?" केसरनं विचारलं.

"तर तर !"

"मग माझ्यासाठी ऑर्गंडी आणलीत का सांगा." केसरनं प्रश्न केला.

"तुमचं पान खाऊन होऊं द्या. तोंवर यांना माल दाखवतो."

अस म्हणून चांदमलनं तिजोरी उघडली आणि गादीवर पातळांच्या घड्या टाकीत तो जानकीला म्हणाला, "अशा पुढें या ना बाईसाहेब."

पण जानकी पुढे आली नाहीं. ती रंगेल स्त्री ज्या गादीवर बसली होती त्या गादीवर बसण्याला तिचं मन तयार होईना. ती तिथेच बाजूला बसली आणि म्हणाली, "आधी धोतरजोडी काढा."

"अग धोतरजोडीचं पाहूं मग. मुजीत माझ्यापेक्षां तुला मिरवायचं आहे. पातळच काढा बघूं." रघुनाथ म्हणाला.

त्या दोघांच्या त्या बोलण्याच चांदमलला कौतुक वाटलं. तो हंसून म्हणाला, "बाईसाहेब, धोतरजोडी, मी उत्तम देईन काळजी नको. तुम्ही पातळं पहा. हें पहा चंदेरी जरी बुट्टीचं किती तलम धागा, इंग्लीश कलर...."

त्यानं तें पातळ फर्रकन उलगडलं आणि जानकीसमोर धरलं.

"हें पहा अस्सल इंदुरी–" असं म्हणत अंजिरी रंगाचं बारीक मुगव्या चौकटीच आणखी एक पातळ चांदमल उलगडूं लागला.

"मातृभोजनाला हें छान आहे नाहीं ?" जानकीनं रघुनाथाला म्हटलं.

पण रघुनाथ चोरट्या नजरेनं त्या काळचासावळचा स्त्रीकडे पहात होता. जानकीच्या तें लक्षांत आलं आणि तिनं मान खालीं घातली.

" तुम्हांला पसंत आहे ना ? मग साहेबांना पसंत असणारच. " चांदमल म्हणाला.

रघुनाथानं चमकून त्या स्त्रीवरची नजर काढली आणि हंसून म्हटलं, " तें चंदेरी जरी बुटीचं ना ? "

जानकी कांहींच बोलली नाहीं. तिच्या अंतःकरणांत कांहीं तरी खळबळ माजून राहिली.

चांदमल तऱ्हेतऱ्हेच्या साड्या उलगडीत होता. रंगाची, पोताची, डिझाइनची प्रशंसा करीत होता. प्रसंगीं एखाद्या जरीबुटी शालूचा पदर आपल्या अंगावर देखील घेऊन दाखवीत होता. आणि जानकी तें सारं पहात होती. चकित होत होती. त्यांच्या किंमती ऐकून तिचं मन दडपून जात होतं.

कोणती पातळं निवडावी याचा तिला निश्चय करतां येईना हें पाहून चांदमल म्हणाला,

" हें जरीबुटीचं चंदेरी घ्या. असे दोन नग मी या केसरबाईंना दिले परवां. "

केसरबाई हंसली आणि जानकीला म्हणाली, " मी तुमच्या जागीं असतें तर तें चंदेरी घेतलं असतं. "

पण जानकीनं कपाळाला आंठ्या घातल्या. तें चंदेरी पातळ बाजूला सारीत ती म्हणाली, " नको. तें मळखाऊ नाहीं. "

" तुला कुठं काम करायचंय तें नेसून ? मुंजींत तर मिरवायचं आहे. बांधा हो तें चांदमल. " रघुनाथ म्हणाला, आणि त्या काळ्या सावळ्या स्त्रीकडे पाहून हंसला.

तास दीड तासाच्या आटापिटीनंतर एकदाची खरेदी आटोपली. ती केव्हां आटोपेल असं जानकीला झालं होतं. केसरबाईचा अगांतुक सल्ला, तिचं ते माना वेळावणं, भुंवया मोडणं वगैरे नखरा तिला अगदीं नकोसा वाटत होता. पातळं बांधल्यावर " तुम्ही मदत केली म्हणून खरेदी लवकर आटोपली " अस रघुनाथ तिला म्हणाला, आणि " पातळांची निवड हें तर माझं आवडतं काम " असं उत्तर देऊन ती बाई लघळपणें हसली, तेंही जानकीला

आवडलं नाहीं. चांदमल बिल केव्हां करून आणतों आणि आपण दुकानाबाहेर केव्हां पडतों अस तिला झालं होतं.

अखेर चांदमलनं बिल आणलं. रघुनाथानं खिशांतनं पाकीट काढलं आणि दहादहाच्या नोटा त्याच्या हातीं दिल्या.

"काहीं चहा कॉफी ?" चांदमलनं विचारलं.

"कॉफी ?" तो शब्द कानीं पडतांच रघुनाथाचा हात थरथरूं लागला. त्याच्या हातांतनं पैशाचं पाकिट निसटलं, खाली पडलं, आणि त्यांतल्या नोटांचा एक मोठा जुडगा बाहेर सरकला.

"नको नको—बिलकूल नको." अस घोगऱ्या आवाजांत बोलत रघुनाथानं पाकीट उचललं, बंद केलं, आणि खिशांत ठेवत तो जानकीला म्हणाला, "चला."

"निदान पान तरी घेऊन जा." असं म्हणत केसरबाईनं पुढें होऊन रघुनाथाच्या हातांत एक पानपट्टी दिली आणि मिस्किलपणें हंसून म्हणाली, "या चांदमलला गिऱ्हाइकाला कसं खूष करावं तें कळतच नाहीं."

त्या एकंदर दृश्याकडे जानकीनं पाठ फिरवली. जिन्याच्या तोंडाशीं ठेवलेली चप्पल तिला धड दिसेना कीं पायांत सरकवितां येईना. रागाची चमक तिच्या डोळ्यांत विजेप्रमाणें लकाकली. तिची चप्पल घालून होईपर्यंत रघुनाथ खोळंबून उभा होता.

जिना उतरतां उतरतां वर माडीवर चाललेलं बोलणं जानकीच्या कानीं पडलं,

"कोण हे गृहस्थ ? बडे गब्बर दिसताहेत." ती काळीसावळी स्त्री चांदमलला विचारीत होती.

चांदमलनं काय उत्तर दिलं तें जानकीला ऐकूं आलं नाहीं. पण नंतर कितीतरी वेळ त्या बाईच्या विचारामुळें ती बेचैन झाली ! तिच्या मनांत येत होतं. कोण ही बाई ?...

# प्रकरण चवथें

सूर्य आतां अगदीं माथ्यावर आला होता. रस्ते तापले होते. ती जुनी तपकिरी फोर्ड गाडी तापली होती आणि बाजारपेठ हिंडून हिंडून रघुनाथ आणि जानकी पण तापलीं होतीं. मुंजामुलासाठीं तयार कोट, शर्ट, विजार, कुसूमसाठीं नवे झगे, मुलांसाठीं आणि जानकीसाठीं नवे बूट, चप्पल. कुसूमसाठीं बांगड्या रिबना वगैरे लहानमोठ्या जिनसांची खरेदी म्हणजे एक तापच ! जानकीचे पाय थकले होते, मुलं कंटाळलीं होतीं. आणि वेळोवेळीं झोपमोड झाल्यामुळें ड्रायव्हरही त्रासला होता.

"आतां एकच महत्वाची खरेदी राहिली" बाटाच्या दुकानांतून बाहेर पडतां पडतां रघुनाथ म्हणाला.

"ती कोणती ?" जानकीनं विचारलं.

"बटूसाठीं टोपी घ्यायची" रघुनाथ आनंदाच्या झुलुपांवरून हात फिरवीत म्हणाला.

मुंजीचा बेत ठरल्यापासून आनंदाला आनंद अशीं हांक मारण्याऐवजीं 'बटु' 'मुंजामुलगा' अशी हाक लोक मारूं लागले होते.

रघुनाथानं फेटेवाल्या ड्रायव्हरला खांदा हलवून जागं केलं आणि तो त्याच्या कानाशीं ओरडला, "आतां बुलबुले कॅप मार्ट माहीत आहे ना ? चौकांतला ? तिकडे घ्या."

"बुलबुले कॅप मार्ट" हें दुकान केवढं भव्य होतं. कांचेच्या कपाटांतून तऱ्हेतऱ्हेच्या रंगाच्या आणि बांधणीच्या टोप्याच टोप्या रचून ठेवल्या होत्या. पारशी, मुसलमानी, मारवाडी, ब्राह्मणी, गुजराथी, साहेबी – तऱ्हेतऱ्हेच्या जातीच्या टोप्या तेथें होत्या, त्या टोप्या माणसांच्या डोक्यावर असत्या तर अंतरभारतीचं संम्मेलनच भरल्याचा भास झाला असता.

दुकानामधील विक्रीच्या बाकावर मुलांचीं, मडमांचीं, पुरुषांचीं डोकीं मांडलेलीं होतीं, आणि त्यावर तऱ्हेतऱ्हेच्या टोप्या बसविल्या होत्या. आनंद आणि कुसूम त्या मुंडक्यांचीं गंमत पहात उभीं राहिलीं.

" आनंदा, तुला कसली टोपी पाहिजे सांग." जानकीनं आनंदाला ओढीत विचारलं.

आनंद उभा होता त्या कपाटांत शुभ्र गांधी टोप्या रचलेल्या होत्या. आणि गांधी टोप्या घातलेली नेहरू, सानेगुरुजी वगैरेंचीं मुंडकीं पण मांडलेलीं होतीं.

मला गांधी टोपी पाहिजे. " शाळेंतल्या गोडबल्यासारखी. " आनंदानं जानकीच्या कमरेभोंवतीं हाताचा विळखा घालून घट्ट धरला.

" गप्प रे " असं जानकी म्हणाली. कारण तिचं सारं लक्ष रघुनाथाकडे लागलं होतं.

रघुनाथासमोर निळ्या, जांभळ्या मखमलीवर झिग कलाबूतचं भरतकाम केलेल्या कितीतरी टोप्या दुकानदारानं ठेवल्या होत्या. कांहीचे आकार वाटोळे होते, तर काहींचे पालथ्या बादली सारखे. पण रघुनाथ म्हणत होता,

" छे छे. असली टोपी नको. जांभळ्या मखमलीवर भरतकाम केलेली होडीच्या आकाराची आणि मानेकडच्या टोकाला फीत लावलेली टोपी हवी. " जणू रघुनाथ लहान झाला होता आणि आपल्याला हव्या त्या टोपीचं वर्णन करीत होता.

सारं दुकान धुंडाळलं तरी तसली टोपी सांपडेना. अखेर नोकर टेबलाशीं बसून नजर ठेवणाऱ्या नव्वद वर्षांच्या मालकाच्या कानाशीं कुजबुजून परत रघुनाथाकडे आला आणि म्हणाला,

" एका गिऱ्हाइकासाठीं बनवलेली खास टोपी आहे. "

" आणा पाहूं " रघुनाथ म्हणाला.

नोकरानं एक लंबवर्तुळाकार कार्डबोर्डचा डबा आणला. तो उघडून झिरझिरीत गुलाबी कागदांत गुंडाळलेली ती टोपी त्यानें बाहेर काढली.

रघुनाथ अनिमिष नेत्रानं त्या टोपीकडे पहातच राहिला. ती जांभळी मखमल, त्यावर भरलेलं तें झगमगणारं जरीकाम, कपाळाशीं उंच आणि

मानेशीं निमुळती झालेली ती होडीसारखी सुबक बांधणी आणि टोकाशीं लोंबणाऱ्या जरीच्या फिती अगदीं हुबेहुब त्या लहानपणीच्या टोपी सारखीच ही टोपी होती. रामू चव्हाणाला शहरांत धाडून आईनं त्याच्यासाठीं जी टोपी आणवली होती ती अगदीं अशीच होती. सव्वीस वर्षांपूर्वीचा प्रसंग रघुनाथाच्या डोळ्यापुढें उभा राहिला, ती टोपी डोकीवर ठेवून तो इतका बागडला होता कीं त्याचा तो आनंद पाहून त्याच्या आईच्या डोळ्यांत पाणी उभं राहिलं होतं. पण तोंडांतला घास हिसकून घ्यावा त्याप्रमाणें ती टोपी त्याच्या मामांनीं हिसकून घेतली होती. कित्येक दिवसांचं टोपीचं स्वप्न खरं ठरलं त्याच क्षणीं भंगलं होतं. आतां सव्वीस वर्षांनंतर तसलीच टोपी रघुनाथ पहात होता. पण तें लहानपण आतां परत येण्यासारखं कुठें होतं ?

रघुनाथानं एक आवंढा घोटला. त्याच्या मनानं निश्चय केला, " मी ज्या आनंदाला लहानपणीं मुकलो तो आनंद माझ्या मुलाला मी देणारच. "

" वीस पयें पडतील. " नोकर म्हणत होता.

" ठीक आहे. " रघुनाथ म्हणाला. त्यानं घासाघीस न करतां पैसे मोजले आणि हातांत ती जरीची टोपी घेऊन तो आनंदाजवळ आला.

आनंदानं आपलं तोंड आईच्या पदरांत खुपसलं. तो पुटपुटला, " मला जरीची नको जा. मला गांधी टोपी पाहिजे. "

" काय म्हणतोय ? " रघुनाथानं कपाळाला आठ्या घालून जानकीला विचारलं.

" उगीच कांहींतरी. " जानकी म्हणाली. मग तिनं आनंदाची हनुवटी उचलून म्हटलं,

" अरे बघ तरी किती सुंदर टोपी आहे. अशी आहे कुणाची ? "

" मला नको जा. "

" ही टोपी नको ? " रघुनाथानं एकदम संतापून विचारलं. " मग कसली पाहिजे ? "

" तसली गांधी. " आनंद म्हणाला.

" भिकारडा आहे झालं. " रघुनाथ हात उगारून म्हणाला. दुकानांत जास्त शोभा नको म्हणून जानकी म्हणाली, " काय कळतंय् पोराला.

छान आहे टोपी."

परंतु तडा गेलेली कांच सांधू नये तसं त्याच्या आनंदाला जो तडा गेला तो सांधला नाहीं. तशा विचित्र मनस्थितींत सारेजण घरीं परतले.

जानकीनं पुढच्या दाराच्या चौकटीला आंब्याचे टहाळे आणि सोनेरी नारळाचं तोरण बांधलं. विघ्नहर्त्या गजाननाचा फोटोही मध्यभागीं चिकटविला. जानकीचं घर बायाबापड्यांनीं, पोरासोरांनीं गजबजून गेलं. जिजा मोलकरीण तर निवडणं टिपणं करण्याच्या निमित्तानं राह्यलाच आली होती. आणि तिच्याबरोबर अर्थातच एक तान्हं आणि दोन सुटीं अशीं तिचीं तीन मुलंही आलीं. गव्हल्याचं पीठ घेऊन बायकांचा घोळका सोप्यांत बसूं लागला. त्यांचीं बोटं झरझर चालत होतीं, आणि जिभा त्याहून जलद चालत होत्या. घरांत भांड्याच्या, भाजण्याच्या, तळण्याच्या आवाजापेक्षां गप्पा गोष्टीचे, बायका ज्या चमत्कारिक आवाजांत हसतात त्याचे आणि क्वचित उखाळ्यापाखाळ्या निघाल्या तर उडणाऱ्या खटक्याचे, पोराबाळांच्या रडण्याचे आवाज अधिक येऊं लागले. जानकी तर नुसती घामाघुमी होऊन गेली. पण तिला कुणी "बैस" म्हणत नसत. "एकुलत्या एक लेकाची मुंज. आईनं दमायला हवंच." असं ठासून म्हणत. कुणी ठमाबाई तिच्यापुढें पोळपाट लाटणं ठेवून हुकूम सोडी, "एवढ्या करंज्या दे लाटून."

मुंज दुसरे दिवसावर ठेपली. या सगळ्या गोंधळांतून निसटून जानकी अक्षत द्यायला निघाली. रघुनाथाला "मोटार आली" असं सांगायला ती माडीवर गेली तेव्हां रघुनाथ डोकीवर टोपी घालत होता. त्यानं वळून पाहिलं आणि त्याच्या हातांतली टोपी तशीच राहिली. अनिमिष नेत्रांनीं तो जानकीकडे पहातच राहिला. त्याला वाटलं गौर सजूनच आपल्यापुढें उभी राहिली आहे. तिच्या गोंडस बांध्याला दाटणारी हिरवी चोळी, जरी बुटीचं, गुलाबाच्या पाकळीच्या रंगाचं आणि ओलसर हिरवळींत पहाटेच्या सूर्यकिरणांमुळें चमकणाऱ्या कोळिष्टकाइतक्या तलम झिरझिरीत पोताचं तें पातळ, बांगड्यांनीं भरलेले गोंडस हात, अलंकारांनीं भरलेला गळा, नाकपुडीचा नाजुकपणा दाखविणारी नथ, ते काळेभोर डोळे, कपाळावरचे दाट केस, भरगच्च अंबाड्यावर घातलेली दोन्ही कानांपढें दिसणारी

मोगरीची वेणी – वगैरे सारा थाट पाहून रघुनाथ मोहून गेला. तिच्या नजरेच्या दटावणीला न जुमानतां त्यानं तिला जवळ ओढली आणि घट्ट छातीशीं धरली.

" हे काय ? अक्षत द्यायला जायचं नाहीं ? "

" अक्षत ? कसली अक्षत ? " तिच्या गालावर गाल घाशीत रघुनाथानं विचारलं.

" छान ! झोपेंत आहा कीं काय ? "

" असं वाटतंय्. कारण अशी सुंदर बायको स्वप्नांतच दिसते. म्हणून म्हटलं जवळ घेऊन पहावी. खरंच कीं काय ? "

अंगाभोंवतीचे त्याचे हात दूर करीत जानकी म्हणाली, " चला उशीर होतोय्. "

इतक्यांत जिन्यांत म्हाताऱ्या पाहुण्याबाईचीं पावलं वाजलीं. एकदोन पायऱ्या चढून तिन विचारलं, " ए जानकी, गोळयाच्या सांबाऱ्याचा भरडा कुठ ठेवलास ग ? "

रघुनाथाचा चेहरा ' गोळयाच्या सांबाऱ्या ' सारखा झालेला पाहून जानकीला खुदकन हसूं आलं. ती घाईघाईनं म्हणाली, " आलें हं आत्या.... "

अक्षत आटोपून जानकी परतली ती अगदीं दमून भागून. साऱ्या ओळखी-पाळखीच्या घरी जाऊन ती अक्षत देऊन आली होती. एरवीं कधीं घराबाहेर न पडणाऱ्या जानकीला आता वाटत होतं, जग थोडं. माणसं जगापासून दुःख लपवून ठेवतात. पण आनदाचं प्रदर्शन मात्र एखाद्या लहान बालकानं " हा बघ माझा खाऊ " म्हणत खाऊचं करावं तसं माणसं करतात. जणुं साऱ्या जगाला जानकीला सांगायचं होतं, " बघा, मी किती सुखांत आहे."

दुसऱ्या दिवशी सकाळी साताचा मुहूर्त होता. म्हणजे मातृभोजन पहांटे साडेपांच सहालाच उरकायला हवं होत. जानकी अक्षत देऊन परतली तों माजघरांत पहाटेच्या मातृभोजनाच्या भाज्या कोशिंबिरी नीट करीत बायका बसल्या होत्या. जागा मिळेल तिथें पोरंसोरं लोटलीं होतीं. नव्या पातळानिशीं जानकी शेंगाचे दोर काढूं लागली.

" हें काय ? पातळ बदलून ये ना. " म्हातारी आत्या म्हणाली.

जानकीचा चेहरा एकदम लाजेनं लालबुंद झाला. संधि साधून रघुनाथ तिच्या कानांत कुजबुजला होता, " पातळ बदलशील तर खबरदार. आणि लवकर वर ये. "

शेंगाचे दोर काढून संपले तों तिच्या पुढचांत आत्यानं कोथिंबिरीची जुडी टाकली. जानकी चुळबूळ करूं लागली. तिला रघुनाथाची मर्जी खप्पा करून घ्यायची नव्हती. तिची चुळबुळ त्या अनुभवी बायकांच्या लक्षांत आल्यावाचून राहिली नाहीं. तिच्या पुढचांतली जुडी ओढून घेत वेणूताई म्हणाली, " मी करतें नीट. तूं झोप जा जानकी. दमली असशील अक्षत देऊन. " इतक्यांत रघुनाथानं वरून हांक मारली, " जानकी ! "

झाल ! निमित्ताला टेकलेल्या त्या बायका खिदळूं काय लागल्या, हसूं काय लागल्या, एकमेकींना कोपरखळ्या काय देऊं लागल्या !

जानकी तेथून निसटली. माडीवर जाता जातां एखाद्या नव्या नवरीप्रमाणें अडखळली. पायात अडकलेलं पातळ सोडवितांना तिच्या डोळ्यांत आनंदाश्रू उभे राहिले. तिनं एकदम हात जोडले आणि पुटपुटली, " आई अंबाबाई, माझ्या या सुखाला कुणाची दृष्ट न लागो ! "

सनईच्या मंजूळ आलापानी जानकी जागी झाली. तिला वाटलं आपण स्वप्नात तर नाही. चंद्राच्या कोरेवर अंग टाकून ढगाच्या मऊमऊ पिसाऱ्यातून तर आपण तरंगत नाही ? पण छे! ती स्वप्नांत नव्हती. ती रघुनाथाच्या बाहुपाशात होती. आणि तिच्या अंगाभोवतीं रुळणारे ते ढग नव्हते तर तो रेशमी सळसळणारा स्पर्श त्या चंदेरी पातळाचा होता. जानकीनं पुन्हां डोळे मिटले. ती आलिंगनं, तीं चुंबनं आणि ती क्रीडा ती आठवूं लागली. त्या उन्मत्त सुखाची नशा तिच्या श्रांत देहावर चढूं लागली. सनईवर मंजूळ आलाप चालू होते आणि जानकी सुखस्वप्नांत रंगून गेली होती.

" जानकी ए जानकी—झाली कीं नाही तुझी झोप ? " अशी आत्याची ओरड ऐकून जानकी दचकली आणि पुरती जागी झाली. खाली माणसांची चाहूल सुरू झाली होती. न्हाणीघरांतल्या बंबाचा धूर घरांत दाटला होता, स्टोव्हचा आवाज आणि आचाऱ्यांचीं भसाडचा आवाजांतलीं बोलणीं ऐकूं येत होतीं. मातृभोजनाचा सैंपाक चुलाणावर चढला होता.

रघुनाथाची झोपमोड न करतां जानकी हलकेंच त्याच्यापासून दूर झाली.

तिनं पाहिलं तों तिच्या अंगावरचं पातळ चोळामोळा होऊन गेलं होतं. तें पातळ सोडून ती नेहमींचं जुनं लुगडं नेसली. खालीं जमिनीवर पडलेला तो सळसळणारा जरीबुटीचा बोळा घडी करण्यापूर्वी तिनं छातीशीं घट्ट धरला. तिला तें पातळ फार आवडलं होतं म्हणून नव्हे तर तें परिधान केल्यामुळें ती तिच्या पतीला आवडली होती म्हणून.

ती खालीं गेली आणि धोंडूभटजींच्या चक्रांत सापडली. मुंजामुलाचं स्नान आटोपा, द्रोण द्या, होमाची माती आणा, उदबत्त्या द्या, तिळाचे लाडू आणा— अशा हुकुमांच्या फैरी झाडीत धोंडूभटजी सैपाकघरातून अंगणांत आणि अंगणातून सैपाकघरांत जनरल रोमेलच्या रुबाबांत रपेटी मारीत होते. त्यांचा मदतनीस, नुकतंच मिसरुड फुटलेला होतकरू भटजी अंगणांत बोहल्यापुढें माती थापून, पानं सुपाऱ्या मांडून हवनाची तयारी करण्यांत गुंतला होता.

इतक्यांत बँडची पलटण आली. बँडवाल्यांसाठीं मांडलेल्या बांकावर आपापलीं विचित्र हत्यारं घेऊन ते लष्करी वादक बसले आणि त्यांनीं खडचा आवाजांत सिनेमा संगीत सुरू केलं. "हाये तेरे नैनोने चोरि किया, मेरा छोटासा जिया, परदेसिया हाये . ."

मातृभोजनाच्या पंक्तीला आत्याबाईनीं शाळामास्तराच्या शिस्तीनं बसविलेलीं सारीं पोरं धूम बाहेर पळालीं. आगगाडीचं इंजन, आकाशातलं विमान, आणि बॅंडवाल्याची पलटण या तीन गोष्टींचं लहान मुलांना केवढं आकर्षण वाटतं !

त्या गोंधळातच मातृभोजन पार पडलं. जानकीनं आनंदाला मांडीवर घेतलं होतं. आणि आपल्या ताटांतला घांस ती त्याला भरवीत होती धोंडूभटजी तिला म्हणत होते, "मुलाला हें शेवटचं भरवायचं असतं आईनं, यानंतर त्याला गुरुगृही धाडायचा असतो, बरं कां जानकी." त्या देव-कालीन मातापेक्षां आपण किती भाग्यवान असा विचार जानकीच्या मनांत येऊन ती गहिंवरली.

मांडवांत आमंत्रित स्त्री पुरुषांची गर्दी जमूं लागली. त्यांतच कुणीसा पुकारा केला, "श्रीपाद न्हावी आला."

"आतां तुझा चमन गोटा करायचा." "शेंडी ठेवायची. मांडी कापून

त्यांत बेडूक भरायचा " असं लहानथोर मंडळी मुंजामुलाला चिडवूं लागली.

शेवटीं बरोबर सात वाजतां मुंज लागली. बँडचा कडकडाट मोठा, कीं धोंडू भटजीच्या ठणठणीत मंगलाष्टकांचा खडखडाट मोठा अशी क्षण दोन क्षण चढाओढ लागली. लहान पोरांनीं तर अक्षतांचा पाऊस पाडला.

युद्धानंतरच्या त्या दिवसांत अक्षतांपुरतां देखील तांदूळ दृष्टीस पडत नसे. पण जानकीच्या मुलाच्या मुंजींत आंबेमोहोराच्या मूठमूठ अक्षता मुंजामुलावर उधळल्या जात होत्या !

परंतु सगळ्यांना खरा धक्का बसला मेजवानीच्या वेळीं. जानकी प्रत्यक्ष अन्नपूर्णेप्रमाणें पंक्तींतून हिंडत होती. आग्रह करकरून गरम गरम साखरेच्या पाकांतल्या जिलब्या पाहुण्यांच्या पानांवर वाढत होती. आंबेमोहोराच्या सुवासिक बटाटेभातावर तर सारेजण तुटून पडले होते. सखूताई नाटेकरांच्या पैलवान मुलानं तर जिलब्या खाण्याची पैज मारली होती. जिलब्याची दुरडी भरून जानकी त्याच्यापुढें उभी होती. आणि रघुनाथ म्हणत होता, " बापू अरे पाहूं तूं खाण्यांत हरतोस कीं जानकी वाढण्यांत . ." बापूचे दोस्त बापूला म्हणत होते. " बक अप बापू . ." आणि साऱ्या पंक्तींत एकच हंशा उधळला होता.

इतक्यांत फाटकाशीं पोस्टमन ओरडला, " रजिष्टर आहे हो."

रघुनाथाच्या कानांत कुणीसं बोललं, " रजिष्टर नोटिस आहे. सही करून घ्यायला हवी."

रघुनाथानं हातांतला जिलेबीचा घास खाली ठेवला आणि तो उठला.

तें रजिष्टर पत्र चांगलं जाडजूड होतं. " ही काय भानगड आहे बुवा ! " रघुनाथ पुटपुटला, आणि त्यानें तें पत्र उघडलं आणि वाचलं. घरमालकातर्फें गेंगाणे वकिलांनीं त्याला नोटिस धाडली होती. महिन्याचे आंत घर रिकामें करून देण्यास बजावलें होतें. " कारण आमचें अशीलास घरामागील रिकाम्या जागेंत नवी इमारत बांधावयाची आहे. दिलेल्या मुदतीत घर खालीं करून न दिल्यास कायदेशीर इलाज केला जाईल, व भाडेकरूंच्या कोणत्याही तक्रारीला न जुमानतां आमचें अशील रिकाम्या जागेंत नवीन इमारतीचा पाया खणण्यास सुरवात करील. . . . "

रघुनाथानं ती नोटिस पुन्हां पुन्हा वाचली. आणि एका विलक्षण भीतीनं

त्याच्या तोंडाला कोरड पडली. तो थरथर कापूं लागला.

बराच वेळ झाला तरी रघुनाथ पानावर न आलेला पाहून जानकीनं हातांतली जिलबीची दुरडी वेणूताईच्या हातांत दिली आणि ती घरांत आली. रघुनाथ खालीं नव्हताच. बोभाटा न करतां ती हलकेंच माडीवर गेली आणि पाहते तो वळकटीला टेकून रघुनाथ डोकं धरून बसला होता. डोक्यावरचे त्याचे हात बाजूला करीत जानकीनं विचारलं,

" बरं वाटत नाहीं काय ? घेरीबिरी येतीय ? "

तिचे हात झटकून रघुनाथ म्हणाला होता, " तूं जा इथून. मला एकट्याला बसूं दे."

मग तिच्या लक्षांत आलं कीं रजिष्टर पत्र आलं होतं. त्या पत्रांत कांहीं वाईट बातमी वाचल्यामुळें रघुनाथ अस्वस्थ झाला असावा.

" कुणाचं पत्र आलं होतं ?"

" का उगीच छळतेस ?" रघुनाथ तिला दूर ढकलून म्हणाला, " हो चालती. मला पडूं दे इथं."

" पण खाली मंडळी वाट पहाताहेत." जानकी म्हणाली.

" त्यांना सांग मला बरं वाटत नाहीं. कांहीं सांग पण मला त्रास द्यायला येऊं नको वर. खबरदार आलीस तर.." रघुनाथ ओरडला.

जानकी दचकून मागें सरली. खालीं आमंत्रित मडळींनीं घर भरलेलं होतं. जास्ती आरडाओरड झाली तर अब्रू जाणार होती.

गंगाणे वकिलांची ती रजिस्टर नोटिस वाचल्यापासून त्याच्या अंत:करणानं ठाव सोडला होता. दुःख माणूस सोसूं शकतो, प्रत्यक्ष मरणालाही तोंड देतो. परंतु या दोन गोष्टींपेक्षांहि भयंकर अशा भीतीनं त्याचा थरकांप उडविला होता. ही भीति तो कुणाला सांगूं शकत नव्हता. तिच्या क्रूर कचाट्यातून सुटण्याचा मार्ग त्याला दिसत नव्हता.

बिचारी जानकी ! तिला त्याच्या मनोवेदनांची काय कल्पना ? " कुणाचं पत्र आलं होत ? " असा साधा प्रश्न तिनं विचारला होता. आणि तसं पाहिलं तर उत्तरही किती साधं होतं. " घरमालकाची रजिस्टर नोटिस आली आहे, एक महिन्यांत घर खालीं करून द्या. "

" कां ? आपण भाडं तर वेळेवर देतो ना ? " जानकी म्हणाली असती.

" त्यासाठीं नाहीं. घराच्या मागच्या अंगणांत मालकांना इमारत बांधायची आहे, आपल्या सोडण्याची वाट न पाहतां ते इमारतीचा पाया खणण्यास सुरवात देखील करणार आहेत. "

" ठीक. मग पाहूं दुसरी जागा. त्यासाठीं तुम्ही का एवढा मनस्ताप करतां ? नाहींतरी मला या घराचा कंटाळा आलाच आहे. सोडूं घर — " जानकी म्हणाली असती.

पण " सोडूं घर " हा निर्णय घेण्याच्या परिस्थितीत रघुनाथ नव्हता. आणि ती परिस्थिति केवढी भयंकर होती याची कल्पना तो जानकीला देखील देऊं शकत नव्हता. एखाद्या धनिकानं आपल्या धनावर करावा तसा अष्टौप्रहर पहारा आपल्या पापावर करीत राहणं त्याला भाग होतं. प्राण गेला तरी हें घर सोडणं त्याला शक्य नव्हतं !

पण घर मालकाची रजिस्टर नोटिस आली होती. एक महिन्याच्या मुदतीत घर सोडा. कारण –

" घरामागच्या मोकळ्या अंगणांत नवीन इमारतीचा पाया खणण्याचं काम लवकरच आम्ही सुरू करणार आहों. "

मागच्या अंगणांत पाया खणण्याचं काम !

छे छे ! हें खोदकाम कधी होऊं देतां कामां नये. घरामागच्या त्या अंगणातल्या जागेला चुकून कुदळी फावड्याचा धक्का लागला तरी रघुनाथाच्या पापाचा अक्राळविक्राळ ब्रह्मराक्षस पाताळांतून ओरडत उठला असता !

" कुणाचं पत्र आलं होतं ? मला नाही का सांगायचं ? सांगा ना. " जानकी रघुनाथाला आर्जवूं लागली. त्यानं दूर ढकललं होतं तरी पुन्हां त्याच्या पाठीवर मायेचा हात ठेवून ती म्हणाली, " इतका कसला त्रास होतां तें मला नाहीं कां सांगायचं ? "

" कां पिडतेस अशी ? जा चालती हो. हो चालती ? " रघुनाथानं तिला पुन्हां दूर ढकलून दिली.

" पण खालीं मंडळी वाट पहाताहेत त्यांना काय सांगूं ?" जानकीनं विचारलं.

" काय वाटेल तें सांग.. पण पुन्हां वर येऊं नको. मी पडतों इथें एकटा. "

जानकी खालीं गेली तेव्हां साऱ्यांनीं तिच्या भोंवतीं एकच गिल्ला केला. " रघुनाथ असा अर्ध्या जेवणावरून कां गेला ? "

" त्यांना घेरी आलीय " असं उत्तर देऊन तिनं वेळ मारून नेली. पंक्ती उठल्या. पानसुपारी घेऊन मंडळी घरोघर निघून गेली. बायकांची पंगत मुळीं चार वाजतां बसली. जेवणीं खाणीं उरकतात तों भिक्षावळीची तयारी बायका करूं लागल्या. धोंडू भटजी पण हजर झाले. जानकीच्या हौशी मैत्रिणींनीं आपआपली भिक्षावळीची ताटं सजवलीं. डाळं–चुरमुऱ्यांचे काजूपिस्त्यांचे, खारीक बदामाचे, खोबऱ्याचे, बेसनाचे, रव्याचे, तऱ्हतऱ्हेचे लाडू ताटांत भरून हौसेनं पांढरी पातळं नेसून बायका भिक्षावळ घालण्यासाठीं सज्ज होत्या. बावरलेल्या बटुला त्या सजवीत होत्या, " ओम् भवति भिक्षांदेही म्हणायचं हं. " पण भिक्षावळीचा पहिला मान मातेचा. जानकी ताट घेऊन पुढें झाली. धोंडू भटजीच्या धाकानं आनंदानं अळें बळें म्हटलं, " ओम् भवति भिक्षांदेहि " जानकीनं आनंदाच्या चौपदरी झोळींत लाडवांचं ताट रिकामं केलं.

इतक्यांत बाहेर बॅंड वाजूं लागला. आणि मग मुंजामुलाला मिरवत देवाला नेण्याची गडबड सुरू झाली. जानकी तळमळूं लागली, आतां तरी रघुनाथ येईल काय ? मनांतल्या मनांत ती प्रार्थना करूं लागली, " देवा, एवढी मुंज तरी निर्विघ्न पार पडूं दे. "

तिची प्रार्थना देवानं ऐकली म्हणा किंवा जिवलग स्नेह्याचा बाबूशेठचा आग्रह रघुनाथनं ऐकला म्हणा, बाबूशेट रघुनाथाला घेऊन खालीं आला. जानकीची मुद्रा एकदम प्रसन्न झाली. मुंजामुलाला नवे कपडे घालतां घालतां ती दबलेल्या आवाजांत म्हणाली,

" तें बघ तुझ्यासाठीं बरं नसतांना ते खालीं आले. आतां भलता हट्ट करूं नकोस, जरीची टोपी घाल. "

" मी नाहीं जा. " आनंद हट्टाला पेटून म्हणाला.

" अरे सदाच आपला हट्ट खरा करूं नये. दुसऱ्यासाठीं कांहींतरी करावं. त्या टोपीला काटे आहेत ते बोचतील कां घातलीस तर ? तें कांहीं नाहीं.

टोपी घातलीच पाहिजे. " असं बोलून जानकीनं जरीची टोपी कार्डबोर्डच्या डब्याबाहेर काढली आणि आनंदाच्या डोक्यावर बसविली.

" अहाहा किती सुंदर टोपी— " बायका म्हणाल्या.

" आमच्या मुंजीत आम्हांला नव्हती मिळाली अशी भरजरी टोपी . . " बाबूशठ म्हणाला.

" काय मस्त टोपी आहे ! " आंबट चिंचा खाल्याइतका आनंद दर्शवीत पोरं नाचलीं.

पण आनंदानं तोंड वाकडं केलं होतं, आणि जानकीकडे रागानं पहात दोन्ही हातांनीं डोक्यावरची टोपी काढीत तो म्हणत होता, मला नको जा ही घाणेरडी टोपी ! मी नाहीं घालणार ! . .

आनंदाचं तें वाकडं तोंड आणि त्याच्या तोंडचे ते दुराग्रही कृतघ्न उद्गार कानीं पडतांच रघुनाथाच्या तळपायाची आग मस्तकाला पोंचली. दोन मुस्कटांत भडकवून त्याचं तोंड बंद करण्यासाठीं त्याचे हात शिवशिवूं लागले. तो झटकन् पुढें झाला. आनंदाच्या डोक्यावरची टोपी हिसकून दूर कोपऱ्यांत फेंकून देऊन तो ओरडला, " भिकारडं आहे पोर ! जाऊं दे बोडक्यानं . . "

बाबूशेठन रघुनाथाला बाहेर ओढून नेलं. कुणीतरी आनंदाच्या डोकीवर मळकी गांधी टोपी घातली आणि डोळ्यांतलं पाणी कसंबसं आवरीत जानकी त्याच्या कपाळावर मुंडावळचा बांधूं लागली.

" मन शुद्ध तुझं गोष्ट हाये पृथिवी मोलाची
तूं चाल पुढं तुला रं गड्या भीति कशाची . . "

हें गाणं छाती पुढें काढून बँडवाले वाजवूं लागले. बाबूशेठच्या जुन्या तपकिरी मोटारीचा टप खालीं काढला होता. मोटारीत पोरांची खेचाखेच झाली होती आणि गोरामोरा चेहरा करून त्यांतच मुंजा मुलगा " बटु " आनंद बसला होता. मोटारीच्या मागें हळूंहळूं स्त्री-पुरुष चालले होते. सहा गॅसबत्त्यांचा प्रखर प्रकाश मिरवणुकीवर पडला होता.

मिरवणूक पाहण्यासाठीं स्त्री-पुरुष रस्त्यांत थबकत होते, दाराखिडक्यांतून, गॅलऱ्यांतून डोकावत होते. ओळखीचीं माणसं म्हणत होतीं, " मुलाची मुंज मोठ्या थाटांत केली चिथ्र्यांनीं. पाण्यासारखा पैसा खर्च केलेला दिसतोय "

"मन शुद्ध तुझं गोष्ट आहे पृथिवी मोलाची..

बॅंड मोठमोठ्यांदा गर्जत होता.

रघुनाथ मान खालीं घालून चालत होता. ही पृथिवी मोलाची गोष्ट त्याच्याजवळ कुठें होती ? आणि म्हणून मिरवणुकीच्या मंगल प्रकाशांत देखील त्याचा चेहरा काळवंडलेला दिसत होता.

रात्रीं कितीतरी वेळ रघुनाथ अंथरूणांत तळमळत पडून राहिला. त्याच्या डोळ्यांवर आणि त्याच्या मनावर चढलेली संपत्तीची भूल या रात्रींच्या वेळीं पूर्णपणें उतरली आणि क्लोरोफॉर्मचा अंमल संपल्यावर कॅन्सरच्या वेदना सुरू व्हाव्या तशा त्याच्या हृदयाला अनेक विचार डसूं लागले, ओरबाडूं लागले. त्याच्या डोळ्यांसमोर कित्येक महिन्यांपूर्वींच्या त्या वादळी रात्रीं घडलेल्या प्रसगांचीं भेसूर दृश्यं दिसूं लागलीं, थयथया नाचूं लागलीं, त्याला भेडसावूं लागलीं, क्रूरपणें ओरडूं लागलीं.

ती वादळी रात्र, तो पावसाचा धो धो आवाज आणि दाट काळोखांत ऐकूं आलेली दारावरची थाप रघुनाथाला आठवली. खांद्यावर पडशी टाकून, पावसांत दाराशीं उभा राहिलेला म्हातारा आठवला. मुसलमानांच्या दंगलीला भिऊन, सारी चीजवस्तू सोननाणं गोळा करून, पाठीशीं बांधून कराची सोडून शेंकडों मैलांवरचं त्याचं घर गांठणारा हा म्हातारा म्हणजे बालपणी त्याच्या सुखाचं वाळवंट करणारा, त्याचा किशामामा हें कळतांच मस्तकाला चढलेला संताप आठवला. पण अफरातफरीचा तांत रघुनाथाच्या गळ्याला लागली होती. ज्या मामानं त्याची सदा हेटाळणी केली त्याचाच तो याचक बनला. मामाजवळ केलेली पैशाची याचना त्यांनीं कठोर, कुत्सित शब्दांनीं ठोकरल्यावर सूड, अपमान, निराशा यामुळें चिडलेली, चेचलेली आपल्या मनाची अवस्था आठवली. मनाच्या बेभान अवस्थेंत कॉफीच्या पेल्यांत वीष मिसळून तें त्यानं मामाच्या हातीं दिलं होतं..

वाफा येणाऱ्या त्या गरम कॉफीच्या कपाकडे पहात मामा म्हणाले होते, "आतां मला शांत झोप येईल." रघुनाथाच्या हातांतला कप त्यांनीं रिकामा केला होता. पण मामांना काळझोंपच लागली. झोप कसली ती ? झोप शांतपणे येते. आभाळांतून धार यावी तशी. पण विष आतड्यांत भिनूं लागताच मामा खुर्चीत तडफडूं लागले होते. पोट दाबून, हातपाय ताठून

आपटून ओरडूं लागले होते. आणि रघुनाथ त्यांची धडपड पहात उभा होता. बाहेर एकदम शांत झालं होतं. जणुं त्या भयंकर पापानं मुसळधार पाऊस देखाल घाबरून पळून गेला होता, सृष्टीनं आपला श्वास आवरून धरला होता. पागोळ्यांची टिपटिप आणि कुठेंतरी वाहणारें गटार यांच्या आवाजानं त्या रात्रीच्या भयाण शांततेंत भरच पडली होती..

इतक्यांत रस्त्यात दूरवर शिपायाच्या हातांतल्या काठ्या रस्त्यावर आपटल्याचे आवाज रघुनाथाला ऐकू आले होते, "घरवालेऽऽहोशियाऽऽर" हा गस्तीचा कुत्रं रडल्यासारखा हेल त्याच्या कानीं पडला होता. क्षणभर तो भयंकर घाबरला. त्यानं चटकन् दिवा घालविला. कारण असलीं कृष्णकृत्य नेहमी अंधारातच करायचीं असतात. त्यानं आरामखुर्चीखालीं पडलेली उशी उचलली आणि वेदनानीं पिळवटलेल्या, गुराप्रमाणें ओरडणाऱ्या मामाच्या तोंडावर दाबून धरली. बंदुकीचा एकच आवाज 'फट' असा झाला असता, त्या एका काडतुसानं मामाचा कारभार मुकाट्यानं आटोपला असता. पण वीष दिसायला साखरेसारखं दिसलं असलं तरी म्हाताऱ्याचे प्राण छिनून घेतांना केवढा आरडा ओरडा माजला होता. "चूप! चूप!" असं तो म्हाताऱ्यावर खेकसला होता. म्हाताऱ्याची धडपड, ओरडण कुणा चिटपाखराच्या कानी पडलं तर फांशीचा गळफांस आपल्या गळ्याभोंवतीं पडणार या भीतीनं तो मामांच्या तोंडावर उशी घट्ट दाबीत होता. पाय झाडीत, आपल्या हातांनीं उशी ढकलीत ओरबाडीत मामा आंचके देतां देतां शेवटचा शाप देत होते.

"पाप कितीहि खोल पुरलंस तरी उघडकीला आल्यावांचून राहणार नाहीं!"

"घरवाले ऽऽ होशिया ऽऽऽ र!" असा कुत्रं रडल्यांसारखा हेल काढीत हातांतल्या काठ्या रस्त्यावर आपटीत गस्तवाले शिपाई रघुनाथाच्या घराजवळ आले - थबकले— आणि— तसेच काठ्या आपटीत पुढें निघून गेले. रस्त्यांत सामसूम झाल्यावर रघुनाथानं मामाच्या तोंडावर रेटलेल्या उशीवरनं आपले हात मागें घेतले तों खोलींतही भयंकर सामसूम झालं. मामाचं विव्हळणं, कण्हणं त्याला ऐकूं येईना. तो कान फाडून ऐकूं लागला. मामांचा श्वासोछ्वासही त्याला ऐकूं येईना. म्हणजे सारा कारभार

आटोपला होता म्हणायचा !

बार उडून गेल्यावर काडतूस रिकामं जळकं पोकळ होऊन पडावं तशी रघुनाथाची त्या क्षणीं अवस्था झाली. त्याच्या रागाचा पीळ एकदम सरसर सुटला. त्याच्या डोळ्यांवरची धुंदी उतरली. मामांची धडपड थंडपणें पहात उभा राहिलेला रघुनाथ आतां डगमगला. त्यानं त्या अंधारांत डोळे घट्ट मिटले तरी तो भेसूर पिळवटलेला चेहरा त्याच्या डोळ्यांपुढें नाचूं लागला. आणि आतां मामा कायमचे शांत झाले होते तरी त्यांचं ते ओरडणं, विव्हळणं त्याच्या कानांत शिरूं लागलं. त्याच्या साऱ्या अंगाचा थरकांप सुरू झाला. ताण तुटल्याप्रमाणें तो मटकन् खालीं बसला !

तसा तो मुरगळून किती वेळ बसला होता कुणास ठाऊक? खोलींत धपकन् आवाज होतांच तो दचकला, गुडघ्यांत खुपसलेली मान त्यानं वर केली, आणि डोळे फाडफाडून तो अंधारांत इकडे तिकडे पाहूं लागला. एका कोपऱ्यांत दोन डोळे लुकलुकत असलेले त्याला दिसले, त्याची छाती विलक्षण धडधडूं लागली. कसल्या वासानं हें जनावर इथें आलं होतं? तो ताडकन् उठला आणि तें भलंमोठं रानमांजर आल्या वाटेनं खिडकींतून पळून गेलं.

मामाच्या प्रेताची विल्हेवाट लावणं भाग होतं. त्याचा वास वारा कुणालाही लागतां कामा नये. पण आरामखुर्चीत शेवटल्या यातनांनीं वाकडा तिकडा ताठलेला तो साडेतीन हात देह कसा नाहींसा करायचा? रघुनाथ कांहीं वेळ गडबडून गेला. पण मग त्याला मामाचा तो शाप आठवला. "पाप कितीही खोल पुरलंस . ."

तो एकदम भेसूर हसला, आणि सैंपाकघरांत चांचपडत चांचपडत गेला. दुभत्याच्या कपाटाआड कोपऱ्यांत हात घालून रघुनाथ चाचपूं लागला. त्याच्या हाताला वाटोळं गुळगुळीत मुसळ लागलं, ताक घुसळण्याच्या रवीचा निमुळता दांडा लागला. आणि अखेर लोखंडी पहारीचा थंड स्पर्श त्याच्या हाताला झाला. त्यानं ती पहार घट्ट पकडली, आणि तो मागच्या दाराशीं कानोसा घेत उभा राहिला.

सगळीकडे सामसूम होतं. पागोळ्या ठपकत होत्या. त्यानं हळूच दार उघडलं आणि दाराच्या फटींतून अंगणाचा कानोसा घेतला. बाहेर दाट

काळोख पसरला होता तरी अंधाराला सरावलेल्या त्याच्या दृष्टीला, अळवाचं बेट, भोपळीचा वेल, आणि दूर कोपऱ्यांतलं कडुनिंबाचं झाड, काळोखांत काळी घोंगडी पांघरून उभ्या राहिलेल्या शेतकऱ्याप्रमाणें दिसलं. त्यानं आजूबाजूंच्या घरांची चाहूल घेतली. त्या मध्यरात्रीं सारं जग गाढ झोपीं गेलं होतं. तो झपझप पायऱ्या उतरून गेला व निंबाच्या झाडाखालीं निंबाच्या बुटक्या खोडाला चिकटून कांहीं क्षण उभा राहिला. एखाद्या फोटोग्राफरनं डोक्यावर काळं फडकं ओढावं तशी निंबाच्या गर्द फांद्यांची चादर त्याच्या डोक्यावर पसरली होती. क्षण दोन क्षण असे गेले.. महत्त्वाचे क्षण वांया गेले. आणखी कांहीं वेळानं काळ्या मेघांनीं व्यापलेलं आकाश उजळलं असतं. चांदण्या चमकूं लागल्या असत्या आणि समईसारखा मंद पवित्र उजेड कदाचित् पृथ्वीवर पडला असता. त्या उजेडांत आपलं पाप लपविण्याचं धाडस कुणाही पाप्याला झालं नसतं. म्हणून काळोखाचा हा क्षण वांया घालविणं फार फार धोक्याचं होतं.

रघुनाथ त्या अंधारांत उकिडवा बसला आणि पहार जमिनीपासून फार उंच न उचलतां खणूं लागला. जमीन भुसभुशीत होती. पण मधेंच पहार एखाद्या दगडाला लागून खण् असा आवाज होई, आणि कांहींक्षण रघुनाथाची छाती बंद पडे. मग पहारीनं खणण्याऐवजीं त्या दगडाखालीं बोट खुपसून तो माती उकरूं लागे. खड्डा बराच खोल आणि लांबरुंद झाला. इतका खोल कीं रघुनाथ उकिडवं बसून खणीत होता. त्याचं डोकं जमिनीवर दिसत नव्हतं. रघुनाथाचे हात ठणकूं लागले. कपाळावरून, केसांतून घामाच्या धारा वाहूं लागल्या. त्याचं सारं अंग चिखलानं माखलं होतं. पण तरीही तो खणत होता. म्हणत होता, 'मामा मी पाप इतकं खोल पुरणार आहे कीं तें कालत्रयीं उघडकीला येऊं नये!' लहानपणीं तोंडल्याच्या वेलाखालीं मी आगगाडी पुरली ती फावड्याच्या एका घावांत बाहेर पडलीं. पण आतां मी लहान, अजाण रघुनाथ नाहीं, तर एक अट्टल– कोण? खुनी? नाहीं. खुनी नाहीं! मामांनीं पैसे देण्याचा उदारपणा दाखविला असता तर खून त्याच्या हातून कधीं घडलाच नसता.' पण रघुनाथाचं मन त्या शब्दाला कितीही दचकलं, भ्यालं तरी तो खुनी होता..त्यानं खून केला होता!..

त्या खुनाचा पुरावा तो जमिनींत इतका खोल खोल गाडणार होता कीं त्याच्या पापाला कधीं वाचा फुटूं नये. रघुनाथ जोरजोरानं खणूं लागला. आतां तो ओणव्यानं खणीत होता तरी जमिनीवर दिसत नव्हता.

तो खड्ड्याबाहेर आला तेव्हां पावसाची रिपरिप सुरू झाली होती आणि विजा कडकडून चमकूं लागल्या होत्या. रघुनाथ चटकन् घरांत शिरला. आरामखुर्चीत लोंबकळणारं मामाचं प्रेत त्यानं उचललं आणि तो पुन्हां मागल्या दाराशीं आला. त्यान कानोसा घेतला, आणि तो उंबऱ्याखालीं उतरणार तोंच वीज कडाडली आणि जो चेहरा पाहण्याचं त्यानं टाळलं होतं तो भेसूर चेहरा त्याला विजेच्या प्रखर उजेडांत अगदीं स्पष्ट दिसला.

मामाचे तारवटलेले, बाहेर फुटू पहाणारे डोळे त्याच्याकडेच पहात होते ! ओठ पिळवटले गेल्यामुळे दांतांच्या कवळ्या विचकलेल्या दिसत होत्या. जणु तें प्रेतही आतां विकट हास्य करीत होतं, आणि म्हणत होतं, " रघुनाथ पाप कितीहि खोल पुरलंस.... "

रघुनाथाच्या मस्तकाच्या शिरा तडातडा उडूं लागल्या. आणि सारं शरीर लटलट कांपूं लागलं. शक्य तितक्या लवकर, शक्य तितक्या खोल, हातांत अवजड वाटणारं हें प्रेत गाडून टाकण्याची त्याला घाई झाली. पण अंगणांत पाऊल टाकण्याची त्याला छाती होईना. पुन्हां वीज चमकली तर ? त्याच्या भयंकर कृत्यावर प्रकाश पडला तर ? अंधेऱ्या खिडकींतून, दाराच्या फटींतून, कुंपणाआडून कुणी माणसानं त्याचं हें पापकृत्य पाहिलं तर? पण भिऊन मागें सरण्याची, लपण्याची, दडण्याची सोय त्याला कुठें होती ? अखेर मोठ्या धाडसानं, तो तें अवजड प्रेत हातांत उचलून कवळून पायऱ्या उतरला, धडपडत धांवत, ठेंचकाळत, निंबाच्या झाडाखालीं पोंचला आणि प्रेत खड्ड्यांत लोटून वर माती घालतां घालतां म्हणाला, " तुमचा शाप कधीं खरा ठरणार नाहीं मामा ! तुम्हांला मी इतकं खोल गाडलं आहे कीं काय बिशाद तुमची वाणी खरी ठरेल.... "

या विश्वासांत गेले कित्येक महिने तो निश्चिंत राहिला होता. अंगणांतल्या कोपऱ्यांत कडुनिंबाच्या पाळामुळांनीं त्याचं भयंकर पाप खोल खोल दाबून ठेवलं होतं, आणि त्यावरच्या दाबलेल्या जमिनीवर पानांचा, निंबोण्यांचा आणि काटक्या काड्यांचा थर अंथरला होता. रघुनाथ अगदीं

निश्चित झाला होता. माडीवरच्या कपाटांत, कुलुपांत ठेवलेली मामाची संपत्ति सोनं नाणं हळूहळू तो वापरूं लागला होता. अफरातफरीचं सकट त्यानं परतविलं होतं. त्याच्या घरांतलं दारिद्र्य हळूहळू नाहीसं होऊं लागलं होतं. बायकापोरं सुग्रास अन्न जेवूं लागलीं होती. आणि जन्मांतही कधीं त्याच्या हातून जें घडण्याची शक्यता नव्हती तें आनंदाच्या मुंजीचं मंगलकार्य त्यानं केवढ्या थाटामाटानं साजरं केलं होतं ....

पण मुंजीच्या ऐन समारंभांत सुखाच्या, आनंदाच्या कळसावर तो असतांना, जिलबीचा घांस तोंडांत घालीत असतांना पोष्टमननं तें रजिष्टर पत्र त्याच्या हातीं दिलं होतं ! आणि त्यानं आपल्याभोंवतीं विश्वासाचा, निश्चितपणाचा जो कडेकोट निर्माण केला होता त्याला भीतीचा सुरूंगच लावला होता !

घरामागच्या अंगणांत त्याचं मोठं रहस्य त्यानं दडवून ठेवलं असतांना नव्या इमारतीचा पाया तेथें खोदण्याची कल्पनाच त्याला हवालदिल करून सोडीत होती "पाप कितीही खोल पुरलम तरी तें उघडकीला येणारच." ही मामाची शापवाणी खरी ठरणार कीं काय या शकेनं तो भेदरून गेला होता. अथरुणावर तळमळत पडला होता ....

रात्रीं बऱ्याच उशीरा जानकी माडीवर आली. रघुनाथ अस्ताव्यस्त पालथा पडला होता. मैत्रिणीच्या लग्नाहून ती परतली होती त्या रात्रीं जसा तो तिला अथरुणावर आढळला होता तसाच ! पण आता त्याच्याजवळ जाऊन मायेनं त्याच्या अंगावरून हात फिरविण्याचं धाडस तिच्यानं होईना. त्याच्या शारीरिक यातना हलक्या करण्याची जादू तिच्या प्रेमांत होती. परंतु या रात्री त्याला ज्या वेदना होत होत्या त्या मानसिक होत्या. तिच्यासारख्या भोळ्या स्त्रीच्या आटोक्यापलीकडचं त्याचं तें दुखणं होतं.

तिनं असहायपणें त्याच्या शेजारी अंथरुणावर अंग टाकलं, बेतानं. त्याची झोपमोड होऊं नये अशी खबरदारी घेऊन, आणि हळूहळू रडून थकलेल्या बालकानं आईच्या कुशींत शिरावं तशी ती झोपेच्या कुशींत शिरली.

कुणाच तरी अक्राळविक्राळ ओरडणं ऐकून ती दचकून जागी झाली. ताडकन् अंथरुणात उठून बसली. कुठें कोण ओरडतय् तें तिला कळेना. शेळीचा गळा दाबल्यावर ती आरडेल तसं कोणी माणूम ओरडत होतं.

आणि तो आवाज अगदीं आपल्याजवळूनच होत असलेला पाहून तिचे हात-पायच भीतीनें गळले. तिनं वळून पाहिलं तों तिच्या तोंडाचं पाणी पळालं. रघुनाथ अथरुणांत ओणवा राहिला होता. दोन्ही हातांनीं तो उशी दाबीत होता. आणि तो भयंकर आवाज त्याच्या तोंडांतून बाहेर पडत होता ! जानकीला वाटलं इथून एकदम पळून जावं आणि खालीं झोपलेल्या लेंकरांना पोटाशी घ्यावं. पण रघुनाथाला त्या अवस्थेंत टाकून जाण्याचा धीरही तिला होईना. शेवटीं ती त्याच्याजवळ गेली, त्याचे खांदे धरून हलवूं लागली, उशीला रेटणारे त्याचे हात दूर करूं लागली, आणि पुनः पुन्हां म्हणू लागली, " हें काय ? हें काय ? "

रघुनाथानं तिला धापा टाकीत विचारलं,

" बाहेर कोण ओरडतंय् ? "

" कुणी नाहीं. " जानकी म्हणाली.

" तें बघ. ऐक ! घरवाले ऽऽ होशिया ऽऽ र असं शिपाई ओरडताहेत. तें बघ, ऐक. काठ्या आपटल्याचे आवाज. "

जानकी कानोसा घेऊन म्हणाली, " नाहीं मला कांहीच ऐकूं येत नाहीं. " मग ती त्याला जवळ घेण्याचा प्रयत्न करीत म्हणाली, " आपल्याला कांहीतरी भयंकर स्वप्न पडलं.... "

" नाहीं. स्वप्न नाहीं ग. स्वप्न नाहीं. खरोखर सारं घडलं. ती ऐक आरोळी. ऐक ! " रघुनाथ म्हणाला. तो धापा टाकीत होता. घामानं त्याचा चेहरा दरदरला होता.

जानकी उठली. खिडकी उघडून तिनं रस्त्यावर नजर टाकली. तों रस्ता अगदी रिकामा होता. सगळं सामसूम होतं. मग रघुनाथाला ती आरोळी आणि ते काठ्यांचे आवाज कुठले ऐकूं येत होते ? तो असा थरथर कांपत कां होता ? त्याची दृष्टि अशी भयंकर तारवटलेली कां होती ? जानकीची छाती भीतीनं धडधडूं लागली. तिच्यावर कोसळूं पाहणाऱ्या संकटाची कांहींच कल्पना नसल्यानं ती भेदरली. रघुनाथाला कसला तरी भ्रम झाला होता ! .... ती खिडकींतून मागें सरली आणि रघुनाथाचा तो भयंकर चेहरा न पाहवल्यामुळें तिनं आपले डोळे हातांत झांकून घेतले.

# प्रकरण पांचवें

रघुनाथानं बादलींतल्या पाण्यांत हात बुडविला. त्याला हवं तितकं पाणी गरम होतं. त्यानं दोन्ही हात त्या वाफाळ गरम पाण्यांत मनगटापर्यंत बुडविले. सूर्याच्या आंचेनं गोठलेलं बर्फ वितळूं लागावं तसं त्याचं गोठलेलं, शरीर त्या गरम पाण्याच्या ऊष्णतेनं वितळूं लागलं. त्याला एकदम बरं वाटलं. त्यानं आपले कढत तळहात जागरणांनीं तारवटलेल्या डोळ्यांवर दाबले. त्या उष्ण पाण्याच्या स्नानासाठीं त्याचा देह आसुसलेला त्याला समजत होता. त्यानं तांब्याभर पाणी तोंडावर खांद्यावर ओतलं, आणि दुसरा तांब्या तो अंगावर घेणार तोंच —

बाहेर फाटकाशीं तीन चार माणसं मोठ्या आवाजांत बोलत असल्याचा त्याला भास झाला! तो चपापला! हातांतला तांब्या बादलींत सोडून तो कान टंवकारून बाहेरची चाहूल घेऊं लागला. त्याची छाती धडधडूं लागली, आणि त्यानं नुकतीच चूळ भरली होती तरी त्याचं तोंड कोरडं पडलं. नेहमीच्या व्यवहारांत हरघडी घडणाऱ्या क्षुल्लक गोष्टी एकदम त्याच्या आंतड्याला हात घालीत, आणि भीतीनं त्याचा थरकांप उडवीत. कुणाचीही रोखलेली नजर, कुणीही मारलेली हांक, पोष्टमननं टाकलेलं बंद पाकीट, दारावर मारलेली थाप, या साध्या गोष्टी घडल्या कीं, रघुनाथाचे हातपाय लटपटूं लागत. गेलीं सहासात वर्षं या विचित्र भीतीच्या सुरुंगावर तो रात्रंदिवस उभा होता, आणि वर्षानुवर्षांचा मानसिक ताण असह्य झाल्यामुळें त्याच्या हातापायांना अलिकडे नेहमींच कंप सुटलेला असे.

फाटकापाशीं अपरिचित आवाजांत तीन चार इसम बोलत असल्याचे आवाज ऐकतांच रघुनाथाच्या हातापायांचा कंप वाढला. त्याची छाती

धडधडूं लागली. तो कान टवकारून चाहूल घेऊं लागला. फाटकापासले ते इसम आतां घराच्या रोखानं पुढें येऊं लागले होते. सामान्य माणसांप्रमाणें त्यांची पावलं वाजत नव्हतीं. जमिनीवर मोठ्या जाड्या लष्करी बुटांचे धपधप आवाज ऐकूं येत होते. पायऱ्या चढून तीं माणसं सोप्यांत शिरलीं तेव्हां बुटाला ठोकलेल्या खिळ्यांचा पायरीच्या दगडावर केवढा आवाज झाला.

"जानकी...." रघुनाथानं हांक मारली. पण ती हांक त्याच्या गळ्या-बाहेर पडली नाहीं. भीतीनं त्याची वाचा बसल्यासारखी झाली. जानकीला बोलावून तिला सावध करण्याचा, बाहेर उभ्या राहिलेल्या इसमांना "घरांत नाहींत" असं सांगून तिच्या करवीं वाटेला लावण्याचा त्याचा बेत होता. पण तो फसला. जानकी चुलीपासून उठून बाहेर गेली होती, आणि त्या इसमांशीं बोलूं लागली होती. बाहेरची बोलणीं ऐकण्याचा त्यानं प्रयत्न केला. पण त्याचं डोकं सुन्न झालं होतं. त्याला कांहीं देखील ऐकूं येत नव्हतं. आज सहासात वर्षं जो क्षण येणार अशी भीति त्यानं सतत मनाशीं बाळगली होती तो क्षण आला होता म्हणायचा !

जानकी न्हाणीघरांत डोकावली. तिचा चेहरा पांढरा फटफटीत पडला होता. घाबऱ्या घाबऱ्या ती त्याला म्हणाली, "पोलिस आलेत."

"पोलिस ?" रघुनाथाचे ओठ वांकडे तिकडे हालले. परंतु त्यांतून शब्द नीट उमटले नाहींत. ओलेत्यानं थरथर कांपत तो तसाच न्हाणीघरांतल्या फरशीवर उभा राहिला.

एकदां त्याच्या मनांत आलें, मागच्या दारानं पळून जावं. पण त्याचे पाय लटपटूं लागले. पोलिसांचा ससेमिरा पाठीशीं लावून घेऊन फरारी होणं ही काय साधी गोष्ट होती ? खून करून फरारी झालेला इसम म्हणजे पिसाळलेलं कुत्रंच जणुं ! घरींदारीं, शेताभातांत, रानावनांत त्याला कुणी थारा देत नाहीं. आणि चौफेर पोलिसांची, गुप्तपोलिसांचीं जाळीं पसरलेलीं असतात. बंदुका रोखलेल्या असतात. नांव बदलून, वेष पालटून, भिकारी बैरागी होऊन गुन्हेगाराला हातकड्या चुकवाव्या लागतात. कुंटणखान्यां-हॉटेलांच्या मोऱ्यांत, गलिच्छ वस्तींत स्वतःला माखून घेऊन रात्रीच्या अंधेरांत लपून छपून वावरावं लागतं. परंतु एवढी सारी धडपडही अ...

व्यर्थ ठरते. सरकारी बक्षिसाच्या आमिषानं कोणी माहितगार दगाफटका करतो, आणि शेवटीं फरारी गुन्हेगाराभोंवतीं पोलिसांचं जाळं आवळल जातं. त्याच्या हातांत हातकड्या पडतात. फरारी अवस्थेला कंटाळून आपण होऊन पोलिसांच्या स्वाधीन होणारे गुन्हेगार रघुनाथानं सिनेमांत पाहिले होते. कथा कादबऱ्यांतून त्यांच्या भीषण हालअपेष्टांचीं वर्णनं वाचलीं होतीं. आज ना उद्यां आपल्यावरही तसा प्रसंग येणार या भीतीची तलवार आज सात वर्ष त्याच्या मानेवर टांगलेली होतीच ना. प्रश्न फक्त ' केव्हां ? ' हाच होता.

" पाप कितीही खोल पुरलंस तरी तें उघडकीला येणारच " असा मरतां मरतां मामांनी त्याला शाप दिला होता. परसांतल्या कोपऱ्यात त्या काळोख्या वादळी रात्रीं निंबाच्या झाडाखालीं खोल खड्डा खणून मामाचं प्रेत गाडताना रघुनाथ म्हणाला होता. " मामा, मी तुम्हांला इतकं खोल पुरलं आहे, काय बिशाद या पापाला वाचा फुटेल " आपलं पाप धरणीच्या पोटात सुरक्षित आहे या घमेंडींत नतर कित्येक दिवस रघुनाथ होता. निर्धास्त मनानें मामांच्या ट्रंकेंतील संपत्ति हळूहळू वापरण्यास त्यानं सुरुवात केली होती. मामांच्या या ट्रंकेंत सोन्याचे कितीतरी दागदागिने होते. सोन्याचांदीच्या चिपा होत्या. मोत्यांची पेंडीं होतीं हिऱ्यांच्या आगठ्या कुड्या होत्या. शिवाय बरीच रोकड रक्कम होती. परंतु ही सारी संपत्ति पापाची होती. ती काळोखांतच ठेवणं रघुनाथाला भाग होतं. चोरूनमारून त्यातला लहानसा दागिना मोडून, एखादी नोट खपवून रघुनाथ आपल्या गरजा आणि चैनी भागवित होता. या चोरीमारीच्या व्यवहारासाठीं त्यानं बाबूशेठशीं मैत्री जोडली होती.

सराफ बाजारांत बाबूशेठची सोन्याचांदीची पेढी होती. पण ती देखाव्यापुरतीच. गोव्यांतून चोरट्या सोन्याची आयात करणं हाच बाबूशेठचा खरा धंदा होता. त्याच्या हस्तकांचीं जाळी दूरवर पसरलीं होतीं. त्याचा हा धंदा तेजीत चालला होता. शिवाय बाबूशेठच्या मालकीच्या कांहीं घरांच्या माड्यांवर जुगार खेळण्याचे, आंकडे लावण्याचे अड्डे भरत असत. बाबूशेठच्या तपकिरी फोर्ड मधून रघुनाथ हिंडू लागल्यापासून रघुनाथाला येऊं लागलेल्या बरकतीविषयीं लोक तर्क रचूं लागले होते. रघुनाथ सट्टे

जुगार खेळतो असा बभ्रा होऊं लागला होता. त्यापायीं त्याची नोकरीही गेली होती.

एके दिवशीं त्याला घरींच बसलेला पाहून जानकीनं विचारलं होतं,

"आज कचेरींत नाहीं जायचं ?"

"नाहीं. मी नोकरी सोडली." रघुनाथ म्हणाला होता.

"नोकरी सोडली ?" जानकीनं आश्चर्यानं म्हटलं. मग खालीं मान घालून तांदूळ निवडीत ती पुटपुटली, "असं कांहीं तरी होणार असं मला वाटलंच होतं."

"म्हणजे ?" रघुनाथानं आंठ्या घालीत विचारलं होतं.

"तुम्ही मला कांहीं सांगितलं नाहीं तरी लोक काय बोलतात तें कानावर पडतं माझ्या."

"काय म्हणतात लोक ?"

"तें मी नाहीं सांगत. पण बाबूशेठसारख्या भानगडी माणसाची संगत बाधली तेवढी पुरे. नोकरी गेली. पण पत जायला नको. आपण वेळींच सावध व्हा."

"तूं मला शहाणपण नको शिकवूं. आणि बाबूशेठबद्दल असं वांकडं बोलूं नकोस. त्याच्यामुळें आज आपल्याला चांगले दिवस दिसताहेत. माझी नोकरी गेल्याचं समजल्याबरोबर त्यानं मला त्याच्या पेढीवर नेमून घेतलं दुप्पट पगारावर समजलीस ?"

पण रघुनाथाच्या या बोलण्यानं जानकीच्या कपाळावरच्या आंठ्या नाहीशा झाल्या नव्हत्या. रघुनाथ तेथून उठून घराबाहेर पडला होता. त्याच्या मनांत एक विचित्र चीड निर्माण झाली होती. बाबूशेठशीं मैत्री करावी हें जानकीला पसंत नव्हतं. पण त्या पैशापासून मिळणारे ऐषआराम मात्र पसंत होते. बाबूशेठशीं मैत्री होती म्हणून तर एका मोठ्या संकटांतून तो बचावला होता,

आनंदाच्या मुंजींत ऐन मेजवानीच्या वेळीं रघुनाथाला घरमालकानं रजिस्टर नोटिस धाडली होती. "एका महिन्याच्या आंत घर खालीं करा, मागच्या आंगणांत नव्या इमारतीचा पाया खणायचा आहे." असा मजकूर वाचून तो विलक्षण घाबरला होता. 'पाप कितीही खोल पुरलं तरी तें

उघडकीला येणारच ' हा मामांनीं मरतांना दिलेला शाप खरा ठरणार कीं काय या भीतीनें तो बेचैन झाला होता. कांहींहि खटपट लटपट करून इमारतीचा पाया खणण्यापासून त्या घरमालकाला परावृत्त करणं भाग होतं. किंबहुना परसांतल्या कोपऱ्यांत निंबाच्या झाडाखालीं खोलवर गाडलेलं पाप सुरक्षित ठेवायचं असेल तर याच घरांत राहून आपण सतत पहारा ठेवला पाहिजे हेंही त्यानं ओळखलं. त्यासाठीं हें घर कधीं सोडतां कामा नये, त्याच्या आवारांत दुसऱ्या कोणा माणसाला प्रवेश मिळतां कामा नये, अशी खबरदारी त्याला घ्यायला हवी होती. आणि त्यासाठीं तें घर खरेदी करणं हाच एक मार्ग होता.

घरमालकानं दामदुप्पट किंमत सांगितली होती. बारा हजारांची रक्कम उभी करणं भाग होतं. रघुनाथानं घर खरेदीचा निर्णय बाबूशेठला सांगितला, आणि त्याच्यापाशीं जुने दोनचार डाग नेऊन दिले तेव्हां त्यानं कांहीं चौकशी न करतां आठ हजार रुपये दिले होते आणि चार हजार केवळ तोंडी वायद्यावर दिले होते. बाबूशेठनं त्याला केवढ्या मोठ्या संकटांतून बांचविलें याची जानकीला काय कल्पना....

घर रघुनाथाच्या मालकीचं झालं होतं. या घटनेनं रघुनाथाच्या मनांत भीतीचा सुरुंग सारखा लागून राहिला होता. कोणाच्या रूपानं कोणत्या निमित्तानं तो सुरुंग धाडकन् उडेल आणि निंबाच्या झाडाखालीं खोलवर गाडलेलं रघुनाथाच्या जीवनांतलं भयंकर रहस्य जगापुढें उघडं होईल त्याचा नेम नव्हता.

विमा कंपनीतल्या ऑफिसांत अकरा तें पांच बसून त्याला असह्य वाटे. कांहींतरी निमित्त काढून तो घरीं येई.

" हें काय ? इतक्या लवकर कचेरींतून आलां ? " जानकी विचारी.

" कुणी आलं होतं ? " रघुनाथ तिला उलट प्रश्न करीत असे.

" कोण येणार ? "

" मी विचारतों त्याचं उत्तर दे. "

" इश्श, त्यात एवढं चिडायला काय झालं ? कोणी आलं नव्हतं. "

" कुणीसुद्धां ? "

" तशी भाजीवाली आली होती. रद्दीवाला येऊन गेला. आणि हो,

खाकी पोषाखांतला कोणी आला होता, आनंदाकडे काम होतं म्हणाला."

" कसलं काम होतं ? " रघुनाथानं विचारलं.

" तें आनंदाला विचारावं. "

" ठीक आहे." असं उत्तर देऊन मग सारा दिवस अस्वस्थपणांत घालवी. आनंद अंगावरून गेला कीं अडवून त्याला विचारी,

" काय रे, खाकी पोषाखांत कोण आलं होतं आज घरीं ? "

" आमचे संघनायक. " आनंदानं उत्तर दिलं.

" उद्यांपासून तुझ्या संघातलं कोणी घराकडे फिरकतां कामा नये समजलास ? याद राख. " रघुनाथ दरडावून बोले.

आनंद मान खालीं घालून त्याच्यापुढून नाहींसा होई. परंतु त्याच्या चेहेऱ्यावरचा तो उर्मटपणा पाहून रघुनाथाच्या संतापाच्या आगीचा तेल पडल्याप्रमाणें भडका उडे.

कुसुमच्या मैत्रिणीचं अल्सेशीयन कुत्र्याचं पिलूं परसांत बागडत होतं. कुसुम आणि तिची मैत्रिण चहा पिण्यात गुंतल्या होत्या. रघुनाथ माडीवरच्या खिडकींतून परसांतल्या निंबाच्या झाडाखालच्या जमिनीवर टक लावून उभा होता.

कुत्रा निंबाच्या खोडाजवळ गेला. मागचा एक पाय उचलून त्यानं खोडावर धार सोडली आणि पुढच्या मागच्या पायांनीं जमीन उकरण्याचा खेळ करीत मधेंच नाक खुपसून माती हुंगू लागला.

रघुनाथ खालीं आला. हातीं मिळाला तो दगड उचलून त्यानं कुत्र्यावर भिरकावला. कुत्रं फार वेळ केकाटलं देखील नाहीं. लगेच कोलमडलं आणि थंड झालं. त्यानंतर कुसुमनं आपल्या कुठल्याही मैत्रिणीला घरीं आणलं नव्हतं.

एकदां कचेरींतून रघुनाथ घरीं परतला. पाहतो तों निंबाच्या झाडाखालीं जिजा लोखंडाच्या घमेल्यांत माती भरीत होती.

" काय करतीस ? ऊठ तिथून. चालती हो. " रघुनाथ वसकन् तिच्या अंगावर ओरडला.

" आत्ता ग बया. " जिजा ताडकन् उठून म्हणाली, " अवं वैनीबाईंनीं चूल लिपायला माती आण म्हटलं म्हणून उकारली माती. सोनं न्हाई उकारलं बाबा."

"झकमारते ती वैनी आणि चूल. तूं चालती हो. पाऊल टाकलंस या आवारांत तर खबरदार."

"ही चालले. एवढं दटावतासा कशापायी. माजं पैसे टाका मी निगाले. मला कामाला काय ताटा न्हाई."

रघुनाथानं तिच्या अंगावर पैसे फेंकले ते उचलून जिजा काम सोडून निघून गेली ती परत कधी फिरकली नाहीं.

जानकीनं मोलकरणीचा विषय काढला की रघुनाथ तिरसटपणें म्हणे, "श्रीमंती आली की बायकांना कामं नकोशीं होतात. बायका ऐतखाऊं बनतात."

"तस नाहीं. पण धुणीं भाडीं तरी लावूं या."

"या कामकरी बाया मोठ्या भोचकभवान्या असतात. मला कोणी नोकर माणूस घरांत नको. होत असेल तर करा, अंगांत वात भरत चाललाय् तो कमी होईल.... "

ते स्नेहशून्य टोचणारे शब्द ऐकलें कीं जानकीचं तोंड हिरमुसलं होई. घरांतल्या माणसांशीं असं चिडखोरपणें, तऱ्हेवाईकपणें वागूं नये हें रघुनाथाला समजत होतं. त्या बिचाऱ्यांवर हा अन्याय होत होता. परंतु त्याला त्याचा इलाज नव्हता. त्या अन्यायाची भरपाई त्यांच्यासाठीं पैसा खर्चून रघुनाथ करीत होता.

परंतु त्याला स्वतःला ज्या वेदना होत होत्या त्याला पैशानं किंवा पैशानं मिळणाऱ्या विलासानं उतारा पडणं शक्य नव्हतं. स्वतःला विसरण्यासाठीं कोणतीही नशा मनावर चढवून घेतली तरी मानेवर सतत टांगलेली भीतीची तलवार रघुनाथाला दृष्टिआड करतां येत नव्हती. पैशाच्या अभावीं बहुतेक दुःखं निर्माण होतात, परंतु पैसा हें कांहीं त्या दुःखावर रामबाण औषध नव्हे हें त्याला कळून चुकलं होतं.

आतां रघुनाथ स्वतंत्र होता. त्याच्या हातांत पैसे खेळत होते. पैशाच्या अभावीं बालपणीं आणि तरुणपणीं ज्या सुखाला तो मुकला होता तें सुख आयुष्यांत उशीरा कां होईना मनमुराद लुटण्याची संधि आतां त्याला मिळाली होती. पण चैनीसाठीं पैसा मिळवावा आणि तो दुखण्यासाठीं उपयोगी पडावा तशी त्याची अवस्था झाली होती.

आईसक्रीमची रघुनाथाला केवढी आवड. आईसक्रीमसाठीं प्रसिद्ध असलेल्या ' जाधव कोल्ड्रिंक 'मधें जावं आणि पेल्यावर पेले आईसक्रीम फस्त करावं असा मोह त्याला कितीदा झाला. परंतु आंत टेबलापाशी जाऊन बसलं, आंब्याच्या मलईदार आईस्क्रीमचा पेला पुढें आला, त्याचा तो सुवासिक गोड मलईदार थंडपणा तोंडांत घोळण्याकरितां त्यांत चमचा खुपसला कीं रघुनाथाच्या कानांत मामाचं ते मरतेवेळींचं आर्त ओरडणं घुमूं लागे, " आग होती रे. आग होती माझ्या पोटांत.... "

एखाद्या निखाऱ्याचा चटका बसावा तसा त्या थंड मलईदार आईसक्रीमचा चटका रघुनाथाच्या तोंडाला पोळून जाई.

त्याचा अस्वस्थपणा बाबूशेठच्या दृष्टींतून सुटत नसे. पुष्कळदां आपल्या खास बैठकींत रघुनाथाला जुलुमानें बसवून बाबूशेठ म्हणे,

" दोस्त, एक पेग घे आणि बघ तुझ्या काळज्या कशा रेसच्या घोड्या-सारख्या पळत सुटतील. "

बाबूशेठच्या आग्रहाला बळी पडून आपल्या काळजाची आग मद्यानं विझविण्याचा प्रयत्न रघुनाथानं करून पाहिला होता. पण मद्यानं येणाऱ्या बेसावधपणाचा त्याला धोका वाटे. त्याच्या काळजीचं स्वरूप विसरण्या-सारखं थोडंच होतं ? कधीं कोणत्या निमित्तानं त्याचं पाप उघडकीला येईल हें भय अष्टौप्रहर त्याला भेडसावीत होतं. त्यासाठीं डोळयांत तेल घालून जागतां पहारा ठेवणं त्याला भाग होतं.

छे छे ! रघुनाथाच्या या विचित्र तळमळीला कसलाही उतारा नव्हता. केसरच्या मोहिनीचा सुद्धां !

चंपकलाल माणेकलालच्या मोठ्या दुकानाच्या माडीवर केसरनं रघुनाथाला प्रथम पाहिलं तेव्हांच तिनं तें गिऱ्हाईक हेरून ठेवलं होतं.

बाबूशेठच्या सराफबाजारांतल्या पेढीवर रघुनाथ बसलेला पाहून एक जुना डाग मोडण्याचं निमित्त करून तिनं त्याच्या वरचेवर गांठीभेटी घेतल्या होत्या. तिनं डाग मोडला नव्हता. पण रघुनाथाची भीड मोडली होती. भवानीपेठेंतल्या एका बोळांतल्या केसरच्या अरुंद तिमजली घराच्या माडींत रघुनाथ तिन्हीसांजा जाऊन बसूं लागला होता.

एकदां अशाच एका संध्याकाळीं केसरनं दिलरुबा काढला होता आणि

चोरट्या गोड आवाजांत ती रघुनाथाला गाणं म्हणून दाखवित होती.

" लोटु नको मज दूर—कन्हैया. "

गाण्याचा गोड आवाज भुंग्याच्या गुंजारवासारखा खोलींत भरला होता.

तोच खण खण खण खट खण खण असे खणण्याचे आवाज रघुनाथाच्या कानीं पडले.

कोण कुठें खणत होतं ! त्याच्या गतायुष्यांतील एका वादळी रात्रीं, निंबाच्या झाडाखालच्या भुसभुसशीत जमिनींत खणतांना असाच दबलेला खणण्याचा आवाज त्यानं केला होता. तो तसाच आवाज केसरच्या या माडींत त्याला कसा बरं ऐकूं येत होता ? कीं त्याला भ्रम झाला होता ?

रघुनाथानं दिलरुब्याच्या पडद्यावर सरकणारा केसरचा हात थांबवला आणि तो उठून म्हणाला,

" मी जातों. . . . "

" हें काय ? तसेंच जातां ?"

" नको अडवूं. मला गेलंच पाहिजे घरीं, "

" बायकोला इतके भितां ? " केसर जिना उतरून खालीं धांवणाऱ्या रघुनाथाला म्हणाली. तिचें ते मत्सरानं भरलेले उद्गार रघुनाथाच्या कानीं पडले कीं नाही कुणास ठाऊक. त्याचं सारं चित्त घराकडे – परसांतल्या निंबाच्या झाडाखालच्या त्या जागेकडे लागलेलं होतं.

खलबत्त्याचा खणखण आवाज करीत विडा कुटतां कुटतां मधेंच थांबून केसरच्या म्हाताऱ्या आईनं विचारलं. " आज लवकर गेला ? "

" बायकोला घाबरतोय्–" केसर ओठ पिळवटून म्हणाली.

रघुनाथाच्या पाठीमागें कोणत्या विचित्र भीतीचा ब्रह्मराक्षस लागला होता त्याची कुणालाच कल्पना नव्हती.

न्हाणीघरांत ओलेत्यानं उभ्या राहिलेल्या रघुनाथाला, " पोलिस आलेत " असं जानकीनं सांगितलं तेव्हां तिलासुद्धां कल्पना नव्हती कीं ज्या क्षणाला रघुनाथ इतकीं वर्षं भीत होता, तो क्षण आल्याची भयंकर बातमी आपण रघुनाथाला सांगत आहों.

" पोलीस ? " रघुनाथाचे ओठ हालले. परंतु शब्द उमटला नाहीं. त्या दोन क्षणांत गेले कित्येक दिवसांची धडपड रघुनाथाच्या डोळ्यांपुढें उभी

राहिली. त्याला वाटलं पळून जावं का ? पण नको. ती धडपड पुढें चालविण्याइतकी ताकद त्याच्या लटपटणाऱ्या हातापायांत कुठें होती ? त्यापेक्षां आल्या संकटाला सामोरं जावं आणि एकदांचा त्या विचित्र धडपडीचा अंत करावा असा विचार रघुनाथानं केला.

रघुनाथ पुढच्या खोलीत गेला. मागोमाग जानकीही गेली, आणि उंबऱ्या आड दाराच्या आडोशाला उभी राहिली. पोलिस आल्याचं कळतांच रघुनाथाची बोबडी वळलेली पाहून ती मनाशी चांगलीच चरकली होती. त्या बाबूशेठच्या पायीं नोकरी गेली होती. आतां तुरुंगांत बसायची पाळी न येवो म्हणजे मिळविली असं ती म्हणत होती.

रघुनाथानं मान वर उचलून खोलीत बसलेल्या फौजदारांकडे आणि त्यांच्याबरोबर आलेल्या पोलिस अधिकाऱ्याकडे पाहिलं, आणि तो मनाशीं म्हणाला हा काय प्रकार आहे ? या माणसांनीं नेहमींचा उन्मत्तपणा सोडून अशा संकोचानं माना खाली कां घातल्या आहेत. आणि ते फौजदार एकीकडे आपल्या करड्या मिशांना पीळ भरत आहेत पण आपली नजर कां चुकवीत आहेत ?

अखेर फौजदार साहेबांनीं जो प्रश्न विचारला तो ऐकून रघुनाथाला — आणि जानकीला देखील आश्चर्याचा धक्काच बसला.

" तुमच्या मुलीचं नांव काय ? " फौजदारांनीं प्रश्न विचारला.

" कुसुम. कुसुम रघुनाथ चित्रे. " रघुनाथानं उत्तर दिलं.

" वय ? "

रघुनाथानं जानकीकडे पाहिलं.

" सोळा वर्ष पुरीं झालीं तिला. . . . " जानकी म्हणाली.

" कोणत्या शाळेंत शिकते ? "

" इथल्या बालिका मंदिरांत जाते. "

" तुमच्या मुलीला बोलावतां काय ? " फौजदार म्हणाले.

रघुनाथानं पुन्हां जानकीकडे पाहिलं. जानकी दाराआडूनच म्हणाली, " कुसूम शाळेच्या ट्रिपबरोबर गेलीय — वेरूळ अजंठाची लेणी पाहण्यासाठीं शाळेतर्फे मुलींची ट्रिप गेली आहे. "

" अस्सं ! तुम्ही वरचेवर मुलीला धाडतां ? "

" शाळेतर्फे ट्रिप निघते तेव्हां धाडतो. " रघुनाथ म्हणाला.

" अलिकडे अशा बऱ्याच ट्रिपा निघाल्या काय ? "

" तर ? " जानकी म्हणाली, " दर दोन महिन्यांनीं शाळेची ट्रिप आहेच. अलिकडे अभ्यासापेक्षां सहली, वनभोजन असेच कार्यक्रम तिच्या शाळेंत जास्त असतात. "

" प्रत्येकवेळीं तुमची परवानगी घेऊनच जाते तुमची मुलगी ? "

" हो. तशी ती मोठी आज्ञाधारक आहे. " रघुनाथ म्हणाला.

" ट्रिपबरोबर मुलीला धाडतांना तुम्ही आणखी कांहीं चौकशी करीत नाहीं ? " फौजदारांनीं विचारलं.

" बरोबर जबाबदार मास्तर असतात. म्हणून तर निश्चिंतपणें आम्ही कुसूमला धाडली.. " रघुनाथ म्हणाला.

इतका वेळ फौजदारसाहेबांच्या बोलण्याचा रोख रघुनाथाच्या लक्षांत आला नव्हता. पण आतां एक भयंकर शंका त्याच्या मनांत आली. कुसूम आगगाडीच्या किंवा मोटारीच्या अपघातांत तर सांपडली नव्हती ? तिच्या जिवाला धोका तर नव्हता ? कीं त्याहून वाईट बातमी घेऊन ही मंडळी आली होती ?

" कुसूम अपघातांत तर सांपडलेली नाहीं ना ? " रघुनाथानं विचारलं. जानकी एकदम पुढं झाली.

" होय. तुमची मुलगी फार मोठ्या अपघातांत सांपडली आहे. " फौजदारसाहेब गंभीरपणें म्हणाले.

आतां मात्र जानकीचा सारा संयम सुटला. ती एकदम विव्हळली, " अरे देवा, माझी बाळ अपघातांत सांपडली म्हणतां ? कुठें ? कशी ? सांगा हो.... किती लागलं ? सांगा हो. माझी बाळ सुरक्षित आहे ना ? "

जानकीच्या त्या घायाळ चेहऱ्याकडे, डोळ्यांतून ओघळणाऱ्या आसवांकडे फौजदारसाहेबांना पाहवेना. त्यांनीं मान बाजूला फिरवली आणि आवंढा घोटला.

मग मात्र जानकीचा धीर खचला. तिची कंबरच खचली आणि पत्याचा बंगला कोसळावा तशी ती खालीं कोसळली. 'कुसूम कुसूम' करीत विव्हळूं लागली.

" जानकी— " रघुनाथ घोगऱ्या आवाजांत म्हणाला, " अग फौजदार-साहेब काय हकीगत सांगताहेत ती ऐकून तरी घेऊं या. "

" ऐकतें–ऐकतें. " जानकीनं रडूं आवरलं.

" असा धीर धरलांत म्हणजे सगळी हकीगत सांगणं सोपं जाईल. " फौजदार म्हणाले. आणि मग अधिक लपवाछपवी न करतां त्या आईबापां-समोर त्यांच्या तरुण मुलीवर कोसळलेल्या संकटाची हकीगत ते सांगूं लागले.

तरुण मुलींना अनैतिक मार्गाला लावणाऱ्या कांहीं टोळ्यांवर पोलिसांचा बरेच दिवस डोळा होता. त्यांपैकीं एका टोळीची सूत्रधार एक बाई होती. रेखादेवी ज्वालाप्रसाद तिचं नांव. रेखादेवी शाळा कॉलेजांतील तरुण मुलींना अनैतिक मार्गाला लावते, मुली पुरविण्याचा धंदा करते ही गोष्ट पोलिसांच्या लक्षांत आली होती. परंतु पोलिसांनीं तिला जाळ्यांत पकडण्यासाठीं केलेले सर्व प्रयत्न तिनं मोठ्या शिताफीनं उधळून लावले होते. पांच दिवसांपूर्वीं मात्र रेखादेवीच्या बंगलीवर पोलिसांनीं खुणा केलेल्या नोटा देऊन पाठविलेलं बनावट गिऱ्हाईक रेखादेवीला जाळ्यांत पकडण्यांत यशस्वी ठरलं होतं. पोलिसांनीं अपरात्रीं तिच्या घरावर छापा घातला होता. तिथें तीन अल्पवयी मुली असल्याची बातमी पोलिसांना मिळाली होती. त्यांपैकीं दोघी पोलिसांनीं पकडल्या. पण तिसरीला मात्र तिच्या बरोबरच्या गुंडांनीं पळवून नेली होती. ती तिसरी मुलगी म्हणजेच रघुनाथाची मुलगी कुसूम !

म्हणजे कुसूम कुंटणखान्यांत गेली होती. आणि तेथूनही तिला गुंडांनीं पळविली होती ! केवढी भयंकर बातमी !

शिव ! शिव ! यापेक्षां आगगाडीच्या चाकाखालीं तिच्या शरीराचा चेंदामेंदा झाला असता तरी तें आपण उघड्या डोळ्यांनीं पाहिलं असतं, जानकीच्या सुन्न मस्तकांत विचार आला.

कुसूम कुंटणखान्यांत ? शक्य नाहीं ! शक्य नाही ! शक्य नाहीं ! त्या मातापित्यांच्या अंतःकरणाला ती गोष्ट कांहीं केल्या पटेना. फौजदार-साहेबांची कांहीं तरी चूक झाली असेल. कुसूमसारखीच दुसरी कोणी मुलगी असेल. आमची कुसूम असं कांहीं करणं शक्य नाहीं. त्या दोघांच्याही

मनांत हा विचार उसळला.

त्या मातापित्यांच्या डोळ्यासमोर कुसुमची मूर्ति उभी राहिली. एकुलती एक अपूर्वाईची मुलगी ! त्यांनीं तिला किती तऱ्हेचे फ्रॉक शिवले होते, परकरपोलकीं शिवलीं होतीं, साड्या आणल्या होत्या. कुसुम फ्रॉक टाकून परकर नेसू लागली, परकर टाकून साड्या नेसू लागलीं तरी आईबापांच्या दृष्टींत ती लहानच होती. लोकांच्या दृष्टींत ती सोळा वर्षांची होती. परंतु संध्याकाळीं शाळेंतून परतली कीं पुस्तकं टेबलावर फेंकून आईच्या मांडीवर लोळण घेऊन "भुकेला कांहींतरी दे" म्हणणारी कुसुम जानकीच्या दृष्टींत तान्हीच होती.

"तुमची कांहींतरी चूक झाली असेल. कुसुम असल्या घाणेरड्या ठिकाणी कधीं जायची नाहीं." रघुनाथ म्हणाला.

"किती लहान आहे ती. तिला अजून कांहींदेखील समजत नाहीं. तिच्यावर भलता आळ कसा घेतां? ती शाळेच्या ट्रिपवर गेली आहे." जानकी शुष्क आवाजांत म्हणाली.

पोटच्या पोरीवर त्या दोघांचा केवढा विश्वास होता. पण सत्य-परिस्थितीची जाणीव त्यांना करून देण्यासाठीं तो विश्वास तोडून मोडून टाकण्याचं कठोर कर्तव्य करणं फौजदारसाहेबांना भाग होतं.

शाळेची ट्रिप वेरूळ अजिठ्याला गेलीच नव्हती. किंबहुना जेव्हां जेव्हां ट्रिपसाठीं म्हणून कुसुमनं घर सोडलं होतं तेव्हां तेव्हां ती आई–वडिलांच्या डोळ्यांत धूळ फेंकून कांहीं चटोर तरुण–तरुणींच्या नादीं लागून स्वैरवर्तन करीत होती. आणि अखेर रेखादेवी ज्वालाप्रसाद या संभावित स्त्रीच्या जाळ्यांत पुरतीच सांपडली होती.

"विश्वास बसत नाहीं." एवढेंच उद्‌गार ती विचित्र हकीगत ऐकून रघुनाथानं काढले.

मग फौजदारसाहेबांनीं एक खाकी लिफाफा काढला आणि त्यांतले कांही फोटो रघुनाथाच्या हातीं देऊन म्हटलं,

"हे फोटो दाखविण्यासारखे नाहीत. पण त्यांत तुमच्या मुलीचा फोटो पाहून तर तुम्हांला मी सांगितलेली हकीगत खरी वाटेल? एका फोटोवर तर चक्क तिची सहीच आहे."

थरथरत्या हातांनीं रघुनाथानं फोटो घेतले. आणि ते लाजिरवाणे फोटो पाहून त्याचा चेहरा शरमेनं काळवंडला. "कार्टीनं आमच्या तोंडाला काळं फासलं !" एवढेच शब्द त्याच्या तोंडावाटे बाहेर पडले.

"ते फोटो तूं पाहाण्यासारखें नाहींत," असं म्हणून त्यानं जानकीचा हात बाजूला केला तरी जानकीनं ते हिसकून घेतलेच आणि पाहिले देखील. मग तिनं आपलं तोंड पदरांत झांकून घेतलं. आपल्या पोटच्या पोरीचे नायकिणींनाही लाजविणारे विवस्त्र अवस्थेंतले परपुरुषाच्या गळयांत गळा घातलेले फोटो पाहण्याचं ज्या आईच्या नशिबीं येतं तिच्या लाजेचं आणि दुःखाचं कोणत्या शब्दांत वर्णन करावं ?

"यापेक्षां तुझं प्रेत पाहतें तर बरं झालं असतं !" जानकी विव्हळून म्हणाली, "कुसूम, हें काय केलंस, माझ्या पोटीं येऊन कुळाला कलंक फासलास !"

जानकी रडूं लागली. असली कुलकलंकिनी माझ्या पोटीं कां घातलीस म्हणून ती देवाला दोष देऊं लागली. पण कांहीं झालं तरी तिचं आईचं आंतडं होतं. त्या आंतड्याला पीळ पडूं लागला तेव्हां ती फौजदारसाहेबांना हात जोडून म्हणाली,

"तिला त्या चांडाळांनीं घेरलं हो. माझी पोर भाबडी आहे. तिला सोडवून आणा. तिला आमच्या स्वाधीन करा. मी तुमच्या पायां पडतें."

"आम्ही त्याच प्रयत्नांत आहोंत. धीर धरा. मुलीचा पत्ता लागला कीं तुम्हांला ताबडतोब कळवूं." असं आश्वासन देऊन फौजदारसाहेब आणि इतर अधिकारी निघून गेले होते.

घरांत जानकी आणि रघुनाथ दोघंच उरलीं. दोघंच ? नव्हे कुसूमच्या व्यभिचाराची घटना भेसूर स्वरूपांत राक्षशिणीसारखी त्या दोघांमधें उभी होती !

त्या दोघांना एकमेकांकडे पाहण्याची लाज वाटूं लागली. रघुनाथ उठला, माडीवर निघून गेला, आणि पदराचा बोळा तोंडांत कोंबून हमसाहमशी रडत जानकी माजघरांतल्या अंधारांत जमिनीवर पडून राहिली.

या प्रसंगानंतर जानकी रघुनाथाच्या संसाराला अगदीं विचित्र कळा आली. ऊसाची कांडी मोडावी तसा कुसूमचा विषय बाह्यात्कारी कां

होईना, रघुनाथानं संपविला होता. परंतु जानकीनं कुसुमसाठीं हाय खाल्ली होती. माझी पोर सुखरूप परत येऊं दे असं देवापाशीं धरणं धरून ती बसत होती. उपासतापास, व्रतवैकल्य करून देहदंड सोशीत होती. कुसूम कोणा दुष्ट लांडग्याच्या तावडींत सांपडली असेल, तिच्या वांट्याला कोणत्या हालअपेष्टा, कोणत्या विटंबना आल्या असतील या विचारांनीं जानकीचं हृदय पोखरून निघत होतं, आणि आसवं ढाळून ढाळून डोळे कोरडे झाले होते. कुसूमनं घराण्याची अब्रू घालविली याचं दुःख तिला आतां होत नव्हतं. आईबापांच्या पैशाचं आणि प्रेमाचं असं वाळवण केलं याचीही खंत तिला आतां उरली नव्हती. तिला आतां फक्त कुसुमला पाहण्याचा, तिला पोटाशीं घेण्याचा ध्यास लागला होता. आणि त्यासाठीं ती झुरत होती. स्वतःला दोष देऊन म्हणत होती, " माझं काय चुकलं ? माझ्या प्रेमांत किंवा कर्तव्यांत मीं कुठें चुकलें म्हणून हातातोंडाला आलेल्या तरुण मुलीनं घर सोडलं ?"

जानकी अशी उघड उघड झुरत होती तर रघुनाथाचा राग राखे-खालच्या विस्तवाप्रमाणें गुप्तरीतीनं धुमसत होता. कुसुमच्या बाबतींत अपेक्षा भंगाचा फार मोठा तडाखा त्यानं सहन केला होता. कुसुमनं आपल्यावर फार मोठा अन्याय केला याची त्याला चीड आली होती. कुसुम परत आली कीं तिला पोटाशीं घेण्याच्या विचारापेक्षां तिला समोर उभी करून जाब विचारण्याचेच विचार त्याच्या मनांत येत. " कुसुम, तुझ्या अश्लाघ्य वर्तनाची मी क्षमा कशी करूं ? तुला मी स्वातंत्र्य दिलं, संधि दिली. पैसा तर पाण्यासारखा खर्च केला. त्याचं बक्षीस तूं मला हेंच दिलंस ना ? "

कुसुमला असा जाब विचारण्याचा प्रसंग रघुनाथावर पूर्वीं आला नव्हता असं नव्हे.

एकदां बाबूशेठच्या पेढीवरून संध्याकाळीं परतल्यावर रघुनाथानं कुसुमला करड्या आवाजांत हांक मारली होती. ती समोर येऊन उभी राहिल्यावर त्यानं विचारलं होतं, " तुझ्या गाण्याच्या क्लासचे मास्तर सदूभाऊ भेटले होते आज मला. मीं त्यांना विचारलं कशी काय प्रगति आहे तुझी, तर ते म्हणाले चार महिन्यांपूर्वींच तूं त्यांचा क्लास सोडलास, ही काय भानगड आहे ? "

डाव्या कानावरची वेणी छातीवर ओढून तिच्याशीं चाळा करीत भुंवया मोडीत कुसूम म्हणाली,

" भानगड कसली ? सदूभाऊ चांगलं नाहीं शिकवत. "

" छान. शास्त्रीय संगीत शिकवणारा तसा शिक्षक नाहीं दुसरा. त्यासाठीं तर तुला पेटी तंबोरा घेऊन दिला. "

" पण मला नाहीं आवडत तें शास्त्रीय संगीत. परवां शाळेच्या सम्मेलनांत मी 'यमना' तलं गाणं म्हटलं तर मुलामुलींनीं माझी हुर्यो उडविली. म्हणालीं भावगीत म्हणा.. "

" म्हणून तूं क्लास सोडलास ? पण तो सोडायसाठीं माझी परवानगी नाहीं विचारायची ? शिवाय क्लास सोडला म्हणतेस तरी आईकडून फीचे दरमहा पंधरा रुपये नेत होतीसच. "

" मी दुसऱ्या क्लासांत नांव घातलंय्. "

" कुणाच्या ? "

" सत्यनारायण. "

" हा कोण सत्यनारायण ? "

" सिनेमांत दिग्दर्शक आहेत ते. "

" अस्सं ? म्हणजे सिनेमासंगीत शिकावंसं वाटतं तुला ? तुला गाणं शिकायचं तर शास्त्रीय संगीतच शिकलं पाहिजे. " रघुनाथ करड्या आवाजांत म्हणाला, " चटोर गाणीं म्हटलेलीं मला आवडायची नाहीत. "

पण कुसुमनं रागाच्या झटक्यांत वेणी पाठीमागें फेंकली होती आणि मानेला हिसका देऊन ती म्हणाली होती,

" मला गाणंच शिकायचं नाहीं. "

तिचं तें उर्मटपणाचं उत्तर ऐकून रघुनाथ एकदम संतापला होता. तिनें असे कृतघ्न उद्‌गार काढावे यासाठीच कां त्यानं तिला संगीताची हत्यारं घेऊन दिलीं होतीं ? भारी फीच्या संगीतविद्यालयांत तिचं नांव घातलं होतं ? त्याला ज्या तऱ्हेचं स्वातंत्र्य आणि संधि मिळाली नव्हती ती त्यानं कुसुमला दिली होती.

पण ही दुर्मिळ संधि कुसुमनं कृतघ्नपणें लाथाडली होती. तिनं गाण्याचं शिक्षण बंद केलं होतं, पण तिच्या आणि सत्यनारायणाच्या गांठीभेटी

चालूच होत्या, त्याची कल्पना रघुनाथाला नव्हती.

स्वातंत्र्यदिनानिमित्त बालिकामंदीरातर्फे कांहीं खास कार्यक्रम करून दाखविण्यांत आले. नाटकांतले कांहीं प्रवेश व कांहीं पौराणिक कथादर्शनं विद्यार्थिनीनीं बसविलीं होतीं. 'नंदकुमार' नाटिकेंत राधेचं काम कुसुमनं केलं होतं. राधेचं काम पाहून रघुनाथाच्या मनांत आलं, कोण हा दिग्दर्शक? कुठें ती गोकुळांतील कोमल राधा आणि कुठें ही पोट उघडं टाकणारी कंचुकि घातलेली, कमरेंत सतरादां लचकणारी, हनुवटीवर बोट ठेवून तिरक्या दृष्टीनं पहाणारी छचोर राधा! कमाल त्या दिग्दर्शकाची आणि कमाल त्या विद्यालयाची, जिथें अभिनयकलेच्या आणि संगीताच्या नांवाखालीं असा भ्रष्टाकार चालतो!

घरी परतल्यावर रघुनाथानं आपली नापसंती स्पष्ट बोलून दाखविली होती आणि विचारलं होतं.

"कोण शहाणा हा दिग्दर्शक राधेला अशी चटोर रंगविणारा?"

"सत्यनारायण."

"म्हणजे तुमच्या मेकअपच्या खोलींत, धोतराचा सोगा डाव्या हातावर टाकून, डोळ्यांत सुरमा घातलेला, पान खाऊन ओठ रंगवलेला इसम वावरत होता तोच की काय?"

"होय" कुसुम म्हणाली होती.

"मी त्या इसमाला जोड्यापाशीं उभं करणार नाहीं." रघुनाथ म्हणाला.

त्याच्या संतापाला तसंच कारण होतं. राधेचा मेकअप नीट जमला कीं नाही तें पाहण्यासाठीं तो सोगेवाला कुसुमच्या अगदी जवळ खेटून उभा होता. आणि गालावरची लाली सारखी करण्याच्या निमित्तानं कितीतरी वेळ तिचा गाल थोपटीत होता. तें पाहून रघुनाथाच्या डोक्यांत विलक्षण चीड आली होती. तशी चीड कुसुमला येऊं नये, उलट तिनं निर्लज्जपणें त्याच्याकडे हंसत चमत्कारिक दृष्टीनं पहावं याचा त्याला संताप आला होता. पण हा संताप जाहीर बोलून दाखविणें म्हणजे आजूबाजूच्या पुढारलेल्या त्या सुसंस्कृत समाजांत मूर्खपणाचं, मागासलेपणाचं लक्षण ठरलं असत. तेव्हाचा सांठलेला राग त्यानं आता बोलून दाखविला होता.

"तुम्हाला आमचं काहींच चांगलं दिसत नाहीं." अस म्हणून कुसुम

फुरंगटली होती.

"तुम्ही नागवं नाचूं लागलां तरी तें आम्ही चांगलं म्हणायचं कीं काय? तुम्ही विद्यार्थिनी म्हणविता स्वतःला, पण काय तुमची वेषभूषा? उघडीं पोटं, उघड्या छात्या, आणि नखरेल वागणं. हा सगळा त्या सिनेमाचा परिणाम. जानकी, तुझ्या मुलीला सांग कांहीं. तिची कानउघाडणी कर."

पण जानकी कांहीं बोलत नसे. तिच्या मनांत येई पोरीची जात आहे. नटावं, मुरडावं असं तरुणवयांत वाटतंच. उद्यां सासरीं गेल्यावर आहेतच बंधनं.. कुसुमवर जानकीनं सतत प्रेमाचा वर्षाव केला होता. या प्रेमाचा विश्वासघात करून कुसुम निघून गेली तेव्हां जानकीला मोठा धक्का बसला होता. असं कां व्हावं तिला कळत नव्हतं. एखादीं केळ उन्मळून पडावी तशी कुसुमच्या तडाख्यानं ती उन्मळून पडली होती. घरांत ती वावरत होती केवळ भुताप्रमाणें. तिचं कशांत लक्ष नव्हतं, तिला कशाचं महत्त्व वाटत नव्हतं.

एकदां रघुनाथ दुपारीं घरीं आला. पाहतों तों चूल थंड होती आणि जानकी भांडीं पुढ्यांत घेऊन अश्रू ढाळीत बसली होती. उपाशीं पोटीं त्याच्या रागाचा पारा एकदम वर चढला. जानकीपुढें उभं राहून त्यानं विचारलं,

"काय बेत आहे तुझा? घरांत रहावं म्हणतेस कीं नाहीं?"

जानकी दुःखानं चिडचिडली होती. "भरल्या घरांतून माझी बाळ निघून गेली. आतां तुम्ही राहिला न राहिला मला सारखंच आहे." ती बोलून गेली.

"अस्सं काय? खूप बक्षीस मिळालं मला. मी राहिलों न राहिलों सारखंच काय? तुम्ही असं बोलावं म्हणूनच मी एवढा सारा खटाटोप करून पैसा मिळवला. पण त्याचं काय फळ? तुमची कृतघ्नता. तो मुलगा तर माझं तोंड पहात नाहीं. त्यानं संघ धरलाय्. पोरीनं तोंडाला काळं फासलं आणि बायकोला नवरा घरांत राहिला न राहिला तरी पर्वा नाहीं.."

रघुनाथ एकदम विकटपणें हंसला. त्याच्या मस्तकाला संतापाचे, अति-तीव्र वैफल्याचे असे विचित्र झटके बसूं लागले. दोन्ही हातांनीं आपल्या गालफडावर तडाखे मारीत तो ओरडूं लागला, "घे तुला बक्षीस. हलकट माणसा, घे थोबाड फोडून!"

जानकी एकदम ताडकन् उभी राहिली. दुःखाची नशा तिच्या डोळ्या-

वरून साफ उतरली. ती धांवत रघुनाथाजवळ गेली. त्याचे हात धरण्याचा प्रयत्न करीत ती म्हणाली, " मी चुकलें. असा त्रागा करूं नका. मारून घेऊं नका."

" नाहीं ग, मीच चुकलों. समजलीस, मीच चुकलों." रघुनाथ आणखीच थोबाडींत मारून घेऊं लागला. जानकी रडूं लागली.

पुढच्या दारांत पाऊल टाकतांच आनंदाला मारण्याचे आवाज आणि आईचे हुंदके ऐकूं आले.

त्यानं दांत ओठ खाल्ले. एकूण आईवर हात टाकण्याइतकी बाबांची मजल गेली म्हणायची. कुसूम नाहीशीं झाल्यापासून आईवडिलांचीं भांडणं होत असल्याचा त्याला संशय होताच. पण हाणामारीवर पाळी आली असेल अशी त्याची कल्पना नव्हती. दुःखानं खंगलेल्या दुबळ्या आईवर हात टाकणाऱ्या वडिलांचा त्याला भयंकर संताप आला. तो धांवतच सैंपाकघरांत गेला. रघुनाथाचा उगारलेला हात तसाच घट्ट पकडून दुसऱ्या हातानं त्याला जानकीपासून दूर ढकलीत दांत ओठ खात आनंद बापाला म्हणाला,

"माझ्या आईवर हात टाकतां ? शरम नाहीं वाटत ?"

"अरे आनंद ऐक माझं. तें मला मारत नव्हते. ऐक – मागं फीर.." जानकी आनंदाला ओढूं लागली. "अरे, जन्मदात्यावर हात उगारू नकोस."

"तूं नको कैवार घेऊंस. यांना वडील म्हणायला लाज वाटते मला." आनंदानं आईला पाठीशीं घातली आणि रघुनाथाला एवढा धक्का दिला कीं रघुनाथ कोलमडत सैंपाकघराच्या दाराबाहेर पडला.

# प्रकरण सहावें

" नमस्ते सदा वत्सले मातृभूमे
त्वया हिंदभूमे सुखं वर्धितोहम्
महामंगले पुण्यभूमे त्वदर्थे
पतत्वेष कायो नमस्ते नमस्ते.."

आंबराईच्या मैदानावर शेंकडों संघसैनिकांच्या रांगा लष्करी फलटणीच्या शिस्तींत उभ्या होत्या, त्यांच्या तोंडून या सामुदायिक प्रार्थना स्तोत्राचे स्वर बाहेर पडत होते. त्या स्वरांचा तो घोष हिंदी महासागराच्या घोषाइतका खोल, गभीर आणि अंतःकरण हेलावून टाकणारा असा आनंदाला वाटला. संघसैनिकांच्या रागेंत आनंद उभा होता. प्रार्थनेच्या त्या घोषांत त्यानं आपलाही आवाज मिळविला होता. परंतु आपलं निराळेंपण तो त्या क्षणीं पार विसरला होता. त्या दिव्य उदात्त वातावरणाशीं तो एकरूप झाला होता. प्रार्थनेचा शेवटला स्वर आंबराईच्या आवारांत कितीतरी वेळ निनादत राहिला. तो निनाद कधीं संपू नये, तो संपला तर त्या दिव्य वातावरणाचा आणि आपला संबंधच तुटेल असं भय आनंदाला वाटलं.

पण त्यानं डोळे वर करून पाहिलं तों या प्रार्थनेचं साक्षात् उत्तरच अशी गुरुजींची तेजस्वी मूर्ति त्याला व्यासपीठावर उभी राहिलेली दिसली. गुरुजींचा तो कृश व बांधेसूद देह, शुभ्र खादीनं झांकलेल्या रुंद खाद्यावर रुळणाऱ्या काळ्या जटा, रुंद भालप्रदेश, काळे भोर विरक्त डोळे, धरधरीत नाक आणि छातीवर रुळणारी काळी कुरळी दाढी म्हणजे तारुण्य आणि तेज यांचा मनोहर संगमच होता. आनंद सरसंघचालक गुरुजींच्या त्या मूर्तीकडे टक लावून पहात राहिला. संघसैनिक विष्णूच्या तोंडून त्यानं गुरुजीच्या मोठेपणाचीं वर्णनं एेकलीं होतीं. त्यांचे आदेश तो आज जवळजवळ नऊ

दहा वर्षं पाळीत आला होता. संघानं त्याला जवळ घेतलं होतं. त्याच्या बावरलेल्या, गोंधळलेल्या मनाला दणकट बनवलं होतं. शिंपल्यांतला गर्भस्थ कण लेपालेपानं वज्रासारखा कठीण बनतो आणि त्याचं मोती तयार होतं, तसा दुबळा आनंद संघाच्या शिस्तीनं आणि शिकवणुकीनं वज्रासारखा कठीण, मोत्यासारखा तेजस्वी सैनिक बनला होता. संघानं त्याच्या जीवनाला स्थैर्य, धैर्य आणि ध्येय या तिन्ही गोष्टी दिल्या होत्या.

आनंद संघसैनिकांच्या रांगेत उभा होता. त्यानं छाती पुढें काढली होती. तरी त्या लष्करी पवित्र्याआड त्याच्या अंतःकरणात केवढा कोलाहल माजून राहिला होता. एका दुबळ्या टाकाऊ मुलाचं रूपांतर जवान, ध्येयनिष्ठ, स्वामिनिष्ठ अशा शूर सैनिकांत ज्याच्या आदेशामुळें झालं त्या गुरुजींच्या दर्शनानं तो गहिंवरून गेला होता. त्याच्या मनांत येत होतं, गुरुदक्षिणा अर्पण करण्यासाठीं आपण गुरुजीजवळ जाऊं तेव्हां आतां तडफदार दिसणारा तरुण आठनऊ वर्षांपूर्वीं मुळुमुळु रडणारं एक दुबळं नावडतं पोर होता हें त्यांना खरं तरी वाटेल काय ?

पण ती गोष्ट खरी होती. आनंद दुबळा होता आणि त्याच्या बापाचा नावडता देखील होता. त्याच्या मुंजींत त्याच्या वडिलांनी त्याला मारे जरीची टोपी आणली होती, आणि नेमका तसल्याच टोपीविषयी त्याला केवढा तिटकारा वाटला होता. जरीची टोपी हें फार तर श्रीमंतीचं लक्षण समजतां येईल. पण गांधी टोपी, जी देशांतले सारे थोर पुरुष घालतात ती घालण्यांत कांहीं विशेष मोठेपणा आहे, अशी त्या लहान वयांत देखील आनंदाची समजूत होती. म्हणून त्यानं मुंजीच्या वरातींत गांधी टोपी घालण्याचा हट्ट पुरा केला होता, परंतु बापाचं प्रेम मात्र गमावलं होतं.

गांधी टोपीच्या त्याच्या त्या हट्टानंतर जेव्हां जेव्हां त्याच्यासाठी एखादी किंमती वस्तु त्याचे वडील आणीत तेव्हां ती त्याच्या आनंदासाठी न आणतां स्वतःच्या प्रतिष्ठेसाठींच ते आणीत असत. त्याच्या बहिणीनं — कुसुमनं — लाल बुटांचा हट्ट घेतला की तिच्याबरोबर आनंदालाहि ते बूट आणीत. पण त्याच्या हातांत बुटाचा जोडा देतांना म्हटल्याशिवाय रहात नसत, तू काय अनवाणी देखील जाशील शाळेंत, पण आम्हाला लाज म्हणून आणले तुला बूट. कुसुमला तऱ्हेतऱ्हेचे कपडे शिवतांना, तऱ्हेतऱ्हेचा खेळ

तिला देतांना तिच्याबरोबर ते आनंदासाठींही कपडे, खेळ आणीत ते केवळ याच एका विचारानं - आमच्या लाजेसाठीं, आमच्या प्रतिष्ठेसाठीं. जरीची टोपी लाथाडल्याचा तो अपमान त्याचे वडील विसरूं शकत नव्हते. म्हणून वेळ मिळेल तेव्हां आनंदाच्या डोक्यावर अशा हेटाळणीचा टोला ते मारल्याशिवाय रहात नसत.

त्यामुळें कोणत्याही चैनीच्या वस्तुविषयीं मुळांतच एक प्रकारची अढी आनंदाच्या अंतःकरणांत निर्माण झाली होती. बापाच्या श्रीमंतीसाठीं, प्रतिष्ठेसाठीं म्हणून ज्या वस्तू त्याच्या वांटचाला येत त्यांविषयीं त्याला प्रारंभींच तिटकारा वाटे. पण कांहीं झालं तरी तो लहान मूलच होता. त्याच्या वडिलांनीं त्याला क्रिकेटचा सबंध सेट घेऊन दिला तेव्हां त्याला केवढा आनंद झाला. क्रिकेटच्या खेळाची त्याला फारशी आवड होती म्हणून नव्हे, तर त्या बॅट–चेंडू–स्टंपांच्या आकर्षणानं गुळाभोंवतीं मुंगळे जमावें तशी आनंदाच्या गल्लींतील टीमचीं मुलं त्याच्या भोंवतीं जमा झालीं यांतच त्याला विशेष अभिमान वाटत होता म्हणून! त्याचा एकाकीपणा या बॅट चेंडूनं एकदम संपविला होता. गल्लींतल्या टीमचे सारे खेळाडू त्याच्या भोंवतीं जमा झाले होते, आणि पूर्वीं बाऊंड्री लाइनवर क्षेत्ररक्षणासाठीं नुसतं उभं राहण्याची संधि त्याला देण्यास नाखूष असलेले ते क्रिकेटप्रेमी आतां त्याला आपला कॅप्टन करण्यास तयार होते. त्यासाठीं त्यांनीं त्याची मनधरणी चालविली होती. ज्याच्या मालकीची बॅट तो कॅप्टन हा क्रिकेटप्रेमी बाल खेळाडूंचा कायदाच असतो. आनंद त्यांच्या या अकस्मात् हृदयपालटाबद्दल थोडा साशंकच होता. आपली मोलाची बॅट–चेंडू घेऊन तो घराचं सुरक्षित आवार सोडून रस्त्यावर खेळ मांडण्यास तयार होईना? अखेर आनंदाच्या घरामागच्या अंगणांत नव्या बॅट–चेंडूचं उद्‌घाटन करण्याचा बेत बालचमूनं केला.

हाताचे तळवे एकमेकांवर चोळून विजारीच्या पृष्ठभागावर चोळीत गणपत भंडारी म्हणाला,

" चल आनंद. ओली सुकी करूं. "

" पण थांब. या स्टंपा तर घट्ट ठोकूं या." आनंद म्हणाला. " या निंबाच्या झाडाखालची मातीच बघ किती भुसभुशीत. स्टंप त्यांत रोवतांच येत नाहीं."

" थांब, मी ठोकतों स्टंपा. " बाळू पुढें होऊन म्हणाला. त्या निमित्तानं त्याला त्या नव्या कोऱ्या स्टंपाना हात लावायला मिळणार होता.

"मी" "मी" करीत सारींच पोरं निंबाच्या झाडाखालीं गोळा झालीं, आणि कुणी काठ्या तर कोणी दगड जमिनींत ठिकठिकाणीं घुसवून जमिनीच्या टणकपणाचा अंदाज घेऊं लागलीं.

गल्लींत शिरल्यावर रघुनाथाची नजर प्रथम गल्लींतल्या रहदारीवर, आणि नंतर पुढच्या दाराकडे जात असे. आपल्या घरावर टेहेळणी करणारे कोणी गुप्त पोलीस गल्लींतून हिंडत तर नसतील, घरीं पोचतांच दाराशीं किशामामाचा तलास काढीत कायद्याचीं किंवा नात्याचीं माणसं तर उभीं ठाकलेलीं दिसणार नाहींत, अशा भयसूचक टोचण्या घराबाहेरच्या उद्योगांत त्याला चैन पडूं देत नसत. म्हणून कधीं कधीं अर्धवट कामं सोडून तो धांवत पळत घर गांठी. आणि गल्लींत शिरल्यावर त्याचे भिरभिर फिरणारे डोळे गल्लींतली रहदारी न्याहाळीत, घराच्या दाराकडे वळत. नेहमींचं वातावरण दिसलं कीं त्याच्या जिवाला हायसं वाटे. पण तेंही क्षणापुरतंच. घरांत पुढें दिसेल त्या माणसाला तो प्रश्न विचारी, "कुणी आलं होतं ?" आणि मग कितीही खुलासेवार उत्तरं दिलीं तरी त्याचं समाधान कधीं होत नसे. तो कोणत्या शंकेनं प्रश्न विचारीत असे याची इतरांना काय कल्पना !

अशाच साशंक मनस्थितींत रघुनाथ गल्लींत शिरला, घरांत आला, ठराविक प्रश्न जानकीला विचारून तो मागें न्हाणीघरांत तोंड धुण्यासाठीं गेला. तोंडावर गार पाण्याचा पहिला हबका तो मारतो न मारतो तोंच मागच्या अंगणांतून मोठा गलका ऐकूं आला. त्यानं एकदम कान टवकारले. हातांतला तांब्या तसाच खालीं टाकून तो मागच्या दाराशीं गेला. पाहतो तों निंबाच्या झाडाखालीं पोरांचा केवढा घोळका उभा होता. कांहींजण खालीं जमिनींत उकरीत होते. तें पाहतांच रघुनाथाच्या तोंडचं पाणी पळालं.

"ए कारट्यांनों ! काय करतां तिथें ?" तो पायरीवरूनच ओरडला.

जमिनीवर उकिडवं बसून कांहीं शोधीत असलेल्या पोरांपैकीं साऱ्यांनीं चमकून वर पाहिलं. बाळू म्हणाला,

"ए आनंद तुझे बाबा रागावताहेत—बघ."

" अरे, हीं बटनं त्यांना नेऊन देतो, म्हणजे शाबासकी देतील मला. त्यांचीं बटनं हरवलीं तेव्हां किती सारं घर धुंडाळलं त्यांनीं. आणि तीं आतां इथें या निंबाखालीं मला सांपडलीं. कुणी ठेवलीं असतील रे ?"

" दुसरं कोण ? चोर ! " गणपत भंडारी म्हणाला, आणि तितक्यांत रघुनाथ जवळ आलेला पाहून त्यानं त्याला विचारलं, " चोर नेहमीं संपत्ति जमिनींत पुरून ठेवतात, नाहीं कांहो आनंदाचे बाबा ?"

" काय म्हणतोस ? थोबाड बंद कर, नाहींतर दांत पाडून हातांत देईन." रघुनाथ ओरडला.

त्याचा तो अवतार पाहून सारींच पोरं चापचूप झालीं. कांहींनीं तेथून काढता पाय घेतला, तर कांहीं दूर होऊन प्रेक्षकाच्या तिऱ्हाईत भूमिकेनं भांडण पाहूं लागलीं. आनंद उठला आणि हाताची मूठ पुढें करून म्हणाला, " बाबा, तुमच्या शर्टचीं बटणं हरवलीं होतीं ना ? तीं इथे जमिनींत सांपडलीं मला. "

" कुठें सांपडलीं ? " रघुनाथानं आनंदाच्या हातांतल्या त्या बटणांकडे डोळे फाडून पहात घोगऱ्या आवाजांत विचारलं.

आनंद म्हणाला, " बाबा, या गणपत भंडारीला जमीन उकरतांना सांपडलीं. "

" जमीन कशाला उकरीत होतां तुम्ही ? "

" मी नाहीं हो आनंदाचे बाबा, तुमचा आनंद उकरीत होता. " गणपत मागें सरकत म्हणाला.

" बोल, कशाला उकरीत होतास ?" रघुनाथानं आनंदाच्या बकोटचाला धरून विचारलं.

"मी स्टंपा रोवायला जमीन उकरीत होतों, तेव्हां तीं बटनं मला सांपडलीं. मग गणपत म्हणाला चोर जमिनींत संपत्ति पुरून ठेवतात म्हणून. मग गणपत देखील उकरायला लागला."

" अस्सं काय ? लाथ मारून बाहेर काढतो एकेकाला. ए भंडारी, पुन्हा माझ्या आवारांत पाऊल टाकलंस तर तंगडं मोडीन – जा – हो चालता. " रघुनाथानं गणपत भंडाऱ्याला एवढा धक्का दिला कीं तें मरतुकडं पोर गुडघ्यावर जमिनीवर कोसळलं, घसरत गेलं, आणि रडत

रडत रस्त्यावर पळालं.

आनंदाचा बकोटा धरून त्याला पुढें खेंचून रघुनाथ म्हणाला, " जमिनी उकरायला तुम्ही घुशी कीं उंदीर ? "

" मला कां मारतां ? मी स्टंपा ठोकायला घट्ट जमीन पहात होतों. " आनंद रघुनाथाच्या हाताला हिसके देत म्हणाला.

" आण तुझ्या त्या स्टंपा इकडे. " असं म्हणून रघुनाथानं पोरांच्या हातांतल्या स्टंपा हिसकावून घेतल्या आणि निंबाच्या खोडावर आपटून मोडून टाकल्या. ती नवी कोरी सोनेरी बॅट घेतली आणि तीही खोडावर आपटली. तिचेही काड्कन दोन तुकडे झाले.

" आता काय बिशाद तुम्ही माझ्या अंगणांत क्रिकेट खेळाल ? व्हा येथून चालते. नाहींतर हाताला मिळेल तें फेंकून मारीन एकेकांना. " तो ओरडला.

रघुनाथाचं डोकं तडातडा उडूं लागलं. त्यानं दोन्ही हातांनीं डोकं दाबून धरलं. डोळे घट्ट मिटून धरले. त्यानं डोळे उघडले तेव्हां तो एकटा उभा होता. सारीं पोरं नाहींशीं झालीं होतीं.

त्यानं मूठ उघडली आणि त्या चांदीच्या बटणांकडे पाहिलं. हीं चांदीचीं बटणं हरवलीं म्हणून जानकीनं केवढा मनस्ताप करून घेतला होता. घराचा कानाकोपरा धुंडाळला होता. मुलांना फैलावर घेतलं होतं. ती किती हळहळली होती. पण तो कांहींच बोलला नव्हता. कारण त्याला एक शंका येत होती, आणि तीमुळें तो फार अस्वस्थ झाला होता.

पाप कितीही खोल पुरलं तरी तें उघडकीला येतं हे मामाचे मरतेवेळींचे शब्द त्याला हास्यास्पद वाटले होते. पाप पचविण्याचा पराक्रम केल्याची घमेंड त्याला वाटत होती. परंतु पुष्कळदां या घमेंडीला धक्के देणारे प्रसंग घडून येत. आणि मग त्याला वाटे आपण स्फोटक दारूच्या कोठारावर बसलेले आहोंत. बहुतेक गुन्हेगारांची अवस्था अशीच असते हें त्याला कळत होतं. असाध्य रोगानं पछाडलेला माणूस ज्याप्रमाणें आपल्या रोगाचीं लक्षणं दुसऱ्या रोग्यांशीं ताडून पाहतो त्याप्रमाणें आपल्या पापाचं स्वरूप दुसऱ्यांच्या पापाशीं ताडून पाहण्याचा एकच मार्ग रघुनाथाला होता, तो म्हणजे रहस्य कथा, खूनकथा वाचणं. एरवीं कधीं हातांत पुस्तक न

धरणारा रघुनाथ तसलीं पुस्तकं चोरूनमारून वाचूं लागला होता. आणि तो समजून चुकला होता कीं खून कितीही बेमालूम केला तरी कुठेंतरी कसली तरी चूक राहतेच आणि तो कधीं ना कधीं उघडकीला येतोच. ग्लासावरचे बोटाचे ठसे, कागदाचा कपटा, परीटाची खूण अशा कोणत्या ना कोणत्या सकल्पित कारणानं खुनावर उजेड पडतो. खून पचविणं फार कठिण गोष्ट होती. आतांच पहा ना, मामांच्या प्रेतावर माती लोटतांना त्याला नकळत पडलेलीं त्याचीं स्वतःचीं बटणं मुलांना खेळतां खेळतां सांपडलीं होतीं. बटणांचा धागा त्या ठिकाणीं चार दोन फुटांवर पुरलेल्या त्याच्या घोर पापापर्यंत पोचला नसता कशावरून ?

रघुनाथानं तीं बटनं ताब्यांत घेऊन तो पुरावा नाहींसा केला होता. पण त्याबरोबरच पोटच्या पोराच्या अंतःकरणांतलं उरलं सुरलं प्रेमही त्यानं नाहींसं केलं होतं. त्यानं आजूबाजूला पाहिलं तों आवारांत शुकशुकाट होता. पोरं पळालीं होतीं. कुठं गेलं हें कार्टं असा प्रश्न त्याच्या मनांत आला. असेल आईचा पदर धरून सैंपाकघरांत लुडबुडत, हें उत्तरही त्यानं स्वतःला दिलं. पण रघुनाथ घरांत जाऊन पाहतो तों आनंद सैंपाकघरांत जानकीपाशीं नव्हता. माजघरांत, सोप्यांत, माडीवर, कुठेंच नव्हता !

तिन्हीसांजा टळून गेल्या तरी आनंद घरीं न आलेला पाहून जानकी काळजी करूं लागली. "येईल, जातो कुठें ?" असं रघुनाथ स्वतःचं समाधान करून घेऊं लागला.

आनंद घरीं परतला. पण तो कांहीं एकटा नव्हता. त्याच्याबरोबर पंचविशींतला, उंच, गोरा, घाऱ्या डोळ्याचा एक तरुण होता. त्याचं नांव विष्णु साठे.

वडिलांचा अवतार बघून तो इतर मुलांबरोबर पळाला होता. फरक इतकाच कीं तें घर त्याचं होतं, आणि त्याची नवी बॅट, नव्या स्टंपा मोडणारा, त्यानं मोठ्या हौसेनं जमविलेल्या मुलांना हांकून घालणारा, त्याच्या स्वाभिमानाला ठेंचून काढणारा माणूस त्याचा प्रत्यक्ष बाप होता ! इतर मुलं त्या तसल्या बापाला भिऊन पळालीं होतीं. त्यांनीं आपलीं घरं गांठलीं होतीं. आईवडिलांच्या कुशींत जाऊन तीं दडलीं होतीं. पण आनंद मात्र त्या क्षणीं अगदीं पोरका होता. त्याला घर नव्हतं ! बाप तर

नव्हताच! पण आई आणि बहीणही असून नसल्यापैकींच होतीं!

"त्यांना त्रास होईल असं वागूं नको" असं आईनं त्याला बजावलं असतं. आणि नेहमीं स्वतःचे झगे, रिबना, बाहुल्या आणि हट्ट असं स्वतःभोंवतींच भोंवऱ्याप्रमाणें फिरणाऱ्या बहिणीला त्याची आठवण तरी कुठें होती?

आनंदाला अगदीं एकाकीं वाटूं लागलं. त्याच्या डोळ्यांतून अश्रू ओघळूं लागले. तो रस्त्यानं चालत होता. उशीर झाला हें त्याला समजत होतं. पण घराकडे कांहीं त्याचीं पावलं वळत नव्हतीं.

संघचालक विष्णु साठेच्या दृष्टीस आनंद प्रथम पडला तो शाखेच्या आवारांतील एका झाडाखालीं रडत बसलेला. विष्णुनं त्याचा हात धरून त्याला उठवलं, आणि वर्तुलाकार बसलेल्या लहानमोठ्या मुलांकडे त्याला नेऊन, जवळ बसवून घेऊन तो त्याला म्हणाला होता, "बेटा रडूं नको. आतां मी तुम्हांला सगळ्यांना गोष्ट सांगणार आहे. ऐका. कुणाची? गौतम बुद्धाची.."

ती गोष्ट ऐकतां ऐकतां आनंद आपलं सारं रडणं विसरून गेला. इतकंच काय, पण बौद्धिक आटोपल्यावर जमलेल्या मुलांच्या रांगा करून त्यांना विष्णु साठे कवाइत शिकवूं लागला तेव्हां आनंदही एक दो, एक दो करीत त्या मुलांबरोबर कवाइत करूं लागला.

शाखेंतलीं मुलं घरोघर निघालीं तेव्हां विष्णु आनंदाला म्हणाला,

"आतां उद्यां ये. घरीं जाशील ना?"

आनंदानं नकारार्थी मान हालविली.

"चल मी पोंचवितो तुला." असं म्हणून विष्णु त्याच्याबरोबर त्याच्या घरीं आला. आनंदाच्या घरांतलं वातावरण गरम होतं. त्यानं आनंदाच्या वडिलांची समजूत काढली. जातांना तो आनंदाला म्हणाला,

"उद्यां संध्याकाळीं येशील ना शाखेवर? तेवढा तुझा वेळ मजेंत जाईल."

"म्हणजे घरीं काय त्याचा छळ करतं कीं काय कुणीं?" रघुनाथानं खोंचकपणें विचारलं.

"तसं नाहीं. थोडं घराबाहेरचं सामाजिक जीवन मुलांनीं अनुभवलं

पाहिजे . .मग देतां धाडून आनंदाला संघांत ?"

"तो कायम घराबाहेर राहीना. मला कांहीं वाटायचं नाहीं." असं उत्तर देऊन रघुनाथानं तो विषय संपविला होता.

आनंद संघांत जाऊं लागला होता. एखाद्या मरगळलेल्या रोपट्याला खतपाण्याची जमीन, आणि जोपासणारे कष्टाळू हात लागले कीं तें जसं टवटवीत दिसूं लागतं, पालवतं, तरारून उठतं, तसा आनंद संघाच्या वातावरणांत, विष्णुच्या प्रेमळ सहवासांत नवीनच जोमानं वाढूं लागला. संघामधलं सामुदायिक जीवन, सामुदायिक खेळ, कवाइती, वगैरेमुळें त्याचं वाढीला लागलेलं शरीर तर पीळदार बनूं लागलंच परंतु गुरुजींच्या आदेशानुसार संघांतील सैनिकांना जीं नैतिक, बौद्धिक आणि धार्मिक शिकवणूक विष्णु साठे सतत देत होता, त्यामुळें आनंदाच्या मनाचे विसकटलेले, कमकुवत धागे एकत्र आले होते. नैतिक धार्मिक तत्वांचा पीळ त्या धाग्याना बसत चालला होता आणि एक नवीनच जोमदार हिंदु बाण्याचं व्यक्तित्व निर्माण होऊं लागलं होतं. चकमक दगडावर आपटली की तीमधून ठिणग्या बाहेर पडाव्या त्याप्रमाणें आनंदाच्या नवीन व्यक्तित्वाशीं त्याच्या घरांतील मंडळींचं घर्षण सुरूं होणं, आणि त्यांतून कलहाच्या ठिणग्या उडणं अगदीं अपरिहार्य होतं.

लग्नानतरचे नव्या नवलाईचे पहिले कांहीं वाढदिवस नवराबायको मोठ्या थाटानं आणि हौसेनं साजरे करतात. त्यावप्रमाणें स्वातंत्र्य प्राप्तीनंतरचे स्वातंत्र्यदिन प्रतिवर्षी मोठ्या थाटामाटानें साजरे करण्याचा सरकारचा आणि जनतेचा उत्साह मोठा दांडगा होता. गांधी-वधामुळें पसरलेले उदासीनतेचे ढग वर्ष दोन वर्षात निघून गेले होते. उलट त्या महात्म्याचं पुण्यस्मरण करण्याची प्रत्येक सार्वजनिक संधि समाजांतील पुढारी, कलावंत आणि सरकारी नोकरचाकर घेऊं लागले होते.

आंबराई मैदानांत ज्या ठिकाणीं संघाचे मोठे मोठे मेळावे भरत असत, त्याच ठिकाणीं स्वातंत्र्यदिनानिमित्त मोठं प्रदर्शन भरविण्यांत आलं होतं. प्रदर्शनाच्या आवराभोंवतीं, ग्रामोद्योग, लहानमोठे कारखाने वगैरे टिकाऊ आणि दिखाऊ मालाचे शेंकडो स्टॉल्स उभडले गेले होते. मध्यभागीं महात्मा गांधींच्या मस्तकाची प्रचंड शिल्पाकृति उभी केली होती. आणि प्रदर्शनाच्या

आवारांत करमणुकीचे आणि चहाफराळाचे किती छोटे मोठे तंबू होते त्यांची गणनाच नव्हती. संध्याकाळ झाली कीं आंबराई मैदानांतल्या या प्र दर्शनाच्या आवारांत विद्युद्दीपांचा एकच लखलखाट उडून जाई, आणि सारा गांव, म्हातारेकोतारे, बायाबापड्या आणि शाळा कॉलेजांतील तरुण मुलंमुली प्रदर्शन पहाण्याकरितां लोटत.

प्रदर्शन पहाण्यास जाण्याचा कुसुमचा हट्ट होता.

"जा पण आनंदाला बरोबर घेऊन जा. एकटी जाऊं नकोस." जानकी म्हणाली.

ज्या वयांत मुलींनीं एकटं दुकटं हिंडू नये असं आईला वाटतं अशा वयांत कुसुम होती. एखाद्या अर्धवट उमलेल्या कळीप्रमाणें तिचं रूप उमलूं लागलं होतं. जानकीनं तिच्याकडे पाहिलं आणि ओळखलं. पण जें ओळखलं त्यानं ती कर्तीसवर्ती बायको देखील मनांतल्या मनात लाजली. कुसुमच्या गोंडस बांध्यावरची दृष्टि काढून हातांतल्या पोलक्याचं शिवणकाम करीत जानकी म्हणाली,

"आणि हें बघ. पदर नीट अंगभर घे. कितीदां शिकवायचं तुला. तूं कांहीं आतां लहान नाहींस."

"मी मोठी आहे ना? मग मोठ्या माणसांसारखं वागूं दे ना मला. सारखा तूं माझा कां पाठपुरावा करतेस? अमूकच नको, तमूकच नको."

"काय नको म्हटलं मीं?" जानकीनं विचारलं.

"मी जातें ना प्रदर्शन बघायला." कुसुम म्हणाली.

"प्रदर्शन बघायला? कीं करायला?" आनंदानं विचारलं.

"म्हणजे?" कुसुमनं रागानं त्याच्याकडे पहात म्हटलं.

"म्हणजे असं कीं प्रदर्शन पाह्यला जाणार आहेस कीं स्वतःच्या नटचापटचाचं प्रदर्शन दाखवायला जाणार आहेस?" आनंदानं विचारलं.

"आई बघ ग." कुसुमनं ठराविक तक्रार केली.

"खरंच आई, बघ. किती झिरझिरीत पातळ, केस काय उलटे फिरवले आहेत आणि चेहऱ्यावर पावडर काय फासलीय् – छे. आपल्याला बुवा हिच्याबरोबर जायला देखील लाज वाटते."

"मग कोण बोलावतं आहे?" कुसुम फणफणली. "आणि तुझी ती

झांडी खाकी विजार, मुंडेछाट सदरा आणि हातांतला दंडा – तूं बरोबर असलास म्हणजे मला सारीं चिडवतात – आल्लख निरंजन. . . . "

" आणि तुला काय लोक म्हणतात तें सांगतां देखील येत नाहीं मला. " आनंद म्हणाला. " लाज वाटते. "

" पुरे करा आतां भांडणं. भावंडं म्हणवतां आणि छत्तीसाचा आंकडा कसा सदा ? आनंदा, जा तिच्याबरोबर आणि अंधार पडायच्या आंत परत या. " जानकी म्हणाली.

परंतु इतकं बजावूनही दोन्ही भावंडं रात्रीं दहा वाजून गेले तरी परतलीं नाहींत तेव्हां जानकी आणि रघुनाथ दोघंही काळजी करूं लागलीं.

थोड्या वेळानं एक मोठी स्टेशन वॅगन फाटकांत उभी राहिली. कुसुम खालीं उतरली. धोतराचा सोगा हातावर टाकलेला, तलम नेहरू सदरा घातलेला एक इसमही खालीं उतरला. तीं दोघंजणं अगदीं खाजगी बोलल्याप्रमाणें एकदोन मिनिटं बोलत उभीं राहिलीं. मग तो इसम पुन्हां मोटारींत चढला – आणि म्हणाला,

" आच्छा कुमा–आच्छा."

" आच्छा–टा–टा–" कुसुमनं नाजुक रूमाल हलवला. मोटार फर्रकन् निघून गेली आणि कुसुम गरकन् गिरकी मारून मानेच्या झटक्यांत वेणी पाठीवर टाकून घराकडे वळली.

" किती उशीर केलास ?" जानकी म्हणाली, " आनंद कुठं आहे ?"

" त्याला ठेवलाय् अडकवून चौकीवर."

" म्हणजे ?" जानकीनं आणि रघुनाथानं एकदम विचारलं.

" त्यानं तिथं मारामारी केली. कुठून त्याच्या बरोबर गेल्यासारखं झालं मला–बरं तर बरं नाहीं तर भलता प्रसंग ओढवला असता . ."

" काय, झालं काय ? " रघुनाथानं विचारलं.

" व्हायचंय् काय–" असा तुच्छतेचा उद्‌गार काढून प्रदर्शनांत झालेल्या दंगलीची हकीगत कुसुमनं आई–वडिलांना सांगितली.

प्रदर्शनांतले स्टॉल्स पहात, करमणूकीचे कार्यक्रम पहात कुसुम रमत गमत चालली होती. संध्याकाळची वेळ असल्यामुळें गर्दी– विशेषत: विद्यार्थ्यांचीच होती. गर्दींत एकमेकाला धक्का लागणं साहजिक नाहीं काय ? एका

विद्यार्थ्यानं कुसुमला बळेंच धक्का मारल्याचं पाहून आनंदचं माथं भडकलं होतं. त्यानं त्याच्या नेकटायला हात घातला होता, आणि दोन मुस्कुस्टांत भडकावून त्याला जमिनीवर लोळवला होता. त्याचे मित्र भडकले होते– गर्दी जमली होती, पोलिस आले होते आणि आनंदाच्या दंडाला खेचून त्यांनीं त्याला बाजूला काढलं होतं.

" संघांतलीं पोरं अशींच माथेफिरू असतात. " कुणी म्हणत होतं.

" त्यांना मारामारीची शिकवणूकच दिली जाते. तरी बरं सरकारनं सारी संघटना दडपून टाकली. " कुणी म्हणत होतं.

" त्याच्या बहिणीशीं लगट करणारा माणूस कोणी मुसलमान होता वाटतं. लगट कसली ? त्या दोघांना किती तरी वेळां चहा पितांना हॉटेलांत पाह्यलंय मी. " कुणी म्हणत होतं.

कुणी कांहीं, कुणी कांहीं आपल्यापरीनं तर्क लढवीत होते. पण पोलिसांनीं आनंदाला खेचून बाहेर नेला तेव्हां मात्र बहुतेक जण मनाशीं अगर उघड म्हणाले,

" संघाचीं हीं उरलीं सुरलीं पाळमुळं अगदीं उखडून टाकलीं पाहिजेत."

कुसुमच्या तोंडून सारी हकीगत ऐकल्यावर संतापलेला रघुनाथही म्हणाला,

" संघांत जाऊन कार्टा बिघडला.."

थोड्या वेळानं त्यानं विचारलं, " मग तूं कुणा बरोबर घरीं आलीस ?"

" मला सोडलं आमच्या गाण्याच्या मास्तरांनीं. " कुसुमनं " सत्य-नारायण " हें नांव घेतलं नाहीं.

" त्यांची मोटार आहे ?" रघुनाथानं विचारलं.

" त्यांची नाहीं, पण त्यांच्या मित्राची आहे. त्यांचा संगीतविषयक वाद्यांचा मोठा स्टॉल आहे प्रदर्शनांत. मुद्दाम मुंबईहून आलेत ते."

" त्यांचं नांव ? "

" ज्वाला प्रसाद " कुसुम म्हणाली.

" मोठे उपकार झाले त्या सज्जन गृहस्थाचे." जानकी म्हणाली. " नाहीं तर त्या गोंधळांत तूं अडकून पडायचीस."

न्यायासाठीं लढणारा चोर ठरावा आणि दगलबाज भोंदू सज्जन ठरावा

हा दैवाचा खरा दुर्विलास होय..

चौकींत पोलीसअधिकाऱ्याच्या समोर बसून सारी हकीगत सांगणाऱ्या आनंदाच्या मनांत हा विचार अनेकदां आला होता.

कुसुमच्या कमरेभोंवतीं हात टाकणाऱ्या त्या हलकटाचा हात मुळापासून उपटून टाकण्यासाठीं तो प्राणावर उदार झाला होता. पण पोलीस अधिकाऱ्यांनीं त्या सुशिक्षित मवाल्याला सोडून दिलं होतं. कारण "तुमचा या गृहस्थांनीं विनयभंग केला काय ?" असा प्रश्न जेव्हां त्यांनीं कुसुमला विचारला तेव्हां तिनं चक्क सांगितलं होतं, "नाहीं."

त्या रंगेल तरुणाचा बचाव करण्यासाठीं तिनं प्रत्यक्ष पाठच्या भावाला कायद्याच्या खोडयांत लोटलं होतं.

तिच्या तोंडचे ते उद्गार ऐकून आनंदाला प्रथम जबर धक्का बसला. आणि मग वितळलेला लाव्हा थंड झाल्यावर वज्रासारखा कठीण व्हावा तसं त्याचं अंतःकरण बहिणीच्या बाबतींत वज्राहूनही कठोर बनलं.

त्याला वाईट वाटत होतं फक्त एका गोष्टीचं. त्याच्या कृत्यामुळें संघावर निंदेचे, उपहासाचे शितोडे उडत होते.

नंतरच्या दिवसांत त्याची ही मनाची टोंचणी दूर करण्यासाठीं विष्णु साठे त्याला वरचेवर समजावी, "आनंद तूं उदास होऊं नको. अन्यायाचा प्रतिकार करणं आणि दुर्जनाचें पारिपत्य करणं हें संघाच्या प्रत्येक सैनिकाचं कर्तव्य आहे. वैयक्तिकदृष्टया संघ कोणत्याही पक्षांत वा सत्तेंत भाग घेऊं इच्छित नाहीं. कारण संघाला पक्षाची अगर सत्तेची संघटना करायची नसून नैतिक, बौद्धिक आणि सांस्कृतिक दृष्टया जनतेला संघटित आणि बलशाली करण्याचा आमचा प्रयत्न आहे. मी तुला त्या मारामारीबद्दल दोष देत नाहीं. उलट तूं मोठा शूर सैनिक आहेस असं मी समजतों. समाजाला अधःपातापासून परावृत्त करण्यासाठीं कायदे, सुधारणा यांपेक्षांही, जमिनींत रुजणारं आणि पुढें राष्ट्राचे आधारस्तंभ म्हणून वाढणारं नव्या पिढीचं बीज बलशाली करण्यासाठीं संघाची शिकवणूकच उपयोगी पडेल ! आतां येत्या गुरुपौर्णिमेला आपले सरसंघचालक गुरुजी आपल्या शाखेला भेट देतील तेव्हां मी मुद्दाम तुला त्यांच्या समोर नेऊन म्हणणार आहे, "हा बघा आमचा एक शूर सैनिक."

"महामंगले पुण्यभूमे त्वदर्थे
पतत्वेष कायो नमस्ते नमस्ते.."

गुरुपौर्णिमेला आंबराई मैदानावर संघाचा मेळावा सरकारी बंदी उठल्यानंतर प्रथमच भरला होता. तीनचार वर्षं अंधारांत निघून गेलीं होतीं. संघाच्या आणि आनंदाच्या जीवनांतसुद्धां! संघावरचा कलंक काळानं पुसला होता. आनंदाच्या बहिणीच्या जीवनाला लागलेला कलंक अजूनही पुसला गेला नव्हता. कुसुम नाहींशीं झाल्यापासून आनंदाच्या घरावर अवकळा पसरली होती. त्याच्या आईवडिलांमधलं प्रेम कुठं नाहीसं झालं होतं कुणाला ठाऊक? त्या दोघांमध्यें नेहमीं भांडणं होत असावीं असा आनंदाला संशय येत होता. एकदां तर त्याच्या वडिलांनी त्याच्या आईवरही हात टाकला होता. बिचारी आई. मुलीच्या दुःखानं खंगलेली पोळलेली. त्या दिवसापासून बापलेकांत बोलणं नव्हतं..आई त्याला वरचेवर म्हणत होती, जन्मदात्याशीं वैर धरूं नको. तुझे वडील चांगले आहेत. त्यांच्याशीं तेढीनं वागूं नको. बिचारी आई! अज्ञानांत सुख असतं अशी एक इंग्रजी म्हण आहे ती तिच्या बाबतींत किती खरी होती. वडिलांविषयी गांवांत कोणत्या कंड्या उठल्या होत्या, बाबूशेटच्या पेढीवर जातो म्हणून बायकोला सांगून ते कोणाच्या माडीवर वेळीं अवेळीं बसत होते, याची थोडी फार कल्पना आनंदाला होती. म्हणूनच आईची पतिनिष्ठा त्याला दुबळेपणाची वाटत होती. म्हणूनच वडिलांशीं प्रेमानं वाग हा आईचा उपदेश पाळणं त्याला कठीण होऊन बसलं होतं. किंबहुना आईची चाललेली फसगत आणि वडिलांचा भोंदूपणा यामुळें घरांतल्या त्या विचित्र वातावरणाला आनंदाचा जीव विटला होता. आपला सारा वेळ, सारं चित्त त्यानं संघाच्या कार्यात गुंतवलं होतं. संगीतानं दुःखाचा विसर पडतो कीं नाहीं कुणास ठाऊक? पण संघाच्या मेळाव्यांत शेंकडों संघसैनिकांनीं एकमुखानं उच्चारलेल्या, गायिलेल्या त्या प्रार्थना–गीतानं आनंदाला आपल्या साऱ्या दुःखाचा विसर पडला. तो एका निराळ्याच दिव्य उदात्त अशा वातावरणांत शिरला. या गुरुपौर्णिमेची तो फार फार वाट पहात होता. कारण त्याला कित्येक वर्षांनंतर गुरुजींचं दर्शन घडणार होतं!

संघसैनिकांच्या रांगेंत उभ्या राहिलेल्या आनंदानं प्रार्थनागीताचे स्वर

हवेंत विरतांच डोळे उघडून गुरुजींच्या मूर्तीकडे पाहिलं. आतां त्या गुरु-दर्शनाचा क्षण अगदीं जवळ येत चालला होता. गुरुजींच्या पायावर विजारीच्या खिशांतले दीडशे रुपये गुरुदक्षिणा ठेवून तो आपल्या मनांतली फार दिवसांची इच्छा पूर्ण करणार होता. परिणामाचं भय न बाळगतां ! वडिलांच्या कोपाची पर्वा न करतां !

अखेर तो क्षण आला. विष्णु साठेनं आनंदाला गुरुजीपुढें नेऊन म्हटलं, "गुरुजी, हा पहा आपला शूर सैनिक. इथल्या शाखेचंच नव्हे तर संघाच्या प्रचंड वृक्षाचं एक गोड फळ. आतां समारंभ आटोपल्यावर आम्हीं कांहीं लष्करी खेळ करून दाखविणार आहों. त्यामधें आनंदाच्या अंगचं कौशल्य आणि शौर्य आपल्याला दिसेलच."

गुरुजींनी आनंदाच्या पाठीवर हात फिरवला. त्याला जवळ ओढल्या-सारखं करून ते म्हणाले, "तुझ्यासारख्या सैनिकांची आज फार गरज आहे. जीते रहो, आगे बढो ! "

त्या शब्दांनीं आनंदाला केवढं स्फुरण चढलं. त्याच्या साऱ्या देहांत नवचैतन्य सळसळूं लागलं.

लष्करी खेळ सुरूं झाला. दोन्ही आघाड्यांनीं मोर्चे बांधले. लाठीधारी सैनिक आपापल्या व्यूहांत आदेशाची वाट पहात तयार राहिले.

आनंद आपल्या सैनिकांसह उभा होता. शत्रूपक्षाचं संख्याबल मोठं होतं. आनंदाच्या हाताखालीं दहापांच जवान तेवढे होते. शत्रूची फळी फोडून पार होण्यासाठीं सारं शौर्य आणि कौशल्य पणाला लावणं जरुरीचं होतं.

'हर हर महादेव !' 'शिवाजी महाराज की जय ! ' 'जय भवानी' अशा आरोळ्या ठोकून आपल्या जवानांसह आनंद शत्रूच्या मिटत चाललेल्या फळींत घुसला. दोन्ही बाजू एकमेकींना भिडल्या. क्षणभर खरोखरचं तुंबळ युद्ध चालल्याचा भास प्रेक्षकांना झाला. आणि युद्ध केवळ सिनेमांतच पाहणाऱ्या बहुसंख्य प्रेक्षकांनीं तर टाळ्या शिट्या वाजविल्या.

शत्रूची फळी फोडून आनंद बाहेर पडला तेव्हां टाळ्यांचा एकच गजर झाला. पण तो ऐकण्यास आनंद शुद्धीवर राहिला नाहीं. दुसऱ्याच क्षणीं तो खालीं कोसळला. त्याला डोक्यावर जिव्हारी लाठीचा प्रहार बसला होता.

संघाचे सारे सैनिक त्याच्या भोंवतीं जमले. कोणी त्याच्या मस्तकावर

पाणी मारलं, कुणी त्याच्या नाकाशीं कांदा ठेवून धरला. कुणी डॉक्टरना बोलावून आणलं.

प्रथमोपचार केल्यावर आनंदाला घेऊन विष्णु साठे आनंदाच्या घरीं गेला. पुढचं दार बंद होतं. पण आंत भांडण चालावं तसं मोठमोठ्या आवाजांत दोन माणसं बोलत होतीं. त्यांपैकीं चढा आवाज रघुनाथाचा होता. तो म्हणत होता,

"पण माझ्या चिठ्ठीशिवाय तुम्ही त्या कारट्याला पैसे दिलेतच का ? त्याला नवी सायकल विकत घेऊन देण्यासाठीं मी तुमच्या दुकानीं आलों. दीडशे रुपये भरले. सायकलची ऑर्डर दिली. सायकल घरीं पाठवून देण्याचं तुम्ही कबूल केलंत. आणि आज येऊन सांगतां, तुमच्या मुलानं सायकल घेण्याचा बेत रद्द झाला असं सांगून पैसे नेले ! तुम्ही दिलेत कां ? "

"साहेब, आम्हांला तरी काय कल्पना ? तुम्ही वडील, तो तुमचा मुलगा. त्यांनीं तुमचा निरोप म्हणून सांगितला म्हणून रक्कम त्याच्या हातीं दिली."

"फार चांगलं केलंत. आतां ते पैसे माझ्या हातीं लागायचे नाहींत.... कुठें जातील त्याची कल्पना आहे मला. येऊं दे कार्टा. डोकं फोडलं नाहीं तर नांव दुसरं.."

आनंदाला बखोटचाला धरून विष्णु साठे दाराशीं उभा होता....त्यानं दारावर थाप मारतांच रघुनाथानं दार उघडलं. पाहतो तों डोक्याला बँडेज गुंडाळलेला, घायाळ झालेला आनंद उभा होता. विष्णु साठेला त्यांनीं विचारलं,

"हा काय प्रकार आहे ?"

विष्णु साठेनं रघुनाथाला सारी हकीगत सांगितली. आनंदाच्या कणखर व्यक्तित्वाचं, शौर्याचं त्यानं वर्णन केलं, सरसंघचालकांनीं त्याच्याविषयीं काढलेले शाबासकीचे उद्‌गार सांगितले आणि सैनिकांच्या लष्करी सामन्याचं वर्णन करून तो म्हणाला,

"खरोखरोची लाढाई जिकून पराक्रमी पुरुष घरीं परतला कीं बायका त्याच्या सामोऱ्या जाऊन आरती ओवाळतात....तुमचा आनंद असाच पराक्रम गाजवून आला आहे."

परंतु हें सारं कौतुक ऐकून घेण्याच्या मनस्थितींत रघुनाथ नव्हता. त्या

बापलेकांमध्यें दिवसेंदिवस विलक्षण तेढ निर्माण होत गेली होती. रघुनाथाच्या प्रत्येक समेटाच्या प्रयत्नाचा धि:कार करण्याचा विडाच जणु आनंदानं उचलला होता. रघुनाथानं त्याला सायकल घेऊन देण्याचं ठरविलं होतं. दुकानदाराला अगाऊ पैसे भरले होते. पण आनंदानं सायकल खरेदीचा बेत बदलला होता. आणि त्याहूनही मोठा अपराध म्हणजे दुकानदाराकडचे पैसे परस्पर वसूल करून पळवले होते. जे पैसे मिळविण्यासाठीं रघुनाथानं आपलं सारं जीवित धोक्यांत घातलं होतं, त्या पैशांपैकीं दिलेल्या रकमेची त्याच्या पोटच्या पोराला कवडी किंमत नसावी, उलट ते पैसे त्यानं मुक्त हस्तानं, बापाच्या मर्जीविरुद्ध, सरकार दरबारीं व समाजांत हिंसक, जातीय म्हणून हेटाळणी झालेल्या एका संघटनेला दान करावे याची रघुनाथाला विलक्षण चीड आली होती. त्या संशयानंच तो ओरडला होता, " येऊं दे कार्टा, डोकं फोडून टाकतो. "

आणि विष्णु साठे तर आनंदाची स्तुतिस्तोत्रं गात होता.

" सारे चोर ! सारे चोराचे साथीदार ! " रघुनाथ त्याच्या अंगावर ओरडला. " म्हणे तोंडाभोंवतीं आरती ओवाळली असती. दोन खटरं उडवून मला या कार्टयाला विचारायचं आहे की दीडशें रुपये कुणाला विचारून घेतलेस, काय केलंस ?"

आनंद डोळे उघडून म्हणाला, " बाबा मी ते पैसे सत्कारणीं लावले. माझ्या गुरुजींना गुरुदक्षिणा म्हणून अर्पण केले. पापापासून – जुगार सट्टयापासून मिळविलेल्या पैशाला याहून दुसरं अधिक चांगलं प्रायश्चित्त कोणतं ? "

" खबरदार ! थोबाड फोडीन जास्त बडबडलास तर ! मी पापाचा पैसा मिळविला काय ? आणि तुझा तो गुरुजी सच्चा काय ? लोकांची पोरं बिघडविण्याचं पवित्र कार्य करतो काय ? कुठें आहे तो, जातो त्याच्या समोर आणि . ."

पण रघुनाथाच्या तोंडून घाणेरड्या शिव्या बाहेर पडण्यापूर्वीच आनंदाला एकदम मूर्च्छा आली होती. त्याला कॉटवर निजवून विष्णु साठे मुकाट्यानं निघून गेला.

मध्यरात्रीच्या सुमाराला आनंदानं डोळे उघडले. पहातो तों त्याच्या

शेजारीं जानकी बसली होती. त्याच्या केसावरून मायेनं हात फिरवीत होती.

तिच्याकडे बराच वेळ टक लावून पहात आनंद म्हणाला,

" आई निज. आतां मला बरं वाटतंय्."

" तुला कांहीं हवं ? चहा, कॉफी, दूध ? "

" नको ग. किती माया करतेस ? आई फार प्रेम करणं सुद्धां बरं नाहीं. " तो पुटपुटला.

" पुरे तुझं शहाणपण.. " असं म्हणून तिनं त्याला दूध पाजलं आणि ती त्याच्या शेजारीच डोकं टेकून लेटली.

पण सकाळीं ती जागी झाली आणि पाहते तों आनंद अंथरुणावर नव्हता !

तिच्या छातीत एकदम धस्स झालं. तिनं पाहिलं तों उशीवर एक चिठ्ठी आनंदानं ठेवली होती. जानकीनं कापऱ्या हातानं ती उचलली आणि वाचली —

" आई, ज्या घरांत माझ्या प्राणप्रिय गुरुजींचा अपमान केला जातो तेथें मी राहूं शकत नाहीं. म्हणून मी घर सोडून निघून जात आहे माझ्या गुरुमाऊलीकडे. तुझ्यासाठीं मी घरीं रहावं, तुझं संरक्षण करावं असा माझा हेतु होता. पण आई, दुर्बळाला कोणी वांचवू शकत नाहीं. तुझा आनंद.."

# प्रकरण सातवें

प्रतिवर्षाप्रमाणें या वर्षीही उन्हाळ्याच्या सीझनमधें पंचगणीला स्त्री-पुरुषांची गर्दी लोटली होती. सकाळीं आणि संध्याकाळीं पंचगणीचे लाल रंगाचे छोटे रस्ते, उंची साड्या नेसलेल्या, आणि अंगावर भारी किंमतीचे गरम-कोट, फरकोट घातलेल्या, हातांत नाजुक काठ्या घेऊन रमत गमत फिरणाऱ्या गुजराथी, पार्शी, बोहरी, स्त्रीपुरुषांनीं भरून जात. ते रस्ते रंगीबेरंगी फुलांनीं लगडलेल्या पंचगणीच्या डोंगरांत पाऊलवाटांच्या कडेनं डोकावणाऱ्या वृक्षांच्या सडसडीत फांद्यासारखेच भासूं लागत. या गर्दीतच 'इस्ट्राबेरी !' अशी विचित्र बसक्या आवाजांत हांक देणारे, इस्ट्राबेरीच्या लालबुंद टंच फळांनीं शिगोशिग भरलेल्या पानांनीं झांकलेल्या टोपल्यांच्या कावडी खांद्यावर टाकून हिंडणारे फळवाले, रस्त्याच्या कडेला – ओले मटार, लाल मुळे, फुलकोबी आणि दरवळणारे फणस घेऊन बसलेल्या खेडुत बायका, काठ्यांचे जुडगे, जंगली मधानं भरलेल्या शिशा, आणि पिनारिबना येणाऱ्या जाणाऱ्या समोर पुढें करणारे शहरी आणि डोंगरी विक्रेते, उंची पोषाख केलेल्या मुलांना लहान लहान शिंगरांवर बसवून रपेट करणारे घोडेवाले यांचीही गर्दी झाली होती. पंचगणीचे सारे प्रमुख रस्ते असे गजबजलेले दिसत.

पण 'व्हॅली व्ह्यू' – दरीदर्शन – बंगल्यावरून जाणाऱ्या लहानशा पाऊलवाटेनं मात्र फारशी रहदारी नसे. तशी ती थोडी आडवाटच होती. तिच्यावर पडलेला पालापाचोळा वारा हलवील तेवढाच. कधीं कोणी चुकून त्या रस्त्याला फिरकलं तर उजव्या हाताला 'दरीदर्शन' बंगल्याच्या कंपाऊंडची दगडी भिंत आणि फाटकाच्या दगडी खांबावर व्हॅली व्ह्यू – दरीदर्शन हें नांव कोरलेलं पाहून मनाशीं तें माणूस आश्चर्य करी. दरी

दर्शन नांव असलं तरी दर्शन व्हायचं तें फक्त रस्त्याच्या डाव्या बाजूनं वर चढणाऱ्या टेकडीचं.

परंतु फाटकांतून आंत शिरल्यावर दहा पंधरा दगडी पायऱ्या उतरून बंगलीच्या व्हरांड्याच्या बाजूच्या दारांत येऊन, तेथून टप्याटप्यानं खालीं उतरलेल्या बागेच्या टोकाशीं जाऊन समोर नजर फेंकली कीं निधड्या छातीच्या माणसानंही धसकून चार पावलं मागें सरकावं असं समोर पसरलेल्या खोल, विशाल दरीचं हृदय कंपित करणारं दर्शन होत असे. समोर या पॉईंटपासून चारपांच फूट मागें, बगीचाच्या कांठावर एक दगडी बांक ठेवलेलं होतं. या दगडी बांकाचा आधार घेतल्याशिवाय समोर पसरलेल्या दरीची शोभा दीर्घकाल पाहाणं कुणालाही शक्य नव्हतं. या बांकावर बसलं कीं उजव्या डाव्या बाजूंनीं हत्ती एवढे प्रचंड टोंकदार शीलाखंड कडेकुशीवर घेणाऱ्या नग–मालिका पुढें येऊन मिळालेल्या दिसत. खालीं नजर टाकली कीं दरीच्या तळांतल्या धुक्यामुळें अधांतरी तरंगणाऱ्या शेवरीच्या कापसासारख्या पांढऱ्या विरळ ढगामुळें आकाशच उलटं टांगल्याचा कित्येकदां भास होई. आणि खालीं खोल अंतरावर तरंगणाऱ्या घारी, आणि पर्वतांच्या कुशीला चाटून क्वचित् लखलखणाऱ्या विजा पाहून तर पर्वत–शिखरांच्या उंचीचा आणि दरीच्या खोलीचा प्रत्यय येऊन मन भयचकित होऊन जाई.

निसर्गाचं हें विराट स्वरूप पाहून कुणालाही स्वतःच्या अस्तित्वाचा विसर पडला असता. कसला तरी गूढ साक्षात्कार होऊन माणूस सुखदुःखाच्या पलीकडे जावं असंच तें सृष्टीचं भव्य विराट स्वरूप होतं.

गेले पंधरा दिवस या दगडी बांकावर बसून जानकी ह्या विशाल दरीकडे पहात असे. पण अगदीं शून्य दृष्टीनं. सकाळ संध्याकाळ थोड्या फिरायला जात जा असं डॉक्टरनीं तिला बजावून सांगितलं होतं. पण ‘दरी-दर्शन’ मधें तिनें जे पंधरा दिवसांपूर्वी पाऊल टाकलं होतं तें कधीं बाहेर काढलं नव्हतं. बाहेर जावं, स्त्री–पुरुषांनीं गजबजलेल्या रस्त्यांत भटकावं, स्ट्रॉबेरी, मटार, ताजी भाजी विकत घ्यावी अशी उमेदच तिच्या मनांत आणि शरीरांत उरली नव्हती. स्वतःच्या दुःखाचे धागे लपेटून तिनं स्वतःभोंवतीं कोशच निर्माण केला होता आणि त्यांत गुदमरून

ती कुढत चालली होती. म्हणून तर तिला निराळ्या वातावरणांत, निराळ्या हवेंत पाठविण्याचा सल्ला डॉक्टरांनीं दिला होता, आणि रघुनाथानं तो अंमलातही आणला होता.

पण या ठिकाणींही तिच्या हृदयाचा पीळ सुटत नव्हता. उलट मुळासकट उपटलेली वेल सुकावी तशी ती सुकत चालली होती. ती घरीं दुःखानं कुढत असली तरी त्या घराच्या वास्तूमधें तिच्या जीवनाचीं मुळं अपत्यभेटीच्या आशेनं तग धरून राहिलीं होती. कुणाचं खुदकन हंसूं ऐकलं, शब्द कानीं पडला, पावलांची चाहूल लागली, कुसुमसारखी दिसणारी, तिच्या वयाची कुणी मुलगी, आनंदाच्या वयाचा, खाकी पॅन्ट पांढरा शर्ट घातलेला कुणी मुलगा ओझरता दिसला तरी तिच्या छातीचे ठोके जलद पडूं लागत. हें कुसुमचं तर हसणं नसेल ? हा शब्द, ही पावलांची चाहूल आनंदाची तर नसेल ? ही कुसुमच. हा आनंदच. अशा वेड्या आशेनं ती अंगणांत, रस्त्यावर डोकावून पाही. निराशेच्या तडाख्यांनीं पुनःपुन्हां डोकं वर काढणारी तिची आशा ठेंचून काढली जात होती हें खरं. तरी देखील म्हणतात ना आशा अमर आहे. त्या आशेच्या धुगधुगीवर घरांतलं जिणं ती कंठीत होती. पण इथं पंचगणीला आल्यापासून ती आशा मुळासकट कुणी उपटल्याच्या वेदना तिला होत होत्या.

अपत्य वियोगाचं दुःख फार फार मोठं ! रामा रामा असा मूक आक्रोश करीत पश्चात्तापानं होरपळलेल्या एका दशरथालाच तें माहीत. आणि आतां बगीच्याच्या कडेला अथांग दरीच्या काठांवर दगडी बाकांवर बसून, " कुसुम कुसुम – आनंद आनंद " असा ध्यास घेतलेल्या, पश्चात्तापानं होरपळलेल्या जानकीलाच तें माहीत. दशरथानं रामाला स्वतःच्या हातांनीं वनवासाला पाठविलं होतं म्हणून त्याला पश्चात्ताप होत होता. तो अपराध कांहीं जानकीच्या हातून घडला नव्हता. पण ज्या अर्थी आईबापांना सोडून मुलं निघून गेलीं त्या अर्थी आपलं कांहींतरी चुकलं असलं पाहिजे अशी रुखरुख तिच्या जिवाला लागली होती. माझं कुठें चुकलं, काय चुकलं असे प्रश्न हजारदां ती स्वतःला विचारीत असे. त्याचं उत्तर तिला स्वतःला देतां येत नव्हतं. परंतु शेजारीपाजारी, तिऱ्हाईत स्त्रीपुरुष आणि तिचा पति रघुनाथ सुद्धां तिला दोष देत होता. जिच्या हातीं पाळण्याची दोरी ती जगाचा

उद्धार करी अशी मातृप्रेमाच्या प्रभावाचीं वर्णनं तिला ऐकवून लोक म्हणत, "आईनं मुलांना वळण लावलं नाहीं म्हणून मुलं बिघडलीं."

"तूं त्या पोरीचे फाजील लाड केलेस म्हणून ती बिघडली. त्या पोराला शेफारून ठेवलास म्हणून माझ्या नाकावर टिचून त्यानं घर सोडलं," अशी दूषणं रघुनाथ तिला पावलोपावलीं ऐकवीत असे.

"अहो छडी लागे छमछम तर विद्या येई घमघम. लकडी शिवाय मकडी वळत नाहीं. मुलांचे लाड करण्याऐवजीं काठीच्या धाकांत त्यांना ठेवलं असतं तर असा कलंक लावला नसता त्यांनी अम्रूला." शेजारीपाजारी तिला म्हणत.

"पहिल्या चुकीला मुस्कटांत भडकावली असती म्हणजे वेळींच पोरं तोल सावरतात. पण तुमची आयांची जात. पोरांचा कैवार घेतां. चुकीची दुरुस्ती करण्याची शिस्त मुलांना लावण्याऐवजीं त्या चुकीवर मायेचं पांघरूण घालतां. इथेंच मुलांचा घात होतो. मुलांच्या अपराधावर मायेचं पांघरूण घालण्याची घातकी संवय आयांनीं टाकून दिली तर बालगुन्हेगारांचं प्रमाण कमी होईल." कुणीतरी हा उपदेश तिला ऐकवी.

"मुलांना अति स्वातंत्र्य दिलंत आतां भोगा त्याचीं फळं." कुणी शाप देई.

"मुलांना भलती कडक शिस्त बापानं लावली त्याचा हा परिणाम." उलट कुणी असहि म्हणे.

वर्तमानपत्रांतील अग्रलेखांतून, जनमनाच्या कानोशांतून, वाचकांच्या पत्रव्यवहारांतून बालगुन्हेगारांवर प्रत्येकजण आपलें मत झोडून देई. शहरांत दंगल झाली म्हणजे जशी कर्फ्यू जारी करतात तशी सरकारनं आणि पालकांनीं तेरा ते एकोणीस वयाच्या मुलांमुलींवर वेळेचे बंधन ठेवावं असा ठराव कोणी मांडी. कुणी म्हणे शहरांतील गलिच्छ रस्त्यांचा नायनाट करा.

पण दुराचरणीं प्रवृत्तीचीं बीजें या कारणांत असतीं तर ऐषआरामांत राहणाऱ्या, सत्प्रवृत्त मातापितांच्या पोटीं कुलकलंक कां जन्मले असते, आणि गलिच्छ वस्तींतून भांगेंत तुळस निपजावी तसे महापुरुष कां निर्माण झाले असते ?

आंधळ्यांनीं हत्तीची पारख करावी तशीच वयांत आलेल्या मुलांच्या दुष्ट प्रवृत्तीबद्दलची कारणमीमांसा लोक करीत होते. एक आंधळा म्हणतो हत्ती खांबासारखा आहे, दुसरा म्हणतो सुपासारखा आहे, तशांतलाच हा प्रकार होता म्हणायचा. आपापल्या अनुभवाप्रमाणें प्रत्येकजण बाल-गुन्हेगारांबद्दलचे आपले सिद्धांत मांडीत होता.

या विद्वानांची ही मीमांसा जानकीला कळत नव्हती. तिला फक्त एकच गोष्ट ठाऊक होती कीं पोटच्या मुलांवर तिनं जीवापाड प्रेम केलं होतं. आणि प्रेमानं काय मुलं बिघडतात? मुलं बिघडतात घरापेक्षां बाहेरच्या वातावरणानं, वाईट संगतीनं. कुसुमसारख्या भाबड्या पोरी म्हणजे जंगलांत बागडणाऱ्या हरिणी. त्यांच्यावर झडप घालणारे लांडगे समाजांतून नाहींसे झाले पाहिजेत....

पण आनंदानें घर सोडलं तें घरातल्या तेढीमुळें, बापाच्या तिटकाऱ्यामुळें हें तर खरं?

असं कुणी म्हटलं कीं जानकीच्या अंतःकरणाला फार खोल वेदना होत. आनंदाच्या मुंजींतल्या त्या जरीच्या टोपीपासून आज जवळ जवळ नऊ वर्षं ती पहात आली होती कीं बापलेकांमधल्या त्या तेढीचं कारण त्या दोघांच्या वृत्तींची भिन्नता हेंच होतं. आणि त्यांतूनच भलते गैरसमज निर्माण झाले होते. रघुनाथाचा आग्रह आणि आनंदाचा उर्मटपणा यांचा सतत झगडा तिनं पाहिला होता. आनंदाला जर तिची समजूत आणि तिचं क्षमाशील अंतःकरण असतं तर पित्याच्या अंतःकरणातली खळबळ त्याला कळली असती आणि त्याच्या मनांत तिटकारा उत्पन्न झाला नसता. परंतु आनंद एक अननुभवी बालक होता. नवराबायकोच्या नात्याची त्याला कल्पना नव्हती. आपले वडील आपल्या आईला गुलामासारखी वागवतात अशी त्याची समजूत झाली होती. कांहीं तरी क्षुल्लक कारणावरून भडकण्याची रघुनाथाला खोड जडली होती. जानकीला तो तडातडा बोलून जाई.

"बाबा तुला बोलतात मला आवडत नाहीं. तूं कां त्यांचं बोलणं मुकाट्यानें ऐकून घेतेस?"

आनंदानं हा प्रश्न तिला कितीदां केला होता. तिला त्यानं दुबळी ठरवली होती. संघाच्या स्वाभिमानी शिस्तींत वाढणाऱ्या त्या मुलाला तिच्या दुबळे-

पणाचा राग येत होता. पण त्याला हिंदु स्त्रीच्या हृदयाची कोठून कल्पना? जें त्याला दौर्बल्य वाटत होतं तेंच स्त्रियांच्या उत्कट प्रीतीचं सामर्थ्य होतं. प्रेम आणि द्वेष यामध्यें फक्त सुरीच्या धारेचं अंतर असतं. परंतु आर्य-संस्कृतींत वाढलेल्या जानकीला प्रेम म्हणजेच क्षमाशीलता हें व्रत माहीत होतं. जेव्हां जेव्हां आनंद वडिलांच्या आततायीपणाबद्दल त्यांना दूषण देई तेव्हां तेव्हां, वरकरणीं त्याची समजूत घालतांना ती मनाशीं म्हणे,

" बाळा, तूं अजाण आहेस. खेळतांना धांवतांना तुला ठेंच लागली, कुणी कडू शब्द बोललं, तुझं कसलं खेळणं हरवलं म्हणजे तूं जसा माझ्याजवळ धावत येतोस, माझ्या पोटाशी बिलगतोस, तसेच तुझे वडील अपमान, निराशा, नुकसान यांचे तडाखे सहन होईनासें झाले कीं अगतिक, असाहाय्य बालकाप्रमाणें माझ्याकडे धाव घेतात. त्याना माझ्याशिवाय कोणी नाहीं. मीच त्याच्यावर उलटलें तर ते कोठें जातील? त्यांना दुसरी अधिकाराची, प्रेमाची, निवाऱ्याची जागा कुठें आहे सांग."

अशा वेळीं तिच्या डोळ्यापुढें कित्येक वर्षांपूर्वींचा तो प्रसंग उभा राही. मैत्रिणीच्या घरचा लग्नसोहाळा आटोपून ती परतली तेव्हां रघुनाथ विव्हळत अंथरुणांत पडला होता तिला पाहतांच, तिच्या कमरेभोवतीं हात टाकून मांडीवर मस्तक ठेवून हुंदके देत तो म्हणाला होता, " मला सोडून कधीं जाऊं नको."

रघुनाथाच्या या एका वाक्यानं जानकीच्या अंतःकरणाचं सारं असमाधान नाहीसं झालं होतं. केवळ रघुनाथाच्या असल्या उद्‌गाराच्या जोरावर जानकीनं संसारातल्या लहानमोठ्या अडचणींना हंसतमुखानं तोंड दिलं होतं. पुढेंही ती एखाद्या दीपस्तंभासारखी वादळाचे तडाखे सहन करीत, रघुनाथाच्या जीवनावर प्रेमाच्या स्निग्ध किरणांचा वर्षाव करीत एकटी उभी राहिली असती. तो एकटेपणा तिला जाणवला नसता. अपत्यवियोगाच्या दु:खानं देखील ती मोडकळीला आली नसती. पण एका विचित्र अवस्थेनं तिला बेचैन करून सोडलं होतं. शत्रूशीं सामना देतां देता एकेका सैनिकानं पळून जावं आणि शेवटीं उरलेल्या हुकुमाच्या विश्वासाच्या जोडीदारानं फितूर होऊन पाठ फिरवावी म्हणजे जशी अवस्था होईल तशी जानकीची अवस्था झाली होती. कुसुमनं घर सोडलं होतं. कोणती भूल तिला पडली

होती देव जाणे. आनंदानं लहान वयांत गृहत्याग करून सेवाव्रत पत्करलं होतं, दोघंही तिला एकटीला सोडून निघून गेलीं होतीं. आणि आतां रघुनाथही त्याच मार्गाला लागला होता. अपत्यवियोगानें गांजलेल्या जानकीला ज्यावेळीं त्याच्या प्रेमाची, सोबतीची गरज होती त्याचवेळीं त्यानं तिच्याकडे पाठ फिरविली होती. "माझं कुठं चुकलं ? माझा काय अपराध ? माझ्यांत काय कमी आहे ?" हे उच्चारासाठीं ओठांवर खोळंबणारे प्रश्न तिनं कधीं रघुनाथाला विचारले नाहींत. कारण या साऱ्या प्रश्नांचीं कठोर उत्तरं पुरुषांच्या थंड दृष्टिक्षेपांत, स्नेहशून्य स्पर्शांत आणि कोरड्या शब्दांत बायकांना कळूं शकतात, तशी ती जानकीलाही कळली होती.

रघुनाथाच्या प्रेमाच्या विश्वासावर गरीबींतही ती एकप्रकारें संपन्न होती· आतां तिच्या घरांत सगळी भरभराट होती. माजघरांतल्या तिच्या कपाटांत उंची रेशमी पातळांचे ढीग होते. बाहेरच्या खोलींत सोफासेटची, आरशाच्या कपाटांची गर्दी झाली होती. निजायच्या खोलींत शिसवी लाकडांचा, कुसरीचा, हातभर उंच गाद्यांनीं मढविलेला पलंग होता. घरांत स्टेनलेसच्या आणि चांदीच्या भांड्यांचा चकचकाट होता.

परंतु कपाट उघडून त्यांतलं एखादं तलम पातळ नेसावं, बाहेरच्या खोलींतल्या उंच आरशांत कधीं डोकवावं, सुंदर गोड सैंपाक करून चांदीच्या ताटांत वाढावा, किंवा ज्या शय्यागृहांत पतीबरोबर अनेक प्रेमांच्या रात्रीं घालविल्या तेथें पाऊल टाकावं, अशी इच्छाच तिला होत नसे. तिच्या देहाचं सारं सौष्ठव झडलं होतं. उंची पातळ काठीला गुंडाळल्यासारखं वाटे. तिच्या हातांतल्या बांगड्या कोपरापर्यंत खळकन् जात. आणि तिच्या गळ्याच्या वर आलेल्या हाडावर कोणताच अलंकार शोभत नसे. बाहेर जातां येतां कधीं आरशाकडे दृष्टि गेली कीं खिन्न नजरेनं ती त्या हडकलेल्या सुकलेल्या प्रतिबिंबाकडे पाहत राही आणि मनाशीं त्याला प्रश्न करी,

"आतां तूं कोणत्या तोंडानं तुझ्या पतीला विचारणार माझ्यावर प्रेम करतां काय ? आतां तूं कोणत्या हट्टानं त्याला प्रेमाच्या पाशांत बांधून ठेवणार ? नाहीं जानकी, पुरुषानं प्रेम करावं असं तुझ्यांत काय आहे ? ना

देहाची पुष्टता, ना मनाचा शृंगार, ना तारुण्य, ना उमेद. नको रडूं. स्त्री जन्माची ही कहाणी आहे. "

ही जाणीव मनाला खात असल्यामुळें रघुनाथाला त्याच्या कोणत्याच वर्तनाचा जाब विचारण्याचं धाडस जानकीला होत नसे. त्याची घराबाहेर पडण्याची ओढ, डोळ्यांतला व हालचालींतला अधीरेपणा, पोषाखांतला वाढलेला नीटनेटकेपणा सारं तिला कळत होतं. तो घरीं उशीरा परतला कीं त्याच्या समोर जाण्याचा धीर तिला होत नसे. त्याच्याकडे पाहण्याचं ती टाळीत असे. त्याच्या अंगावरची सुस्ती, डोळ्यांतली धुंदी, विस्कटलेले कपाळावरचे केस आणि तो जवळून गेला कीं कधीं कसल्या फुलांचा तर कधीं अत्तराचा त्याच्या अंगाला येणारा सूक्ष्म सुगंध, या साऱ्या गोष्टींचा अर्थ तिला कळत असे.

तो कुणा स्त्रीच्या प्रेमांत दिवसेदिवस अधिकच गुरफटत चालला होता, आणि त्याला थोपविणं आतां तिच्या हातीं नव्हतं. कोण असावी ही स्त्री ? आणि या प्रश्नाचं उत्तर म्हणून जानकीच्या डबडबलेल्या डोळ्यांसमोर पांढरं शुभ्र पातळ नेसलेली, चांदमलच्या दुकानांत रघुनाथाच्या हातांत पानपट्टी देणारी ती नखरेल स्त्री उभी राही..

जानकीचा तो संशय खराच होता.

चांदमलच्या दुकानांत रघुनाथाच्या हातांतनं पैशाचं पाकीट खालीं पडलं आणि त्यांतून बाहेर सरकलेला नोटांचा जुडगा केसरच्या दृष्टीला पडला तेव्हांच केसरनं मनाशीं कांहीं हिशोब केला होता, आणि रघुनाथ जिना उतरून खालीं गेल्यावर चांदमलला विचारलं होतं, " कोण हे गृहस्थ ? बडे गब्बर दिसताहेत. "

चांदमलनें डोळे मिचकावून रघुनाथाबद्दल तिला ज्या चार गोष्टी सांगितल्या त्यावरून केसरनं अंदाज बांधला कीं सावज पकडणं सोपं आहे. युद्धकाळानंतर बऱ्यावाईट मार्गांनीं पैसे मिळवून श्रीमंत झालेल्यांत लोक रघुनाथाची गणना करीत होते. बाबूशेठ सारख्या चंगीभंगी, जुगारी, भानगडी सराफाच्या मोटारींतून तो हिंडत होता. असलं सावज पकडायला फारशी खटपट करावी लागणार नाहीं हें खरंच होतं. त्यांतूनही केसरनं एकदोनदां आपले मादक डोळे त्याच्यावर रोखले तेव्हां त्याचा गोरामोरा झालेला

चेहरा आणि मनाची चलबिचल तिच्या नजरेंतून सुटली नाहीं.

केसरसारखी जातिवंत अट्टल शिकारी स्त्री हें अचानक सामोरं आलेलं सावज हातांतून थोडंच निसटूं देणार ? ती त्याच्या पाळतीवर राहिली. कांहीं महिन्यांनीं तो तिला बाबूशेठच्या पेढीवर बसलेला आढळला तशी, दागिना मोडायचं निमित्त करून ती त्याला भेटली आणि म्हणाली, "माझ्या गरीबाच्या घरीं एकदां पायधूळ झाडावी. इथं पलिकडल्या बोळांत एक चिंचोळं तिमजली घर आहे ना, तिथें तिसऱ्या मजल्यावर राहतें मी. मग याल ना ?"

रघुनाथ तिची लाघवी नजर चुकवीत म्हणाला होता, "येईन—"

"केव्हां याल ?" केसरनं विचारलं.

रघुनाथानं दागिन्यांची डबी तिच्यापुढें करतांच तिनं ती घेतली आणि क्षण दोन क्षण तिच्या नाजुक, लांबसडक मऊ बोटांचा वेढा त्याच्या हाताभोंवतीं पडला.

"उद्यां येईन" असं रघुनाथानं तिला उत्तर दिलं होतं. परंतु त्याच्या हाताच्या स्पर्शांत तें उत्तर केसरला आधीच कळलं होतं.

रघुनाथ दुसरे दिवशीं केसरकडे गेला होता. आणि नंतरच्या दिवसांत तिच्याकडे जाण्याचं त्याला व्यसनच जडलं होतं. तिच्या चतुर विनोदी बोलण्याचं, मनमोकळ्या हास्याचं, आणि लाडिक लाघवी हावभावांचं त्याला वेड जडलं होतं. तशी ती अशीक्षित होती. पण भुवया उंच करून आणि आपले मोठे काळे डोळे वटारून ती एखाद्या गवयाची, नटाची किंवा समाजांतील प्रतिष्ठिताची टर उडवूं लागली कीं ऐकणारा हसून हसून आडवाच व्हावा. नकला करण्यांत ती मोठी पटाईत होती. नाटका-सिनेमांतल्या आणि गाण्याबजावण्यांतल्या साऱ्या माणसांचे परिचय त्यांच्या नकला करून तिनं रघुनाथाला घडविले होते, आणि एरवीं या आवाजी दुनियेकडे ढुंकूनहि न बघणारा रघुनाथ प्रमुख नटनटींची, दिग्दर्शकांची नांवं घेऊन तिच्याशीं गप्पा करूं लागला होता. तिच्या विनोदी बोलण्यानं मनमुराद हसूं लागला होता, आणि तिच्या संवयीप्रमाणें एखादी कोटी करून तिनं हात पुढें केला कीं त्यावर टाळी देण्यास तो कधीं चुकत नव्हता.

एकदां ती त्याला म्हणाली, "काल एक मोठं गाजलेलं नाटक पाहून आलें."

"कोणतं ? सौभद्र ?" रघुनाथ आतां बराच माहितगार झाला होता.

"होय. संयुक्त नटांचा प्रयोग होता. एकही पात्र साठ वर्षांखालचं नव्हतं. पिकल्या पानांचा प्रयोग असा रंगला म्हणतां रघुनाथ–" इतकं बोलून ती मोठ्यांदा हसली. इतकंच नव्हे तर उठून उभी राहिली, आणि एकेका पात्राची नक्कल करून दाखवूं लागली.

"बरं का रघुनाथ, बळिराम मारे ऐटींत लांबलांब लटपटणारीं पावलं टाकीत आला. त्याच्या गुडघ्याला संधिवाताचीं बॅंडेजं हीं जाडजूड बांधलेलीं ! तसाच आला आणि मोठ्या ऐटींत गदा खांद्यावर टाकता टाकता ओरडला, 'घालीन पृथ्वी पालथी, स्वर्ग आणीन खालतीं –' आणि काय गंमत तो स्वतःच पालथा पडला आणि त्यानं थिएटर अक्षरशः खालतीं आणलं. हंसून हंसून लोक जमीनदोस्त झाले आणि कृष्ण तर काय ! वा वा ! इतका दमा झाला होता त्याला. त्याला निराळ्या तंबोऱ्याच्या साथीची गरजच नव्हती. एकदां तर बोलतान घेण्याऐवजीं, तीन चार आवर्तनं तो खोकत ठसकत होता.. आणि गंमत ही कीं त्या तानेला चिकार टाळी पडली. वन्समोअर दिला लोकांनीं ! आहेत कीं नाहीं आमचे मुरब्बी प्रेक्षक.. आणि सुभद्रा अर्जुनाचा जोडा तर कांहीं विचारूं नका. सुभद्रेचं पोट हें सुटलेलं, आणि वरचेवर लोकांकडे पाठ करून तोंडांतली कवळी तिला सावरावी लागत होती. आणि यति ? लुंगी नेसला होता पण त्यांतून हार्नियाचा पट्टा चक्क दिसत होता ! . . . असा रंगीत प्रयोग पाहून आले. मी पोट धरधरून हंसलें. तुमची फार आठवण झाली मला."

"जसं खरंच वाटेल मला. जायचं नाटकाला दुसऱ्याबरोबर आणि माझी आठवण झाली म्हणायचं."

"मला का हौस आहे दुसऱ्याबरोबर जायची ? पण तुम्हांला तर घराची एवढी ओढ लागलेली असते कीं याद आली कीं अर्धा चहा टाकून घरीं पळतां . . . ."

"आतां पुन्हां परीक्षा घे माझी !"

"बघा हं, मग माघार घ्याल."

"शक्य नाहीं – केसर."

"माझ्या गळ्याशपथ ?"

"तुझ्या गळ्याशपथ." रघुनाथ पुटपुटला आणि त्यानं आपला हात तिच्या गळ्यापासल्या नाजुक खळगीवर ठेवला.

केसरनं त्याच्या डोळ्यांत अगदीं निरखून पाहिलं. तिला हवा होता तो क्षण आला होता. ती हळूच पुढें झाली आणि रघुनाथाच्या थरथरणाऱ्या ओठावर तिनं आपले ओठ टेकले. कितीतरी वेळ ती त्याचा उष्ण श्वास हुंगत राहिली. जणु आपल्या पेटत्या ज्योतीनं ती त्याच्याही तनमनांतली प्रणयाची ज्योत पेटवीत होती. रघुनाथाच्या छातीची धडधड तिला कळली तेव्हां तिनं त्याच्या मानेभोंवतीं हात टाकला आणि त्याचं मस्तक खालीं ओढून त्याच्या कंपित ओठाचं चुंबन ती घेऊं लागली. रघुनाथाचा तिच्या गळ्यापासला हात खालीं सरकला तशी ती एकदम त्याच्यापासून दूर झाली आणि म्हणाली, "अम्मा आली वाटतं."

अम्मा ! अम्मा ! केसर त्या अम्माला एवढी कां भीत होती कुणास ठाऊक ?

एके दिवशीं रघुनाथ जिना चढूं लागला, तो अम्माचं आणि एका मुसलमानाचं खूप भांडण चाललं होतं.

"ए बूढी. अभी के अभी पैसा दे दो. तूने हजार बार वादा किया. पैसा दे दो. नहीं तो हथकडियाँ पहनाकर तुम्हे जेल ले जाऊंगा."

"अबे जा. जेल लेता है...." बुढी अम्मा हातवारे करीत बडबडत होती.

रघुनाथ आंतल्या बाजूला गेला. तो बैठकीच्या खोलींत गेला तो केसर तेथें नव्हती,

"केसर कुठें आहे ?" त्यानं अम्माला विचारलं.

त्या मुसलमानावरची आपली मुलुखमैदान तोफ रघुनाथावर डागून ती ओरडली,

"है जहन्नममें, तुझे क्या ! तेरे लिये तो गाना वाना छोडकर वो बैठी है ना ? अबी देखो पैसा कहाँ से लाऊं ?"

"अम्मा उगीच वाटेल ते नको बडबडू" बाजूच्या खोलींतून केसर

ओरडली. पण तिच्या आवाजावरून ती रडत असावीसं रघुनाथाला वाटलं. रघुनाथ एकदम त्या खोलींत गेला. पाहतो तों पलंगावर पालथी पडून केसर रडत होती. त्यानं तिचं तोंड आपल्याकडे जुलुमानं वळवलं आणि तिचे दोन्ही गाल कुरवाळून विचारलं,

" कां रडतेस ? काय झालं ? सांग ना मला. "

" तुम्हांला नाहीं सांगण्यासारखं. या वेळीं तुम्ही यायला नको होते." केसर मान फिरवून म्हणाली.

" तुझ्या अडचणीच्या वेळीं मी यायचं नाहीं तर कुणी ? केसर इकडे बघ. मी तुझा आहे. तूं अशी रडलेली मला पहावत नाहीं. "

"पण मला हसवायला पैसे पडतात " केसर आणखीच हुंदके देत म्हणाली, " अम्मा काय बोलली ऐकलंत ना ?"

" तुला लागतील तितके पैसे मी देतों. बोल, किती हवेत ?"

" तो चांडाळ दाराशी बसला आहे ना वसुलीसाठीं, त्याला पांचशे दिले पाहिजेत. नाहींतर तो घरांतलीं भांडीं बाहेर काढील – आणि अम्मा मला जिवंत खाईल. "

" मीं करतों सोय.. "

" नको नको...."

" तूं गप्प बैस.. "

" मला नको तुमचे पैसे."

" मी तुझा आहे ना ? होय म्हण. मग माझे पैसे ते तुझे नाहीं का ? वेडी कुठली. " असं म्हणून रघुनाथानें तिचे केस मागें सारले होते आणि तिचं चुंबन घेतलं होतं.

त्या मुसलमानाला पैसे देण्यासाठीं रघुनाथ बाहेर गेला तेव्हां अम्मा केसरच्या खोलींत आली आणि म्हणाली, " शाबास बेटी. तू तो मांसे सवाई निकली. "

यावर केसरनं डोळे मिचकावले आणि ती बुढीला म्हणाली, " मी माझं काम केलं. आतां तुझा तो बनावट सावकार पांचशे रुपये घेऊन पळाला नाहीं म्हणजे मिळवलं. "

" वो कहाँ जाता है " असं बोलून अम्मानं कमरेची चंची काढली, आणि

आरामांत पान खाण्यासाठीं तेथंच तो फतकल घालून बसला.

जळू डसलेली कळत नाहीं पण ती जसं रक्त शोषून घेते तसं केसर अनेक हिकमती, अनेक सोंगंढोंगं रचून रघुनाथाचा पैसा शोषून घेऊं लागली. केसरसारख्या स्त्रिया महत्त्वाकांक्षी असतात. पुरुषांचा नुसता पैसा लुबाडून त्यांचं समाधान होत नाहीं. तर त्याला पुरता गुलाम करून कुत्र्याप्रमाणें त्यानं आपल्या उंबऱ्यांत आडवं पडून रहावं अशी कठोर महत्त्वाकांक्षा त्या बाळगतात.

अर्धा चहा टाकून, अर्धी बैठक सोडून रघुनाथ निघाला कीं केसरच्या अंगाचा भडका उडे. ती त्याला हिणवून म्हणे, "एवढें बायकोला भितां ?"

बरेच वेळां तिचा तो प्रश्न ऐकून रघुनाथ तिला एकदां म्हणाला होता, "केसर मी तुझ्याकडे येतो तो माझ्या काळज्या विसरायला. बायको विसरायला नाहीं. तूं तिचं नांव पुन्हां घेऊं नकोस."

"अस्सं !" असं म्हणून केसर गप्प राहिली होती. परंतु केव्हां ना केव्हां रघुनाथाच्या बायकोचा त्याच्यावरचा हा पगडा मोडून काढण्याचा निश्चय तिनं केला होता. रघुनाथानं बायकोच्या धाकांत राहणं हा एकप्रकारें आपल्या तारुण्याचा आणि सौंदर्याचा अपमानच होय असं तिला वाटत होतं. रघुनाथाचा पैसा लुटून तिचं समाधान होत नव्हतं. त्याला सर्वस्वीं बळकावण्याचाच तिचा घाट होता. प्रथम गोडीगुलाबीनं नंतर हळूहळू कपटानं. आणि जशीं त्या दोघांच्या प्रेमप्रकरणाला कांहीं वर्षं लोटलीं तशी उघड उघड ती आपली इच्छा त्याला बोलून दाखवूं लागली. तिचा अंदाज होता आतां हा मासा चांगलाच गळाला लागला आहे. याला आपलं व्यसन इतकं पक्कं जडलं आहे कीं त्या व्यसनाचे आंकडे त्याच्या अंतःकरणांत खोल रुतून बसले आहेत. वेसणीला हिसका दिला कीं बैल जसा वाकतो तसा याला वाकविणं सोपं आहे. जिच्यापासून तऱ्हतऱ्हेचं सुख तो मनसोक्त लुटत होता, तिच्या तोंडावर पैसे फेकून केवळ एक रखेली म्हणून तो आपल्या उंबऱ्याबाहेरच तिला ठेवत होता. आणि बायको निरुपयोगी झाली तरी केवळ लग्न झाल्यामुळें तिला मानानं इतमानानं वागवीत होता. तिचं पवित्र नांव उच्चारण्याचीही त्यानं तिला बंदी केली होती. या गोष्टीची विलक्षण चीड दिवसेंदिवस केसरच्या मनांत धुमसत पेटत चालली होती.

या नवराबायकोच्या दिखाऊ एकीला सुरूंग लावण्यासाठीं ती संधि शोधत होती.

x x x

जिन्यांत जड पावलांची चाहूल ऐकू येतांच रघुनाथ खिडकीपासून दूर झाला. त्यानं ओळखलं जानकीच वर येत होती. त्याला थोडं आश्चर्य वाटलं. मुलं घरांतून गेल्यापासून ती फारशी कधीं माडीवर फिरकत नसे. खालीं माजघरांतल्या अंधारांत ती कांहीं दुखल्या खुपल्याचं निमित्त सांगून पडून राही किंवा सैपाकघरांत टेकून बसे. जानकीनं जणुं आपल्याभोंवतीं दुःखाची तटबंदी निर्माण केली होती. रघुनाथाच्या पुष्कळदां मनांत येत असें, तिला जवळ घ्यावी, तिच्याशीं प्रेम करावं, त्या दुःखाचा क्षणभर तरी तिला विसर पाडण्यासाठीं तिला बाहेरच्या मोकळ्या हंसऱ्या जगांत न्यावं. परंतु त्याचा हात तिच्या अंगाला लागला कीं तिला रडूं कोसळे. तिचं कोणत्याही प्रकारें सांत्वन करणं त्याच्या शक्तीबाहेर होतं. जवळ जाऊन तिचं दुःख वाढविण्यापेक्षां तिला दुरूनच सोबत करण्याचं धोरण त्यानं ठेवलं होतं.

म्हणून जानकी आपण होऊन माडीवर आलेली पाहातांच त्याला आश्चर्य वाटलं. तो म्हणाला,

"तूं कां आलीस ?"

"म्हणजे मी येऊं नय असं वाटतं ?"

"छे, भलतंच काय ? तुला जिना चढवत नाहीं म्हणून म्हटलं."

"आतांच टपाल देऊन गेला पोस्टमन. त्यांत हें निळं पाकीट दिसलं. म्हटलं वर येऊन तुम्हांला दाखवावं. मला वाटतं हें कुसुमचं पत्र आहे. ती नेहमीं असलीं निळीं पाकिटं वापरीत असे. पहा बघू." जानकी म्हणाली. पण तेवढ्या श्रमानं तिला धाप लागली होती आणि आवाज दाटला होता.

रघुनाथानं तें पाकीट हातांत घेतलं. त्यावरचं अक्षर पाहतांच तो एकदम चपापला. तें केसरचं पत्र होतं. अनेकदां बजावून सुद्धां तिनं घराच्या पत्त्यावर पत्र पाठवावं याचा त्याला भयंकर राग आला. ती गांवाहून परतली कीं याबाबतींत तिची चांगली कानउघाडणी करण्याचं त्यानं ठरविलं. पण ती सारी पुढची गोष्ट होती. आतां ही वेळ कशी निभावून न्यायची या कोड्यांत तो पडला. तें पत्र तर जानकीसमोर फोडण्याशिवाय

त्याला गत्यंतर नव्हतं. पाकिटांतून कागद बाहेर काढल्यावर तो कुसुमचाच असेल या आशेनं जानकी हिसकावून घेतल्याखेरीज राहणार नाहीं हें भय त्याला होतंच.

" बघा तरी, मला अगदीं धीर निघत नाहीं. माझी बाळ पत्र घातल्याखेरीज नाहीं राहायची.." जानकीचे डोळे भरून आले. " बघा ना लवकर."

रघुनाथानं पत्र फोडलं. कागदाची घडी उघडली. आणि त्यानं मायना वाचला, " माझ्या लाडक्या रघुनाथा "....त्याची नजर मजकुरावरून फिरली, " तुमच्याशिवाय मला क्षणभर करमत नाहीं....वाटतं उठावं आणि तुमच्याकडे धांव घ्यावी....माझ्या मनासारखं केव्हां होईल ?.... मला दोनशें रुपये पाठवावे....लाडकी केसर...."

रघुनाथानं तो कागद एकदम चुरगाळला. त्याचं सारं अंग थरथर कापूं लागलं.

" कुसुमचंच ना ? काय लिहिलंय ? कुठें आहे ती ? कशी आहे माझी बाळ. सांगा. द्या ना मला तें पत्र. मी वाचतें " जानकी आतां अगदीं रडत बोलूं लागली. तें पत्र त्याच्या हातांतून काढून घेण्यासाठीं ती त्याच्या हाताला झटूं लागली. आपण पोरीचा अपराध पोटांत घातला तरी रघुनाथ तो कधीं घालणार नाहीं हें भय तिला होतंच.

केसरचं पत्र जानकीनं वाचलं असतं तर तिला भयंकर धक्का बसला असता. तिच्या अशक्त प्रकृतीला तो धक्का सहन झाला नसता. आधींच विस्कटलेल्या संसारांत या नव्या संकटाची वावटळ उठायला नको होती. रघुनाथानं हातांतलं पत्र झटकन् पाठीमागं धरलं आणि दुसऱ्या हातानं जानकीला त्यानं दूर लोटलं.

जानकी कोलमडली आणि खालीं कोसळली. तिचं डोकं जिन्याच्या कठड्याला आपटलं.

रघुनाथ पुढें धांवला. त्यानं तिला उचलल्यासारखं केलं, हाका मारल्या. पण तिनं डोळे उघडले नाहींत. तिचा चेहरा पांढरा फटफटीत पडला होता... रघुनाथ धाडधाड जिना उतरून खालीं आला व तसाच डॉक्टरांकडे धांवला.

डॉक्टर आले. त्यांनीं जानकीला इंजक्शन दिलं. ती सावध झाली तरी निपचित पडून राहिली. भ्रमांत बडबडावं तशी बडबडू लागली, " ढकलू नका.. पत्र दाखवा."

डॉक्टरांनीं एक दीर्घ निःश्वास सोडला. तिचं मस्तक थोपटल्यासारखं करून ते म्हणाले,

" जानकीबाई आतां हें औषध घ्या पाहूं, आणि स्वस्थ पडून रहा. कसला विचार नका करूं."

रघुनाथाकडे दृष्टिक्षेपही न टाकतां त्यांनीं आपली बॅग उचलली आणि ते त्याला तुटकपणानें म्हणाले,

" बायकोच्या तब्बेतीकडे तुम्ही दुर्लक्ष करीत आहांत. प्रकृतीच्या या अवस्थेंत तिला भांडणतंटा किंवा मारहाण सोसणार नाहीं एवढं समजण्याइतकी माणुसकी तुमच्या ठिकाणीं असेल अशी माझी कल्पना होती."

" पण डॉक्टर तसं कांहीं झालं नव्हतं.. "

" हें पहा, त्यांच्या कपाळाला जखम झाली आहे आणि भयंकर मनस्तापानं त्यांना भ्रम झाला आहे. शिवाय तुम्ही बायकोला नीट वागवीत नाहीं हें साऱ्या जगाला ठाऊक आहे. आतां डॉक्टर या नात्यानं तुम्हांला सल्ला देतो. तुम्ही त्यांना ताबडतोब थंड हवेच्या ठिकाणीं, तुमच्यापासून दूर पाठवा.."

डॉक्टर निघून गेले. जानकी उठून हिंडू फिरूं लागली तेव्हां रघुनाथानं तिला म्हटलं,

" बाबूशेठची पंचगणीला बंगली आहे. तिथं हवापालटासाठीं महिनाभर जाऊन रहा. मी सारी व्यवस्था केली आहे."

" म्हणजे सगळं ठरवलंत म्हणायचं." जानकी खिन्नपणें म्हणाली.

" होय. तूं जितकी लवकर जाशील तितकं बरं असं डॉक्टर म्हणाले."

" डॉक्टर म्हणाले ? कीं तुम्ही तुमच्या मनांतलं सांगतां ? माझी आतां तुम्हांला काय गरज ? उलटी माझी अडचणच. ठीक आहे मी जातें."

" जानकी.." रघुनाथ एकदम तिचे हात हातांत घेऊन म्हणाला, " तूं तरी माझ्याविषयीं गैरसमज करून घेऊं नको. माझ्यावर दया कर..तूंच असं बोलूं लागलीस तर मी काय करूं ? कुठें जाऊं ?.."

x x x

'सारं खोटं, सारं ढोंग..' दरीदर्शन बंगल्याच्या बगीच्याच्या कांठाशीं दगडी बांकावर बसलेल्या जानकीच्या तोंडून असे उद्‌गार कितीदां तरी बाहेर पडत. 'तुम्हांला मी पूर्वीप्रमाणें हवीशी वाटत असते तर तुम्ही मला या जंगलांत आणून टाकलं नसतं. माझ्या दुःखांत सहभागी होऊन मला सोबत केली असती. माझं शरीर कितीही खंगलेलं असलं, बेरूप झालं असलं तरी मायेचा हात फिरविला असता. पण तुमचं मन माझ्यापाशीं नाहीं, हें मी ओळखलं आहे. तुम्ही कुणाच्या तरी मोहांत गुंतला आहांत. तुमच्या प्रेमांत मी अडचण झालें आहे. ठीक आहे मी तुम्हांला दोष देत नाहीं. तुमच्यावर माझा राग नाही. दोष सारा माझा आहे. माझं शरीर दुबळं नसतं, आघातानी खचलं नसतं तर माझ्या प्रेमाच्या पाशांत मी तुम्हांला बांधून ठेवलं असतं. पण दुर्दैव माझं. तुमच्या सुखाआड मी येऊं इच्छित नाहीं. आतां माझी अडचण दूर झाली. घर रिकामं निर्वेध झालं, आतां खुशाल एकमेकाशीं रममाण व्हा.."

असल्या विचित्र विचारांनीं जानकी आपल्या मनाला पुनः पुन्हां घायाळ – रक्तबंबाळ करी.

पण तिला कल्पनाही नव्हती कीं ती पंचगणीला गेल्यापासून सबंध आठवड्यांत एकदांही रघुनाथानं केसरची भेट घेतली नव्हती. जानकी ज्या अवस्थेंत पंचगणीला गेली ती अवस्था त्याच्या अंतःकरणाला चटके देत होती. जानकी गेल्यापासून घरांतला घरपणा गेला होता. आयुष्यांतला हा अखेरचा डावही आपण हरलों अशी विलक्षण उदासीनता त्याला वाटूं लागली. दारिद्र्यांत त्याच्या बरोबरीनं खस्ता खाणारी, श्रीमंतींत निःस्वार्थपणें त्याचं हित चिंतणारी, त्याच्या सुखदुःखाची भागीदारीण – प्रेमळ जानकी ज्या विचित्र तऱ्हेनें त्याच्या संसारांतून उठली होती ती तऱ्हा त्याला भयंकर मनस्ताप देऊं लागली. त्या रिकाम्या घरांत त्याला घांस गिळेना. आणि बाहेर जाण्यासाठींही त्याचं पाऊल उचलेना. माडीवरच्या पलंगावर तो तासन्‌तास पडलेला असे.

एके दिवशीं तिन्ही सांजेच्या वेळीं केसर त्याच्यासमोर येऊन उभी राहिली.

तिला पाहून तो धडपडतच पलंगावरून उठला. जानकी घरांत नव्हती ही

देवाची खैर होती. तरी देखील इतकीं वर्षं जिच्याशीं गुप्त संबंध ठेवला त्या स्त्रीनं चक्क त्याच्या घरीं येण्याचं धाडस करावं या गोष्टीचा त्याला धक्का बसला. केसरच्या धमक्या म्हणजे केवळ स्त्रीसुलभ मत्सर असंच तो समजत आला होता. त्या धमक्या ती प्रत्यक्ष कृतींत आणील अशी शक्यता त्याला वाटत नव्हती. त्याच्या पत्त्यावर प्रेमपत्र आणि आतां प्रत्यक्ष त्याच्या घरांत शिरून तिनं आपली धमकी खरी केली होती. त्यानं रागानं तिला विचारलं,

" तूं इथें कां आलीस ? "

" कां ? मला चोरी आहे ? कीं बंदी आहे इथं यायची ? " केसर पलंगाच्या कांठावर बसत म्हणाली.

" या घरांत तू पाऊल टाकता कामा नये, किंवा मला चिठीचपाटी पाठवितां नये अशी सक्त ताकीद मी तुला दिली होती. "

" आता मी आलें. आतां असा काय घात झाला तुमचा ? तुम्ही उगीच बायकोला भिता. लोकांना भिता. रघुनाथ, आठ दिवस मी तुमची वाट पाहिली. पण तुमचं दर्शन नाहीं कीं साधा निरोप नाहीं. असे रागावूं नका. मी तुमची आहे ना ? आणि तुम्ही माझे आहां ना ? मग जगाची पर्वा कशाला ? तुमचा राग कसा घालवावा तें मला माहीत आहे."

असं म्हणून केसर पुढें झाली आणि तिनं आपले हात रघुनाथाच्या गळयांत टाकले. त्याचं मस्तक आपल्या छातीशीं धरलं आणि ती त्याच्या तोंडाशीं आपलं तोंड नेऊन कुजबुजली, " रघुनाथ–"

इतक्यांत धांवत धांवतच एक दाढी वाढविलेला तरुण वर आला. जिन्याच्या तोंडाशीं क्षणभर थांबला. पलंगावर जें घाणेरडं दृश्य त्याला क्षणमात्र दिसलं तें पाहतांच भयंकर संतापानं किळसानं तो थुंकला आणि त्याच पावलीं जिना उतरून खालीं आला.

कुणीसं कुत्सितपणें त्याला विचारलं,

" आई नाहीं भेटली ? "

" आई ! " असा उद्‌गार काढून तो तरुण क्षणभर गहिंवरला. पण मग मुठी वळून दांत ओठ खात म्हणाला, " माझ्या आईला घराबाहेर काढून तो पशू आपल्या रखेलीशीं प्रेमाच्या क्रीडा करीत बसला आहे.. याचा

बदला मी नाहीं घेतला तर माझं नांव आनंद नव्हे.."

रघुनाथानं केसरला जोरांत दूर ढकललं. माडीवर कुणी आल्याची चाहूल लागली म्हणून नव्हे तर केसरच्या स्पर्शाची त्याला किळस आली होती म्हणून. रघुनाथ आपल्याच विचारांत इतका गुरफटला होता, गांजला होता कीं आनंद डोकावून गेल्याचं त्याला कळलं देखील नव्हतं. केसरला दूर ढकलून तो म्हणाला,

" केसर या घरांत, तुझ्या प्रेमाची भूल मला पडणार नाहीं. ही भूल माणसाचा घात करते. त्याला अध:पाताला नेते. पैशाची भूल, विषय-वासनेची भूल, सत्तेची भूल माणसाला बेभान करतें. या राक्षसणीच्या ताब्यांत मी एकदां सापडलो आणि पस्तावलो. पुन्हां नको. तूं जा. इथून चालती हो. एक पत्र पाठविलंस त्यानं माझा घात केला. जानकीची तब्बेत ढासळली. तिला हवेसाठीं पंचगणीला धाडणं मला भाग पडलं. तिच्या मनाला तिळभर दु:ख देण्याचं पाप मी करणार नाहीं..जानकी– "

" बस करा बडबड " केसर नागिणीसारखी उलटून म्हणाली. " त्या नालायक बायकोचं एवढं कौतुक वाटतं तुम्हांला तर मला कशाला नादीं लावलंत ?"

" नादीं लावलं ? तूं तर बोलून चालून बाजारांत बसली होतीस. तुझ्यापासून जें सुख घेतलं त्याचा पैसा मी दुप्पट भरला. आता कां माझा पिच्छा पुरवतेस ? "

" मग तुम्हांला सोडीन असं वाटतं तुम्हांला ? तुमच्या नादीं लागून माझं नुकसान झालं त्याची काय वाट ? एव्हांना मी माझा गाण्याचा धंदा भरभराटीला आणला असता. तुम्ही माझ्या तोंडावर पैसे फेंकून मला हाकलूं पाहतां ? शक्य नाहीं. या घरांतून मी आतां बाहेर पडणार नाहीं. तुमच्या बायकोच्या नाकावर टिचून, उरावर बसून माझी मालकी मला गाजवायची आहे. कुठें आहे ती ? ती इथें नसली तर जिथें असेल तिथं जाऊन मी तिला सांगणार आहे कीं, मी तुझी सवत.."

" केसर..तोंड बंद कर. असा अविचार करूं नको. तूं असं कांहीं करशील तर जानकी जिवंत राहणार नाहीं.. "

"मग मला हवं तेंच होईल.. आतां मी आहे आणि तुमची बायको

आहे..जिला फशी पाडलंत तिची सरशी होईल लक्षांत ठेवा..आतां मला सोक्षमोक्षच करायचा आहे. मी जातें पंचगणीला..''

रघुनाथ तिच्या मागें धांवला. पण ती केव्हांच जिना उतरली आणि नाहींशीं झाली. केसरनं धमकी दिली त्याप्रमाणें भलता अविचार केला तर जानकीची धडगत नाहीं ही एकच भीति त्याच्या अंगाचा थरकांप उडवूं लागली.

'दरीदर्शन' बंगल्याच्या बगीचाच्या कडेला ठेवलेल्या दगडी बांकावर खालच्या विस्तीर्ण दरीकडे पहात नेहमींप्रमाणें जानकी बसली होती; पण आज तिला फार उदास वाटत होतं. आभाळांत काळे ढग दाटले कीं त्याची काळी छाया पृथ्वीवर पडावी त्याप्रमाणें जणुं पुढच्या संकटाची दाट छाया तिच्या अंतःकरणावर पडली होती. तिनं आपली दृष्टि निसर्गाच्या त्या विराट स्वरूपावर लावली होती. परंतु तिच्या दृष्टिसमोर रघुनाथ दिसत होता. तिला त्याची फार आठवण येत होती. पण तिचे डोळे डबडबले म्हणून असो किंवा दरीच्या तळांतून पांढरं शुभ्र धुकं एकदम वर चढूं लागलं म्हणून असो जानकीला रघुनाथाची मूर्ति स्पष्ट दिसेना. त्या पांढऱ्या धुक्यांत ती नाहींशीं झाली.

कां कुणास ठाऊक जानकीनें एकदम मागें वळून पाहिलं, तों बंगल्याच्या फाटकांतून एक पांढरं पातळ नेसलेली नखरेल स्त्री पायऱ्या उतरत तिच्या दिशेनं येत होती..

जानकीची छाती धडधडूं लागली, जिच्या पायीं ती रघुनाथाला पारखी झाली होती ती हीच स्त्री हें तिनं ओळखलं. ती कां आली असावी हेंही जानकीला कळलं. तिच्या हातापायांना कंप सुटला. आतां या स्त्रीला तोंड देण्याऐवजीं खालीं पसरलेल्या अथांग दरींत धुक्याच्या पदरांत तोंड लपवावं असं जानकीला वाटलं आणि ती लटपटणाऱ्या पायांवर उभी राहिली.

# प्रकरण आठवें

मनीं वसे तें स्वप्नीं दिसे म्हणतात. जानकीला वाटलं आपल्याला स्वप्न तर पडत नाहीं ! पुष्कळदां विचारांचा अतिरेक झाला कीं तिच्या मनाची ताणलेली स्प्रिंग एकदम सुटल्या सारखी होई आणि सारं जग गरगर फिरतं आहे, आपण अधांतरीं अंतराळांत फेकल्या गेलों आहों, असा भ्रम तिला होई. तिच्या दृष्टीला निरनिराळ्या आकृति दिसूं लागत. आतां सुद्धां आपल्याला भ्रम तर होत नाहीं, स्वप्न तर पडत नाहीं अशा शंकेनं जानकी गांगरून गोंधळून गेली.

परंतु तिला स्वप्न पडत नव्हतं. ती भ्रमांतही नव्हती. तिच्यासमोरच्या दरींतून झाडाझुडपांच्या फांद्यांतून, कड्याकपारींतून धुक्याचें विरल शुभ्र लोट वर चढत होते. ती ज्या दगडी बांकाचा आधार घेऊन उभी होती त्या दगडाचा थंड स्पर्श तिच्या हाताला कळत होता आणि पलीकडे रस्त्याकडेच्या फाटकांतून आंत शिरून पायऱ्या उतरून तिच्या दिशेनें पावलं टाकणारी, पांढरं पातळ नेसलेली ती नखरेल स्त्री आतां अगदीं तिच्याजवळ, तिच्या समोर येऊन उभी होती – तिला म्हणत होती,

" मला पाहतांक्षणीं तुम्हांला मोठा धक्का बसलेला दिसतो. तुम्ही मला ओळखलं वाटतं ? "

जातां जातां ज्योत मोठी होते, प्राणोत्क्रमणाच्या शेवटच्या क्षणीं देखील प्रतिकाराची लाट साऱ्या शरिरांत उसळते, त्याप्रमाणें केसरचा तो प्रश्न कानीं पडतांच जानकीच्या तनमनांतलं उरलंसुरलं बळ एकत्र झालं. त्या नखरेल स्त्रीला पाहिल्याबरोबर दरीच्या पोटांत आश्रय घेण्याचा पहिला विचार तिच्या अंतःकरणांत उसळत होता. परंतु सुंभ जळला तरी पीळ जसा जळत नाहीं, त्याप्रमाणें हृदयाच्या साऱ्या कोमल भावना ठेंचल्या गेल्या तरी

अभिमानाचा आणि अहंकाराचा पीळ सुटत नाहीं. अंतःकरणाच्या या पिळाच्या जोरावर तर स्त्रीपुरुष दुःखाचे घोट ताठर मानेनं गिळतात, आणि अपमानित, परित्यक्त जीवन बेडर वृत्तीनं जगतात. आपल्या दुर्बळ शरिराचा कंप त्या बाईला दिसूं नये म्हणून जानकी बांकावर बसली, आपले हात घट्ट एकमेकांत गुतवून धरले, केसरकडे थंड दृष्टीनं पहात तिनं म्हटलं,

"मी तुम्हांला ओळखीत नाहीं."

ती स्त्री कुत्सितपणें हसली. जानकीच्या तुसड्या उत्तराला न जुमानता तिच्या शेजारीं बांकावर बसली आणि म्हणाली,

"अस्स? आश्चर्य आहे. मी कोण तें साऱ्या गांवाला माहीत आहे."

"माझा आणि गांवाचा कांहीं संबंध नाहीं."

"पण तुमचा आणि रघुनाथाचा तरी संबंध होता ना?"

"त्याच्याशी तुम्हांला काय करायचं? तुमचा काय संबंध?"

"आतां कसा प्रश्न विचारलात?" असं म्हणून केसर हंसली. तिनं मान किंचित् बाजूला केली आणि पान थुकून ती जानकीला म्हणाली, "रघुनाथाचा आणि माझा काय संबंध हें मीं तुम्हांला सांगायला हवं असं नाहीं. तुमचा आणि त्यांचा लग्नाचा संबंध तर त्यांचा आणि माझा प्रेमाचा संबंध आहे. आज कितीतरी वर्षं हा प्रेमसंबंध आम्ही गुप्त ठेवला होता. पण आतां तसं राहणं आम्हां दोघांनाही शक्य नाहीं. तेव्हां आतां तुम्ही आमच्या मार्गातून दूर व्हावं हें उत्तम!"

"त्यांना लग्नाची बायको आहे हें तुम्हांला नव्हतं ठाऊक?"

"लग्नाच्या बायकोची आठवण पुरुषाला असायला हवी. ती जबाबदारी दुसऱ्याची नव्हे."

"असं कसं बोलतां? स्त्रीचं अंतःकरण कळत नाहीं तुम्हांला स्त्री असून? एखाद्या विवाहित स्त्रीचा संसार मोडायला कांहीं वाटत नाहीं तुम्हाला?"

केसर हसली, आणि तुच्छतेनं म्हणाली, "लग्नाच्या बायकांचे संसार बिनलग्नाच्या बायकांनीं राखण्याचा मक्ता घेतला पाहिजे असं का म्हणायचं आहे तुम्हांला? झाडाला पालवी येणं किंवा झाड वठणं ही निसर्गाची कृपा — अवकृपा. त्याप्रमाणेंच संसार बहरणं किंवा वठणं निसर्गाच्या हातीं

आहे. तुम्ही त्याभोवतीं घराच्या भिंती कितीही मजबूत बांधल्यात, कायद्याची कुंपणं उभारलींत तरी संसारांतली जादू तुम्हांला कैद करून ठेवतां येणार नाहीं. तेव्हां तुम्ही मला उलट सुलट प्रश्न विचारून स्वतःचीच अब्रू घालवून घेऊं नका. रघुनाथावर माझं प्रेम आहे आणि त्याचं माझ्यावर आहे.. ते सर्वस्वी माझे झाले आहेत.. "

" तुमच्या सारख्या हलक्या बाईच्या बोलण्यावर मी विश्वास ठेवूं इच्छित नाहीं. मला एक शब्दही ऐकायचा नाहीं. आलांत तशा चालत्या व्हा. "

" तुमचं उत्तर मिळाल्याशिवाय मीं जाणार नाहीं. "

" मी तुम्हांला उत्तर देणार नाहीं. जेव्हां ते स्वतः मला विचारतील तेव्हां मी त्यांना काय तें सांगेन.. "

" तुम्ही डोळ्यांवर पांघरूण किती दिवस ओढणार ? आणि अशा नवऱ्याच्या जुलुमाच्या रामरामांत तुम्हांला मोठेपणा तो काय वाटतो ? रघुनाथानं बाहेर घालविण्याची तुम्ही वाट पहात आहां काय ? तुमच्या दुराग्रहानं आज ना उद्यां तें कृत्यही त्याच्या हातून घडेल. पण ज्या वेळीं रघुनाथाचं प्रेम माझ्यावर जडलं त्यावेळींच तुम्हांला त्यानं प्रथम आपल्या अंतःकरणांतून बाहेर काढलं. जसजसा तो माझ्या प्रेमांत गुंतला तसतसा तुमचा एकेक पाश तुटत गेला. आणि आतां तर गेली कांहीं वर्षं तुम्ही नवराबायको असून घरांत तिऱ्हाइताप्रमाणें राहता. तुम्ही त्याला कसलंच सुख देऊं शकत नाहीं.

तुम्ही कधीं आरशांत पाहिलंय् कां स्वतःच्या अवताराकडे ? केस पिकलेले, गालफडं बसलेलीं, अंगाचा सांपळा झालेली स्त्री नवऱ्याला कोणतं सुख देऊ शकेल ? तुम्ही रघुनाथाची सर्व बाजूंनीं उपासमार कां करतां ?"

" मी कांहीं त्यांना बांधून ठेवलं नाहीं. ज्याअर्थीं ते स्वतः कधीं एका शब्दानं मला दुखवत नाहीत, त्याअर्थीं तुमचं सारं बोलणं खोटं आहे. नवराबायकोमधलं प्रेम शारीरिक नसतं हें तुमच्या सारख्या बाजारबसवीला कळायचं नाहीं. "

केसर मोठ्यांदा हसली. तिच्या त्या कुत्सित विषारी हास्याला धार असती तर जानकी त्याच्या आघातांनीं घायाळ झाली असती. केसर म्हणाली, " तुम्ही बायका केवढ्या खोट्या भ्रमांत असतां हें पाहिलं कीं

मला हसूं येतं. ठीक. तुमचा माझ्या बोलण्यावर विश्वास नाहीं ? मग ही रघुनाथाच्या हातचीं पत्रं. वाचतां येतं ना ? मग बघा वाचून आणि मगच काय तो निर्णय घ्या. "

केसरनं हातांतल्या पिशवींतून दोन पत्रं काढलीं आणि जानकीच्या पुढ्यांत टाकलीं.

जानकी त्या पत्रांकडे पाहत राहिली. एखाद्या बॉम्बकडे पहावं तसं. ते कागद आपण उचलले आणि वाचले तर एकदम भयंकर मोठा स्फोट होईल आणि आपल्या देहाच्या चिंधड्या उडतील असं भय तिला वाटलं. तिच्या संसाराला, प्रेमाला आग लावणारे ते कागद उचलून घ्यावे, त्याचे राईएवढे तुकडे करून फेंकून द्यावे असाही विचार तिच्या मनांत आला. पण तो किती व्यर्थ होता ! त्याचा कांहीं उपयोग नव्हता. कागद आणि त्यावरचं तिच्या परिचयाचं पण आतां तिच्याशीं फितूर झालेलं रघुनाथाचं हस्ताक्षर नाहींसं करणं सोपं होतं. पण जी भूल रघुनाथाच्या मनाला पडली होती ती नाहींशीं करणं तिच्या 'सामर्थ्यापलिकडचं होतं.

प्राणापलिकडे ज्या पुरुषावर तिनं प्रेम केलं त्या पुरुषानं एका परस्त्रीला लिहिलेल्या प्रेमपत्रांकडे ती पहात राहिली. " लाडके केसर.. तुझ्याशिवाय एक क्षणही कंठणं मला शक्य नाहीं.. घर म्हणजे तुरुंग.. तुझ्या मनासारखा होईल.." रघुनाथाच्या हातानं लिहिलेलीं तीं वाक्यं जानकीच्या दृष्टीला पडत होतीं. आणि जालीम अॅसीडनं पोलादाला देखील घरं पडावीं तशीं जानकीच्या अंत:करणांतल्या भिंतीसारख्या बळकट अहंकाराला घरं पडूं लागलीं. देहांताचा समय आला म्हणजे पृथ्वीवरचे सारे पाश सुटावे, कोसळणाऱ्या वृक्षाची खोल खोल जमिनीत रुतलेलीं मुळं उन्मळावींत तद्वत् जानकीच्या मनाचे सारे आधार तुटूं लागले, ढासळूं लागले.

त्या पत्रांकडे पहात ती विचित्र चिरडलेल्या कारुण्यपूर्ण आवाजांत हंसली.

तिच्या मनांत आलं, एका पुरुषावर प्रेम करणाऱ्या दोन स्त्रियांची भेट जितकी हृदयद्रावक तितकीच हास्यास्पद नव्हे काय ? एका पुरुषाच्या प्रेमाखातर जिवावर उदार होऊन दोन स्त्रिया भांडतात. एका दृष्टीनं दोघीही पराभूत असतात. फसलेल्या असतात. पण एक लग्नाच्या सनद-पत्राच्या जोरावर तर दुसरी प्रेमाच्या भरंवशावर एकमेकीला उखडून टाकूं

पाहतात. आणि पुरुष ? दोघींचं भांडण आणि तिसऱ्याचा फायदा अशी तर म्हणच आहे.

आनंद कुसुमच्या पुस्तकांत दोन भांडणाऱ्या मांजरांचं आणि त्यांच्या खव्याची सारखी वाटणी करून देण्याच्या बतावणीनं त्यांना सर्वस्वी लुबाडणाऱ्या माकडाचं किती गंमतीदार चित्र होतं. अखेर दोन्ही मांजरांचा खवा लाटणाऱ्या त्या माकडांत आणि दोन्ही स्त्रियांना झुलत ठेवणाऱ्या मतलबी पुरुषांत काय अंतर ?

जानकी खिन्नपणें हसली. सारं सारं व्यर्थ होतं. तिच्या प्रकृतीची चौकशी करण्याच्या निमित्तानं रघुनाथ आदल्याच दिवशीं तिच्याकडे आला होता. वरकरणी त्यानं तिच्याबद्दल केवढं अगत्य दाखविलं होतं. प्रेमाची केवळ बतावणी केली होती. बायकोच्या प्रकृतीची चौकशी करण्यासाठीं म्हणून तो आला होता. पण त्यानं बरोबर आपली प्रियकरीण आणली होतीच. म्हणूनच त्याचं लक्ष बाहेर होतं. म्हणूनच त्याचा पाय घरांत ठरत नव्हता. आजारी बायको घरांत टाकून बाहेर या प्रियकरणीच्या गांठीभेठी त्याला घ्यायच्या होत्या ना ! पण हा दोन दगडीवर हात ठेवण्याचा खेळ कधीं ना कधीं पुरुषाच्या अंगाशीं येतोच. बिचारा रघुनाथ !

जानकीच्या अंतःकरणांत 'बिचारा रघुनाथ' या शब्दासरशी केवढी मोठी कालवाकालव झाली. रघुनाथाविषयींचं सारं सारं प्रेम तिच्या देहांत आणि मनांत उचंबळून आलं. शक्य असतं तर लहान मुलाला तिच्या आनंदाला, कुसुमला पोटाशीं घेऊन, कुरवाळून ती जशी समजूत काढीत असे तशी रघुनाथाला उराशी कवटाळून तिनं त्याची समजूत काढली असती. पण आपल्या प्रेमांत तें सामर्थ्य नाहीं हें जानकीनं ओळखलं. अरण्यांत आग भडकली कीं नद्या देखील आटून जातात. मग जानकीच्या डोळ्यांतून वाहणाऱ्या अश्रूंच्या सरींनीं रघुनाथाच्या अंतःकरणांत भडकलेली सर्वभक्षक भूल कशी विझणार ? त्यापेक्षां तिनं स्वतःच दूर होणं – नाहींसं होणं भाग होतं. "ठीक आहे. जशी तुमची इच्छा." जानकी मनाशींच म्हणाली, आणि पुन्हां एकदां हसली.

जानकी बांकावरून उठली आणि बंगलीकडे जातां जातां केसरला म्हणाली,

"ठीक आहे. मी रघुनाथाला सांगन."

"काय सांगाल."

"कीं, तुम्ही दोघं सुखानं रहा."

"केव्हां ?"

"आत्तांच. थोडया वेळानं ते फिरून घरीं परत येतील. मग लगेच त्यांना मी सांगेन."

"म्हणजे ? रघुनाथ इथें केव्हां आले ?"

"आतां ही लपवाछपवी कशाला ? मला सगळं ठाऊक आहे. म्हणून तुमच्या चोरटेपणाचं कारणच मी नाहींसं करणार आहे.. तुमच्या प्रेमाचा मार्ग मोकळा करणार आहे.."

केसर आ वासून जानकीच्या पाठमोऱ्या आकृतीकडे पहातच राहिली. रघुनाथ पंचगणीला तिच्या आधीं आला असेल याची तिला कल्पना नव्हती. "तुमच्या सर्वस्वाची मालकीण मला केली नाहींत तर तुमच्या बायको-जवळ साऱ्या गोष्टीचा स्फोट करीन" अशी धमकी तिनं रघुनाथाला दिली होती. "जानकीची प्रकृति चिंताजनक असल्यानें यावेळीं तिला कांहीं कळतां कामा नये" असं रघुनाथानं तिला पुन: पुन्हां बजावलं होतं. तरी देखील चांदमल शेटजींची मोटार महाबळेश्वरला निघाली तशी तीही मोटारींतून निघाली होती. ड्रायव्हरनं हॉटेलापाशीं मोटार थांबवली तेव्हां ती त्याला म्हणाली होती, "मी एका ठिकाणी जाऊन येते तासाभरांत." दरीदर्शन बंगल्यांत शिरतांच बगीचाच्या शेंवटीं बांकावर बसलेली एक कृश स्त्री तिला दिसली होती आणि प्रथम तिला धक्का बसला होता. चांदमलच्या दुकानांत प्रथम जिला तिनं पाहिलं होतं ती जानकी कुणीकडे आणि कुणीकडे हा दीनवाणा हाडांचा सांपळा. पण जानकी एकटी बसलेली होती. तेव्हां मनांत सांचलेली मत्सराची आग तिच्यावर पांखडण्यास ही संधि उत्तम होती.

परंतु रघुनाथ तेथें होता ही बातमी जानकीच्या तोंडून ऐकतांच केसर चमकली. हतबुद्ध होऊन उभी राहिली.

कांहीं मिनिटांनीं जानकी परत आली, आणि बांकावर बसली. केसरला उभी पाहून ती म्हणाली,

"तुम्ही जा. रघुनाथाला माझं उत्तर मिळेल. पण आतां निदान या शेवटल्या क्षणीं मला इथं एकटीला बसूं द्या."

जानकीच्या त्या संदिग्ध बोलण्याचा अर्थ प्रथम केसरच्या लक्षांत आला नाहीं. पण तिनं जानकीच्या पांढऱ्या फटफटीत चेहऱ्याकडे, आणि तळमळणाऱ्या देहाकडे नजर टाकली मात्र. कांहींतरी भयंकर प्रकार आहे हें तिनं ताडलं. भयानं तिची बोबडीच वळली.

"म्हणजे ? तुम्ही भलतं काय बोलतां ? कांहीं घातपात तर केला नाहींत ? बोला.." केसर म्हणाली.

जानकीनं आपले ओठ पिळवटले. दांत करकरा एकमेकांवर घासले आणि दोन्ही हातांच्या बोटांनीं ती बांकाचा थंड दगड कवटाळूं लागली..

"काय केलंत ? काय होतंय् तुम्हांला ?" असं म्हणत केसर तिच्याकडे धांवली.

त्यासरशीं जानकी ताडकन् उठली, आणि म्हणाली, "मला एकटीला मरूं द्या. मी विष खाल्लं आहे. आतां कुणी मला वांचवूं नका. माझ्या बाळांचं— आनंद कुसुमचं नांव घेत मला प्राण सोडूं द्या.."

जानकी एकदम धडपडली. तिचा तोल गेला. तिला सांवरण्यासाठीं केसरनं पुढें झेप टाकली. केसरची मिठी चुकविण्यासाठीं जानकी वेड्यासारखी, आंधळ्यासारखी वांकडी तिकडी धांवली. तोल जाऊन कोसळली ती दरीच्या तोंडावरून घसरत खालच्या धुक्याच्या समुद्रांत गडप झाली !

केसरची झेप चुकली आणि ती घसरणीवर पालथी पडली. तिचे गुडघे कोपरं खरचटलीं. तिच्या हातांत जानकीच्या पदराचं फक्त टोक सांपडलं. पण जुन्या पातळाचा तो पदर फाटून तिच्या हातांत एक चिंधी उरली ! खालीं दरीत धुकं दाटलेलं होतं. त्या धुक्याच्या समुद्रांत डोकावून पाहण्याचा धीर केसरला होईना. जानकीचा देह खालच्या दगडधोंड्यावर आपटून छिन्नविछिन्न झालेला पाहण्याचा धीर तिला होत नव्हता. "देवा काय झालें हें ?" असं केसर विव्हळूं लागली. दरीच्या कांठावर पालथं पडलेलं आपलं शरीर आवरण्याचा, मागें सरकून उभं राहण्याचा प्रयत्नही तिला करवेना.

अखेर ती उभी राहिली तेव्हां तिचे हातपाय लटपटत होते, आणि सारं

अंग घामानं डंवरलं होतं. तिला वाटलं ओरडावं आणि रघुनाथाला हांक मारावी.

पण दुसऱ्याच क्षणीं तिच्या डोक्यांत लख्ख प्रकाश पडला, कीं ओरडणं, कुणालाही मदतीला बोलावणं म्हणजे आपल्याच पायावर धोंडा पाडून घेण्यापैकीं आहे. जानकीनं वीष खाल्लं होतं. आणि अपघातानं कां होईना ती दरींत कोसळली होती. पण हें सत्य जगाला तिनं कितीही ओरडून सांगितलं असतं तरी तें खरं वाटलं नसतं. प्रत्यक्ष रघुनाथालाही तें खरं वाटलं नसतं. कारण जानकीचे आणि तिचे संबंधच असे होते की केसरनं तिचा द्वेष करावा. तिचं मरण चिंतावं. आतां या भयंकर प्रकारानंतर जानकीच्या भेटीची वाच्यता कुठेही, कुणाजवळही करतां कामा नये. अमूक वेळीं, अमूक ठिकाणीं एकांतांत जानकीची व आपली बोलाचाली झाली ही बातमी बाहेर फुटली तर जानकीवर विषप्रयोग करून, तो झांकण्याकरितां त्या दुबळ्या रोगी स्त्रीला कड्यावरून ढकलून दिल्याचा आरोप आपल्यावर येईल, आणि आपला निरपराधीपणा आपण सिद्ध करूं शकणार नाहीं, हें सर्व तिला कळलं. या पेंचांतून सुटण्याचा एकच मार्ग केसरपुढें होता. तो म्हणजे त्या ठिकाणाहून गुपचूप नाहींसं होणं, आणि रस्ता सुधारणं !

केसरनं आजूबाजूला पाहिलं. तिन्हीसांजा झाल्या होत्या. गारठा वाढला होता. हवेंत धुक्याचा धूर दाटत चालला होता. माळ्याच्या खोपटांत तेवढा मिणमिण दिवा दिसत होता. केसरनं डोक्यावरचा पदर खालीं ओढला आणि झपझप पावलं टाकीत ती तेथून नाहींशीं झाली.

परंतु कांहीं दिवस लोटले नाहींत तोंच जानकी-खून खटल्यांत सरकारच्या बाजूचा एक महत्वाचा साक्षीदार म्हणून केसरला कोर्टांत हजर रहावं लागलं. जानकी-खून खटला कोर्टांत चालू असतांना त्याचीं चटकदार वर्णनं छापतांना मध्यभागीं केसरचा फोटो छापण्याचं धंदेवाईक चातुर्य वृत्तपत्रांचे संपादक दाखवीत असत, आणि " जिच्या प्रेमासाठीं रघुनाथानें आपल्या निष्पाप धर्मपत्नीची भीषण हत्या केली तो ही केसर ! " असा मजकूरही ते त्या फोटोखालीं छापत असत.

जानकी-खून खटल्याची सारी हकिगत आतां साऱ्या साक्षर निरक्षर

स्त्रीपुरुषांना, पोरासोरांना तोंडपाठ झाली होती. सैपाकघरांत, शाळा कॉलेजांत, क्लबांत, मंडळांत, कचेऱ्यांत हा खूनखटला मोठ्या चर्चेचा विषय होऊन बसला होता.

'पंचगणी येथें दरीदर्शन बंगल्यांत एका स्त्रीचा दरीखालीं कोसळून मृत्यू!' या वर्तमानपत्रांतल्या जाड टाइपांत छापलेल्या मथळ्यानें पुष्कळांचं लक्ष वेधून घेतलं होतं. पण नंतर दोन चार दिवसांत, त्याहूनही मोठ्या टाइपांत 'रघुनाथ चित्रे यांस बायकोचा खून केल्याबद्दल अटक' असा मथळा देऊन साऱ्या वर्तमानपत्रांनीं जी हकिगत छापली ती वाचतांच साऱ्या गांवांत एकच खळबळ उडून गेली. जानकी – खून – खटल्याच्या हकीगती छापून येत त्या वाचण्यासाठीं लोक एवढे उतावीळ असत कीं कांहीं वृत्तपत्रांना जादा एडिशन काढावी लागे. आणि खटला ऐकण्यासाठीं तर कोर्टांत खेचाखेच उडून जाई.

पंचगणीला 'दरी–दर्शन' बंगल्यांत एके दिवशीं कातरवेळीं जो प्रकार घडला तो दहापंधरा ओळींत सांगता आला असता.

'दरीदर्शन' बंगल्याच्या पिछाडीच्या कड्याखालीं एक स्त्री घायाळ अवस्थेंत झाडाझुडपांच्या जाळींत पडलेली कातकऱ्यांना आढळली. मधांच्या पोवळ्यांच्या शोधांत ते हिंडत असतांना त्यांना स्त्रीचं कण्हणं ऐकूं आलं. त्यांनीं घोंगड्याची खोळ करून त्या स्त्रीला दरीदर्शन बंगल्याच्या व्हरांड्यांत आणली. हां हां म्हणतां गर्दी जमली. डॉक्टर आले, पोलीसही आले. आणि झोपेंतून उठलेला, या अचानक संकटानं बावरलेला, रघुनाथ "जानकी जानकी ?" अशा हांका मारीत तिच्याजवळ बसला.

जानकी सावध होऊं लागलेली दिसतांच डॉक्टर पुढें सरकले, पोलिस-अधिकारीहि तिच्या खाटेजवळ येऊन उभे राहिले. "जानकी, एक शब्द तरी माझ्याशीं बोल" असं रघुनाथ वाकून म्हणाला. रघुनाथाकडे टक लावून पहात ती क्षीण परंतु स्पष्ट आवाजांत म्हणाली, "वीष..वीष.."

पण अर्धवट बोलूनच ती थांबली. तिच्या तोंडांत रक्ताची गुळणी आली. त्या गुळणीनं तिची उशी लालभडक झाली. डॉक्टर एकदम खालीं वाकले. पण मग लगेच म्हणाले, "संपला कारभार"

संपला खरा! पण जानकी पुरता!

पोलीस अधिकाऱ्यांनीं रघुनाथाचा खांदा हालवून विचारलं, "त्या मरतेवेळीं काय बोलल्या ऐकलंत ना? त्याची आम्ही नोंद करून घेतली आहे. चला आंतल्या खोलींत आणि काय प्रकार घडला तें सांगा."

डॉक्टरांच्या हातांतून सारा ताबा पोलीसांनीं घेतला होता. उत्तरीय तपासणींत जानकीच्या पोटांत वीष आढळलं होतं. विषप्रयोगानं खून करून कडेलोट केल्याच्या आरोपावरून रघुनाथाला अटक झाली होती.

जानकी–खून खटल्याला अशी सुरवात झाली होती. 'खून' ह्या एका शब्दानं समाजांत आणि न्यायालयांत केवढं वादळ उत्पन्न होतं! सरकारी वकिलानं 'खून' या शब्दाच्या आधारानं रघुनाथाभोंवतीं फासाचं जाळं उभारण्याचा आटोकाट प्रयत्न चालविला होता.

खुनाच्या त्या संध्याकाळीं रघुनाथ घरींच होता अशी साक्ष देणाऱ्या रणछोड दुभाष नांवाच्या शेजारच्या बंगल्यांत राहणाऱ्या एका गृहस्थानं साक्ष देतांना कोर्टांत शपथेवर सांगितलं होतं, "मी फिरायला येतां कां असं रघुनाथाला विचारायला गेलों तेव्हां रघुनाथाच्या हातांत औषधाची बाटली आणि ग्लास होता."

'दरीदर्शन' बंगल्याच्या माळ्यानं साक्षीदाराच्या पिंजऱ्यांत उभं राहून सांगितलं कीं रघुनाथ फिरायला न जातां, त्या संध्याकाळीं जानकीसह बगीचांतल्या बांकाकडे जातांना त्यानं प्रत्यक्ष डोळ्यांनीं पाहिलं होतं. तासाभरानं तो बाजारांतून आपल्या खोपटाकडे परतला तेव्हां धुकं असलं तरी दोन व्यक्ति बांकावर बसलेल्या त्याला दिसल्या. इतकंच नव्हें तर त्या दोन व्यक्तीमधलं भांडणही त्याला ऐकूं आलं. नवराबायकोच्या भांडणांत कशाला लक्ष द्या अशा विचारानं तो खोपटांत शिरला होता..

पण सर्वांत साक्षी गाजल्या त्या आनंद आणि केसरच्या. या दोन महत्त्वाच्या साक्षीदारांना हजर करण्यांत सरकारी वकिलानं लढाई जिंकलीच होती.

या दोन साक्षीदारांच्या साक्षी चालूं असतां सेशन्स कोर्टांत प्रेक्षकांची गर्दी अलोट होई. खुनी रघुनाथाचा त्यागी तपस्वी मुलगा, आणि जिच्यासाठीं रघुनाथानं बायकोची अमानुष हत्या केली ती रंगेल, नखरेल केसर पाहण्यासाठीं, रघुनाथाच्या अपत्य द्वेषाचा, अणि विषयलोलुपतेचा

इतिहास ऐकण्यासाठीं त्या अलोट गर्दीचा उतावळेपणा अमर्याद होता. वर्तमानपत्रांचे बातमीदार घाईघाईनं कागदावर खरडीत तर कधीं केसरवर कॅमेऱ्याच्या बल्बचा लखकन् उजेड पाडीत होते. प्रेक्षकांतले बहुतेकजण करमणुकीसाठीं आले होते. तर कांहीं कायद्याचे अभ्यासू खटल्याचं काम लक्षपूर्वक ऐकत होते. पण उलटसुलट शंकाकुशंकांची कुजबुज प्रेक्षकांत चालू होती. पब्लिक प्रॉसिक्यूटरची तपासणी म्हणजे उंदीर मांजराचा खेळ. कधीं गोडीगुलाबीनें तर कधीं तडाखा मारून हवी तशी साक्ष वदवून घेण्याचं असामान्य सामर्थ्य त्याच्या वाणींत होतं आणि त्याचे हिरवट घारे डोळे तर सापाच्या डोळ्यासारखे भिवविणारे होते.

केसर साक्षीदाराच्या पिंजऱ्यांत उभी राहिली तेव्हां पब्लिक प्रॉसिक्यूटरनं आपले विषारी घारे डोळे रघुनाथाच्या चेहऱ्यावर रोखले. जिच्या प्रेमाखातर त्याच्या हातून बायकोची हत्या घडली होती तिच्या दर्शनानं रघुनाथाच्या चेहऱ्यावर कांहीं ना कांहीं चलबिचल दिसेल अशी त्याची अपेक्षा होती.

पण रघुनाथाचा चेहरा थंड निर्विकार होता. रघुनाथाचा तो मुखवटा फोडण्यासाठीं पब्लिक प्रॉसिक्यूटरनं त्याच्या आणि केसरच्या प्रेमसंबंधाचं नागडं उघडं लाजिरवाणं स्वरूप लोकांपुढें, ज्यूरीपुढें, आणि न्यायमूर्तीपुढें भडक किळसवाण्या रंगांत उभं केलं. जीं केवळ एकांतांत एकट्यानींच वाचावीं तीं प्रेमाच्या उत्कट उन्मादक भाषेंत लिहिलेलीं रघुनाथाचीं पत्रं जाहीररित्या वाचून दाखविलीं –

" लाडके केसर–तुझ्याशिवाय रात्र तळमळत काढतों. कधीं तुझी भेट होईल ? कधीं मी तुला माझ्या मिठींत घेईन ? कधीं तुझ्या ओठांचीं पुन्हां पुन्हां चुंबनं घेईन ! .."

" लाडक्या प्राणा–रागावूं नको. लवकरच तुझ्या मनासारखं होईल आणि आपण एकत्र येऊं.. तुझ्या प्रेमासाठीं मी काय करणार नाहीं ?.. "

तीं पत्रं – त्यांतला तो तरुणाला लाजविणारा मजकूर कानीं पडत असतां आरोपींच्या पिंजऱ्यांत बसलेल्या रघुनाथाच्या चेहऱ्यावर कोणताच भाव दिसत नव्हता. पण कठीण बर्फाखालीं पाण्याचे प्रवाह उचंबळतात तसे विचार त्याच्या अंतःकरणांत उसळत होते. त्याच्या मनांत येत होतं, केसरला प्रेमपत्रं लिहिणारा, तिच्या आलिंगन–चुंबनासाठीं तळमळणारा तो रघुनाथ

आपण नव्हे ! तो रघुनाथ कोण तें कळूं नये, त्याची ओळखही लागूं नये इतकें आपण बदललों आहों ! प्रेम, वासना, हे शब्द फुटलेल्या फुग्यासारखे निरर्थक वाटावे, या केसरकडे पाहिल्यावर भावनेचा एकही तरंग अंत:करणावर उठूं नये असे आपण बदललों आहों– गोठून गेलों आहों !

पब्लिक प्रॉसिक्यूटर केसरला प्रश्न विचारीत होता,

"खुनाच्या दिवशीं तुम्ही कुठें होतां ?"

"महाबळेश्वरला, माझ्या सेठकडे."

"कोण तुमचे सेठ ?"

"गुलाबचंद."

"रघुनाथाला हे पसंत होतं काय ?"

"नाहीं."

"त्यावरून तुमचीं भांडणं होत होतीं ?"

"होय. मी दुसऱ्या पुरुषाशीं संबंध ठेवणं त्यांना पसंत नव्हतं."

"मग तुम्ही काय उत्तर दिलंत."

"माझ्याशीं लग्न करा. मग मी एकनिष्ठ राहीन असं सांगितलं."

"रघुनाथ लग्नाला कबूल झाला ?"

"ते म्हणत, थोडं थांब."

"मी म्हणे, मीं थांबणार नाहीं. कशासाठीं थांबायचं ? ते म्हणत बायको जिवंत असे तों लग्न करणं शक्य नाहीं."

"मग बायको मरण्याची तुम्ही दोघं वाट पहात होतां ?"

"तसं नाहीं. तें म्हणत कांहींतरी घडेल.."

"कांहींतरी म्हणजे काय ? बोला. लवकर बोला."

यावर केसर घुटमळली. भिऊन रडूं लागली.

रघुनाथाचा चेहरा निर्विकारच राहिला. आणि त्याची नजर जमिनीला खिळलेलीच राहिली.

आनंद साक्षीदाराच्या पिंजऱ्यांत आलेला पाहतांच मात्र रघुनाथाच्या चेहऱ्यावरचा मुखवटा एकदम वितळूं लागला. त्याचा चेहरा गोरामोरा झाला. त्याचा हात डाव्या कानाच्या पाळीशीं चाळा करूं लागला, आणि त्याची भुकेलेली नजर आनंदाच्या दृष्टीभेटीसाठीं व्याकूळ झाली. पण आनंद

बापाकडे पाहणं जणुं महापापच समजत होता. पब्लिक प्रॉसिक्यूटरच्या प्रश्नाला उत्तर देतांना त्याच्या आवाजांत तुच्छता होती, तिटकारा होता.

"तुमच्या वडिलांविषयीं तुम्हांला काय वाटतं ?"

"असल्या माणसाच्या पोटीं जन्माला आल्याबद्दल लाज वाटते !"

"तुमच्या आईला ते मारहाण करीत असत ?"

"होय, एकदोनदां तसले प्रकार मीं पाहिले."

"तुम्ही प्रतिकार कां नाहीं केला ?"

"आईच्या शब्दासाठीं. तिनं परवानगी दिली असती तर असल्या जुलुमी कृतध्न पित्याची सत्ता मी उलथून टाकली असती. पण प्रेम माणसाला दुबळं करतं, म्हणून ती नेहमीं वडिलांना नमून राहिली. आणि मलाही तिनं प्रतिकार करूं दिला नाहीं."

"तुम्ही वडिलांचे पैसे वापरले म्हणून त्यांनीं तुम्हांला घराबाहेर काढलं काय ?"

"नाही. मला पैशाची जरूरी आणि फिकीर केव्हांच वाटली नव्हती. चैनींत पैसा उडविण्याऐव ीं मी तो सत्कारणीं लावला, एवढंच."

"तुम्ही घर कां सोडलं ?"

"जेथें माझ्या गुरुजींचा अपमान केला गेला तेथें मी अन्नग्रहणही करणं शक्य नाहीं म्हणून !"

"एकदां रखेलीला घरांत आणून तिच्याशीं प्रेमचाळे करीत असतांना वडील तुमच्या दृष्टीस पडले होते काय ?"

"होय, माझ्या आईला हवापालटाच्या निमित्तानं त्यांनीं घराबाहेर काढून रखेलीला घरांत आणली, तेव्हांच माझ्या मनांत शंका आली, कीं माझ्या आईचा जीव सुरक्षित नाहीं. विषयवासनेच्या आहारीं गेलेला हा दगाबाज माणूस तिचा प्राण घेण्यासही मागेपुढें पाहणार नाहीं असं मला वाटलं."

"आतां तुम्हांला काय वाटतं ?"

"कीं या कृतघ्न माणसानं माझ्या आईचा आपल्या सुखासाठीं बळी दिला. हा माझा बाप नाहीं विषारी साप आहे. सापाहूनही कृतघ्न. माझ्या आईनं याला प्रेमाचं अमृतच सदा पाजलं. पण यानं तिला उलट वीष पाजलं.."

"'आनंद–! आनंद–!"

अशी विचित्र करुण आवाजांतली हांक रघुनाथाच्या तोंडांतून बाहेर पडली. एखाद्या घायाळ जनावरानं टाहो फोडावा तशी ती हांक कोर्टांतल्या साऱ्या स्त्रीपुरुषांच्या, वकीलांच्या, न्यायमूर्तींच्या कानांत शिरली. सारं कोर्ट चपापून एकदम स्तब्ध झालं आणि साऱ्यांच्या नजरा रघुनाथाकडे वळल्या.

जिव्हारीं घाव बसावा तसा रघुनाथ वांकला होता. त्याच्या दोन्ही बाजूंनीं उभ्या राहिलेल्या शिपायांनीं त्याच्या काखोटीला हात घालून त्याला उचललं होतं, म्हणूनच तो अर्धवट उभा होता....फणफणणाऱ्या जखमेवर पुनः पुन्हां डागण्या द्याव्या तसा तीव्र वेदनांनीं त्याचा चेहरा काळवंडला होता. पिवळटला होता.

"ऑबजेक्शन" असं ओरडत रघुनाथाचा वकील उठून उभा राहिला. असल्या साक्षीनं आपल्या अशीलाच्या बचावाला धोका येतो, सबब ही साक्ष बाद करावी असा त्यानं आग्रह धरला. पब्लिक प्रॉसिक्यूटरची आणि त्याची चांगलीच जुपली.

अखेर न्यायमूर्तीनीं आपली हातोडी टेबलावर वाजवली, आणि आरोपीची प्रकृति बिघडल्यामुळें खटल्याचं काम तात्पुरतं तहकूब केलं.

कोर्टातून शिपायांनीं रघुनाथाला जवळ जवळ उचलूनच लोखंडी जाळीच्या मोटारीतून तुरुंगांत त्याच्या कोठडींत आणून ठेवलें. खटल्याचा एकेक दिवस संपत होता. परंतु आनंदाच्या साक्षीनंतर रघुनाथाचा सारा संयम, सारा धीर डगमगला होता.

तो करायला गेला काय आणि झालं होतं काय? एका पापाला एवढीं जहरीं कडू फळं येत असतील कां? एका चुकीचं प्रायश्चित्त असं अनेक रूपांनी भोगावं लागावं हा कोणता न्याय म्हणायचा? कुसुमचा कलंकित शेवट आणि आनंदानं केलेला त्याच्या सद्हेतूचा व मायेचा भेसूर भयंकर विपर्यास आणि जानकीचा रहस्यमय मृत्यू यापलिकडे अधिक भयंकर शिक्षा कोणती असेल काय?..

असल्या विचारांनीं मनाची, देहाची आग होऊं लागली कीं रघुनाथ कोठडींत डिवचलेल्या वाघासारख्या फेऱ्या घालूं लागे. खडबडीत फरशीवर रात्र न् रात्र तळमळून काढी. कोर्टांतलं खटल्याचं काम संपवून परत आल्यावर त्याच्या घायाळ मनाला विश्रांति कुठें होती? हा खटला म्हणजे

जणुं कधीं न संपणारा असा रखरखीत वाळवंटांतला प्रवास होता. डोक्यावर उन्हाचा ताप, पायांना बसणारे तापलेल्या वाळूचे चटके अणि तोंडाची कोरड प्रवास संपेपर्यंत चालूच रहायची ! हा प्रवास कधीं संपणार? कुठं संपणार ? आशेचं मृगजळ दिसलं तरी तें क्षणभर. वाळवंटातल्या कधीं न भेटणाऱ्या क्षितिजाप्रमाणें यमलोकीच्या वैतरणेचा किनारा अशी हुलकावणी कां बरं दाखवतो ? असं जिवंत बुडण्यापेक्षां मरून तरणं हाच मोक्ष ! ..

पण प्रवासी थकलाभागला तरी त्याची पायपीट चालूंच रहावी तसं रघुनाथ आतां मोडकळीला आला होता तरी खटल्याचं काम एकेका दिवसानं पुढं चाललं होतं..

" लवकरच तुझ्या मनासारखं होईल असं तुम्ही तुमच्या रखेलीला अश्वासन देत होतां याचा अर्थ काय ? " पब्लिक प्रॉसिक्यूटरनीं त्याला प्रश्न केला.

" अर्थ ? " रघुनाथ गोंधळून म्हणाला.

प्रेमाच्या भरांत माणसं एकमेकांना जीं आश्वासनं देतात तीं खोल विचारानं थोडींच देतात ? बालहट्ट दूर करण्यासाठीं आपण बोलून जातो, 'बाळा मी तुला खराखरा हत्ती देईन हं.' स्त्रीहट्ट घालविण्यासाठीं 'तुझ्या मनासारखं होईल.' या प्रियकराच्या आश्वासनांत तेवढाच सत्याभास असतो.

" मी विचारलेल्या प्रश्नाचं चटकन् उत्तर द्या ! " पब्लिक प्रॉसिक्यूटर गरजला. " मनासारखं याचा अर्थ काय ? "

" त्याचा काय अर्थ ? "

" मला काय विचारतां ? तुम्ही सांगा. "

" पण त्यांत तसा कांहीं अर्थ नव्हता. "

" तसा म्हणजे कसा ? स्पष्ट बोला. रखेलीच्या प्रेमाखातर तुम्ही तुमच्या बायकोचा खून केला आहे. प्रश्न टाळतां येणार नाहीं तुम्हांला. बोला."

" म्हणजे लवकरच आपण एकत्र येऊं. "

" एका पत्रांत तुम्ही 'कांहींतरी घडेल' असं लिहिलंय्. घडेल म्हणजे काय घडेल ? "

" म..मा..मा —तसा. "

" तत–पप करूं नका. काय घडणार होतं ? आणि जें घडेल असं आश्वासन तुम्ही रखेलीला देत होतां तें तुम्हीच घडवणार होता काय ? " पब्लिक प्रॉसिक्यूटरनीं ओरडून विचारलं.

" ऑबजेक्शन " रघुनाथाच्या वकीलानं प्रॉसिक्यूटरच्या या भडिमाराला हरकत घेतली होती.

नेहमींच्या व्यवहारांत साध्या दिसणाऱ्या गोष्टी, सहज बोललेले शब्द, पिरगळून, मुरडून, त्याचा विपर्यास करण्याचा सरकारी वकिलाचा खटाटोप अन्यायाचा होता. सत्य जर वज्रासारखं कठोर आहे म्हणतात तर अशा वकीलांच्या हातांत तें इतकं मऊ व्हावं ना कीं त्यानं त्याला वाटेल तो आकार द्यावा !

खुनाचा आरोपी म्हणजे पुराव्याच्या जंगलांत चुकलेला जणुं ससाच. त्याची ससेहोलपट करण्यांत, त्याच्या वर्मांचे लचके तोडण्यांत क्रूर शिकारी कुत्र्यांनाही पब्लिक प्रॉसिक्यूटर हार गेला नसता. बिचारा ससा एका गोळींत ठार होतो. परंतु मांजरानं उंदराला खेळवावं तसं आरोपीला खेळविण्याची, रक्तबंबाळ करण्याची पब्लिक प्रॉसिक्यूटरला संवय असते.

आणि शिकारीचा हा खेळ पाहण्यास सुशिक्षित स्त्री-पुरुष कोर्टांत गर्दी करतात. वर्तमानपत्रांत या खेळाचीं रसभरित वर्णनं छापलीं जातात, आणि लोक ती मिटक्या मारीत वाचततातही ! एखाद्याच्या खाजगी जीवनाची अशी जाहीर चिरफाड झालेली पाहण्यांत लोकांना केवढी करमणूक वाटते. अब्रूचे असे जाहीर धिडवडे निघावे, निर्भत्सनेचे चाबूक वाटेल त्यानं वाटेल तसे जाहीर रित्या उडवावे या पलिकडे माणसाला दुसरी जबर शिक्षा कोणती ? असं तिळातिळानं मरण सोसण्यापेक्षां न केलेल्या गुन्ह्याची कबुली देऊन टाकावी आणि फांसावर लटकून या साऱ्या मनस्तापाचा अंतच करून टाकावा असा विचार रघुनाथाच्या वैतागलेल्या मनांत येई. पण " मी अपराधी आहे. मी जानकीला औषधांतून वीष घातलं, आणि तें दडविण्यासाठीं तिला दरीखालीं ढकलली " या भयंकर कबुलीचा उच्चारही त्याला करवेना.

रघुनाथानं बचावासाठीं वकील दिला आणि त्याला सर्व हकिगत

सांगितली तेव्हां वकीलानं त्याच्याकडे निरखून पाहिलं होतं आणि म्हटलं होतं,

" वकीलापासून कांहीं लपवून नये. त्यांतून मी तर तुमचा मित्र आहे. खुनाच्या त्या तिन्हीसांजा कड्यावर काय प्रकार घडला तो खराखरा सांगा. म्हणजे तशी बचावाची तयारी आपण करूं."

रघुनाथानं पुनः पुनः सांगितलं होतं, तुम्ही माझ्यावर विश्वास ठेवा. जानकीला बांकावर बसलेली सोडून मी फिरायला गेलों तो उशीरा परतलों. मधल्या दोन तासांत कड्यावर काय प्रकार घडला मला देवाशपथ माहीत नाहीं. जानकी आपल्या खोलींत निजली आहे अशाच समजुतीनं मी माझ्या खोलींत पडलों होतों. मी निरपराधी आहे.. "

वकिलांपुढें, पोलिसांना, कोर्टांत आणि तपासफेरतपासांत हीच हकिगत रघुनाथानं सांगितली होती.

परंतु रघुनाथानं दिलेला हा जबाब आणि नंतर त्याच्या वकिलानं केलेलं बचावाचं भाषण पब्लिक प्रॉसिक्यूटरच्या भडिमारांपुढें फिकं पडलं होतं. डाव्या अंगाला बसलेल्या पांच ज्यूरींना न्यायमूर्तींनीं केस समजावून दिली होती.

परंतु खटल्याचा सारा निकाल पब्लिक प्रॉसिक्यूटरच्या अखेरच्या आर्ग्यूमेंटवर अवलंबून होता हें उघड होतं.

त्या भाषणाच्या वेळीं कोर्टांत आणि कोर्टाच्या आवाराबाहेरही लोकांची अलोट गर्दी जमली.

आपल्या भाषणाच्या शेवटीं सरकारी वकील म्हणाला,

" जनतेचा प्रतिनिधि या नात्यानं जनतेला न्याय मिळवून देणं आणि जनतेच्या सुरक्षिततेसाठीं समाजकंटकांचं उच्चाटन करणं हें पब्लिक प्रॉसिक्यूटर या नात्यानं माझं कर्तव्य आहे. या खटल्यांत मला पुष्कळ कठोर व्हावं लागलं, पण कर्तव्य करतांना माणसाला कठोर व्हावंच लागतं. जगांत सत्य मोठं असेल. पण न्याय त्याहूनही मोठा आहे.

" आतांपर्यंत जानकी-खून खटल्यांतील पुरावा आपल्या समोर मांडला गेला. साक्षीदारांनीं दिलेल्या साक्षी आपण ऐकल्या. या साक्षापुराव्यांतून जानकी रघुनाथ आणि केसर या तीन व्यक्तींच्या मनाचं चित्र आपल्यापुढें प्रगट झालं आहे. प्रेमाची भूल ज्याला पछाडते तो पापपुण्याचा विचार

करण्याइतका सावध नसतो. केसरच्या प्रेमांत गुरफटलेला रघुनाथ पंचगणीला गेला तो जानकीच्या भेटीसाठीं नव्हे, तर तिचा कांटा दूर करण्यासाठीं. तिच्या खुनाचा विचारपूर्वक रचलेला कट पार पाडण्यासाठीं. आणि तो त्यानं पार पाडलाही. पण 'नो मर्डर इज परफेक्ट' असा एक संकेत आहे. रघुनाथाच्या अपेक्षेप्रमाणें दरीखालीं कोसळल्यावर जानकी न मरतां जिवंत राहिली. आपल्या खुन्यावर उजेड पाण्याइतके 'वीष' हे दोन शब्द तिनं उच्चारून मगच प्राण सोडला. .या खुनी इसमाकडे एकदां पहा. कुणाही सामान्य पुरुषासारखा तो दिसतो. आरोपीच्या पिंजऱ्यात उभं राहण्याऐवजीं तो या कोर्टात खटला ऐकण्यासाठीं जमलेल्या असंख्य प्रेक्षकांत बसला असता तर त्याच्या भयंकरपणाची कुणालाच कल्पना आली नसती. पण वरून सामान्य दिसणाऱ्या या इसमाच्या अंतःकरणांत काम, क्रोध, मत्सर या विकारांनीं केवढा धुमाकूळ घातला होता पहा. त्या विकारांच्या आहारीं गेलेला हा नराधम नागरिक या दृष्टीनं समाजांत राहण्यास घातक ठरला. आनंद-कुसुम या दोन कोवळ्या मुलांचा पिता या दृष्टीनं नालायक ठरला. जन्माच्या जोडीदारणीला वीष पाजून गुन्हा लपविण्यासाठी तिचा कडेलोट करून केसरसारख्या रंगेल स्त्रीशी रममाण होण्याइतका हा उलट्या काळजाचा विषयलंपट नीच माणूस आहे. समाजांत वावरणारे असले संभावित म्हणजे समाजाची सुरक्षितता उडवून देणारे टाइम बॉम्बच. यांना वेळीच उखडून टाकलं पाहिजे....हें पवित्र कार्य करण्यासाठीं, न्यायदानाचं पवित्र व्रत पत्करून आपण आणि सन्माननीय ज्यूरी यांनीं हा खटला ऐकला आहे. एका निष्पाप भोळ्या साध्वीचा स्वतःच्या स्वार्थासाठीं रघुनाथानं अमानुष खून केला ! या हत्येला देहान्ताचंच प्रायश्चित्त मिळालं पाहिजे. आरोपीला त्याच्या गुन्ह्याचं गंभीर स्वरूप लक्षांत घेतां जास्तीत-जास्त – मरेपर्यंत फाशीची शिक्षा द्यावी अशी मी शिफारस करतों."

कोर्टात एकदम स्तब्धता परसली. ज्यूरी उठून आंतल्या खोलींत निघून गेली. धडधडत्या अंतःकरणांनीं कोर्टांतील लोक निकालाची वाट पाहूं लागले. बऱ्याच वेळानें ज्यूरी बाहेर आली आणि तिनं एकमुखानं 'दोषी !' असा निर्णय दिला.

आतां निकालाचा अखेरचा क्षण येऊन ठेपला. कोर्टातल्या साऱ्या लोकांच्या

नजरा न्यायाधिशाकडे वळल्या .. न्यायाधीश म्हणजे एकप्रकारें सर्वसाक्षी परमेश्वराचाच अवतार ! त्यांचा चेहरा शांत आणि निर्विकार दिसला. आज कित्येक दिवस खटल्याची सुनावणी चालू असतांनाही त्यांच्या चेहऱ्यावरची निर्विकार शांतता अढळच राहिली होती. उंच न्यायासनावर बसून ते समोरच्या भीषण नाटयाकडे पहात होते. षड्रिपूंच्या तडाख्यांत सांपडलेल्या मानवांचे आपसांत चाललेले झगडे ते शांत चित्तानं पहात होते ! हांके उठवून बंदुकीच्या टप्प्यांत खेचून आणून रानांतल्या सावजाला ठार करणाऱ्या शिकाऱ्यापेक्षां कठोर असा सरकारी वकील, आरोपीच्या सुटकेसाठीं मानसशास्त्रांच्या गहन सिद्धांतांचा आधार घेऊन उदात्त भाषणं करणारा बचावाचा वकील, आपल्या खाजगी जीवनांतील जखमा उघड्या होत असलेल्या असहायपणें पाहणारा पिंजऱ्यांतील रघुनाथ, आणि रक्तबंबाळ जनावराकडे बघून जिभल्या चाटणाऱ्या हिंसक पशूप्रमाणें सुनावणी ऐकण्यांत समाधान मानणारे कोर्टांतले स्त्रीपुरुष – या सर्वांहून ते न्यायमूर्ति निराळे होते ! उंच पातळीवर होते ! .. खटल्यांतील कोणत्याच पक्षाशीं तद्रूप होऊन त्यांना चालणार नव्हतं. न्यायाचा नाजुक कांटा त्यांच्या हातांत होता. अन्यायाच्या फुंकरानं त्या कांट्याची कोणतीही बाजू खालींवर होऊं देतां कामा नये अशी काळजी त्यांना घ्यायची होती. आज सतत कित्येक दिवस त्यांचा चेहरा निर्विकार आणि शांत राहिला होता ! ... आतां अखेरचा निकाल देण्यासाठीं किंचित् खाकरतांनाही त्यांचा चेहरा निर्विकार आणि शांत होता.

त्यांच्या तोंडून बाहेर पडणारे शब्द ऐकण्यासाठीं उतावीळ झालेल्या प्रेक्षकांचे चेहरे मात्र उत्कंठ आणि कावरेबावरे दिसले !

परंतु प्रेक्षकांच्या चेहऱ्यावरची उत्कंठाही फार वेळ टिकली नाहीं.

न्यायमूर्तींनीं लहानसं भाषण करून जेव्हां काळी टोपी डोक्यावर चढविली तेव्हांच खटल्याचा निकाल लोक समजले. "आरोपी रघुनाथ याला मरेपर्यंत फाशीची शिक्षा –" इत्यादि न्यायमूर्तींच्या तोंडच्या अखेरच्या शब्दांकडे विशेष लक्ष देण्याची गरज कुणालाच वाटली नाहीं....गर्दीतल्या साऱ्या लोकांच्या नजरा रघुनाथाकडे वळल्या. खुनी ! गुन्हेगार ! फांशीच्या शिक्षेला पात्र ठरलेला अपराधी ! – असं मनाशीं म्हणत लोकांनीं रघुनाथाकडे अखेरचं पाहून घेतलं.

स्वत: रघुनाथानं निकाल ऐकला त्या क्षणीं त्याच्या मनांत आरोळी उठली, मी गुन्हेगार ? मी खुनी ? जानकीची हत्या ज्यानं केली तो मी ? आतां मात्र न्यायाच्या विटंबनेचा कळस झाला खरा. या विटंबनेलाच न्याय म्हणायचं ? सत्य म्हणायचं ? अरे, तुम्हां कुणालाही सत्य कळलेलं नाहीं ? जें सत्य तें मी कितीही ओरडून सांगितलं तरी मानायला तुमची तयारी नाहीं, ठीक आहे. म्हणा मला खुनी ! द्या मला फांशी ! या जगांत सत्य नेहमीं अज्ञात राहणार हेंच खरं.

× × ×

फांसावर जाण्याच्या अखेरच्या घटकेला रघुनाथानं आपल्या हातून घडलेल्या पहिल्या खऱ्या गुन्ह्याची हकिगत जेव्हां संपविली तेव्हां ती ऐकणाऱ्या मॅजिस्ट्रेटच्याही मनांत असाच विचार आला कीं, सत्याच्या शोधासाठीं निर्माण केलेल्या न्यायालयांत देखील सत्य उघडकीस न येतां असत्यावरच सारा व्यवहार चालावा हें केवढं आश्चर्य ? जी हकीगत रघुनाथ सांगत होता तिच्यावर विश्वास ठेवावा कीं न ठेवावा अशा शंकेनं ते रघुनाथाकडे पहात राहिले....

रघुनाथ म्हणत होता, " साहेब, संपली माझी हकिगत ! जें सत्य न्यायालयांत सांगून कांहीं फायदा नव्हता तें माझ्या मनाच्या समाधाना-साठीं या घटकेला मीं सांगितलं आहे. फांसावर चढण्यापूर्वी जगाला मला हेंच सांगायचं आहे कीं दहा वर्षांपूर्वी एके दिवशीं रात्रीं पापकृत्याची जी भूल मला पडली तिचं प्रायश्चित्त मी परोपरीनं भोगलं. पाप दडविण्यासाठीं अनेक पापं मला करावीं लागलीं. भूल कोणत्या स्वरूपांत दाराशीं येईल त्याचा नियम नाहीं ! प्रारंभीं मला पैशाची भूल पडली ! तिच्यांतून विषय-वासनेची भूल निर्माण झाली. तुमच्या दाराशीं कोणतं तरी मोहक रूप घेऊन अशीच भूल येईल तेव्हां सावध रहा ! दारावर थाप वाजली तरी दार उघडं नका .... "

● ● ●

## आमचीं प्रकाशनें

[ फक्त शिल्लक पुस्तकें ]

| | | |
|---|---|---|
| १. माहेरघर | वि. वि. बोकील | १–८–० |
| २. दिवाळसण | वि. वि. बोकील | २–०–० |
| ३. बाळूची प्रिया | वि. वि. बोकील | २–८–० |
| ४. हंसूं आणि आसूं | ना. सी. फडके | ५–०–० |
| ५. उद्धार | ना. सी. फडके | ७–८–० |
| ६. सुषमा | ना. सी. फडके | ५–०–० |
| ७. रुमझुम | ना. सी. फडके | १–०–० |
| ८. खेळणीं | ना. सी. फडके | ५–०–० |
| ९. स्वराज्याचा अरुणोदय | प्र. के. अत्रे | ३–०–० |
| १०. भूकंप | मं. भा. निरंतर | २–८–० |
| ११. देणें देवाचें | मनमोहन | ३–०–० |
| १२. माझीं भावगीतें | बाबूराव गोखले | २–०–० |
| १३. डॉक्टर | वि. वि. बोकील | २–०–० |
| १३. नागकन्या | ग. त्र्यं. माडखोलकर | ३–०–० |
| १५. घर | वसंत कानेटकर | ३–०–० |
| १६. तेथें चल राणी | वसंत कानेटकर | २–८–० |
| १७. मोरपिसें | अनंत काणेकर | २–४–० |
| १८. आम्बराई | गिरीश | २–४–० |
| १९. विखुरलेलें मोतीं | शांता माडखोलकर | २–०–० |
| २०. भूल | सौ. कमला फडके | २–८–० |
| २१. छायाप्रकाश | सौ. आनंदीबाई लेले | २–०–० |
| २२. फुलवाली | वि. वा शिरवाडकर | २–०–० |
| २३. पहिलें चुबन | ग. ल. ठोकळ | ३–०–० |
| २४. एक नवी गुलामगिरी | रॉजर एन् बाल्डविन | २–०–० |
| २५. जीवन | वसंत सांगळे | १–८–० |
| २६. आडगांवचे चौधरी | बी. रघुनाथ | २–८–० |
| २७. एव्हरेस्ट दर्शन | प्रभाकर पाटणकर | २–८–० |
| २८. अभागिनी | एमिल झोला | १–८–० |
| २९. पदार्पण | सौ. सुशीला चिकटे | २–०–० |
| ३०. कदली | इंदिरा संत | २–०–० |
| ३१. निवडक गुंड्याभाऊ | चिं. वि. जोशी | १–४–० |